अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ [ गीता. १७. १५ ]

# वाङ्मय-श्री-खण्ड



[ कै. डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे व त्यांच्या बंधुभगिनी इत्यादिकांचे निवडक लेख व कविता ]




संपादक

**डॉ. रामचंद्र चिंतामण श्रीखंडे,** एम्. बी. बी. एस्.





प्रस्तावनालेखक

**प्रो. अश्वत्थामाचार्य बाळाचार्य गजेन्द्रगडकर,** एम्. ए.

प्रोफेसर ऑफ् संस्कृत, एल्फिन्स्टन् कॉलेज





प्रथमावृत्ति

शके १८५४ सन १९३२

**किंमत २ रुपये**

# अर्पणपत्रिका



बंधुरत्न कै० तीर्थस्वरूप दादा

यांच्या संस्मरणीय सद्गुणांच्या

स्मृतिस्तव संग्रहित

केलेलें

हें

## वाङ्मय-श्री-खण्ड

माझे

वत्सल व पुण्यशील

तीर्थरूप

बाबा व सौ. मातुःश्री आक्का

यांस

मीं

लेखक-लेखिकांच्या उत्कट इच्छेनुसार

भक्तिपुरःसर

समर्पण केलें आहे.

— रामचंद्र चिंतामण श्रीखंडे



अनेक पुष्पें तुज वाहियेलीं ।
ते धन्य बा! पादप, धन्य वेली ॥
तरीच हें सार्थक जन्म होई ।
दिलें तुला तें जरि शेषशायी! ॥

—मुकुंदपूजा श्लोक १३
(पद्यविभाग पृ. ४३)

# प्रास्ताविक कांहीं तरी



कै. डॉ. शंकरराव श्रीखंडे यांचा व माझा प्रथम परिचय नोव्हेंबर १९१३ मध्यें झाला. त्या वेळीं श्री. अलुरकर (प्रोफेसर वामन दत्तात्रय अलुरकर, एम्. ए., एल्फिन्स्टन कॉलेजांतील गणितविषयाचे एक शिक्षक) व मी डेक्कन कॉलेजांत ज्युनिअर दक्षिणा फेलो होतों. आह्मां दोघांना पुण्यास मॅट्रिक परीक्षेच्या वेळीं ज्युनिअर सुपरव्हायझर नेमलें होतें. त्यावेळीं कॉलेजें सप्टेंबर ३० ला बंद होत व नोव्हेंबर महिन्यांत परीक्षासत्र सुरू होई. मॅट्रिकचा मंडप पुणें स्टेशनपासून जवळच असल्यामुळें परीक्षेच्या दिवसांत बी. जे. मेडिकल स्कूलच्या वसतिगृहामध्यें आह्मी दोघेहि उतरलों होतों. याचें कारण असें कीं, शंकरराव हे अलुरकरांचे बालमित्र. शंकररावांचे चुलतबंधु श्रीयुत दत्तात्रय पांडुरंग श्रीखंडे हे त्यावेळीं बी. जे. मेडिकल स्कूलमधें शिकत होते व शंकरराव कांहीं कारणांनिमित्त त्या मेडिकल स्कूलच्या वसतिगृहामध्येंच त्यावेळीं रहात होते. ह्मणून अलुरकरांबरोबर मीहि त्या वसतिगृहांत राहण्यास गेलों.

तेथें माझा मुक्काम चार दिवस होता. व या चार दिवसांत शंकररावांशीं माझा निकट संबंध येऊन जो स्नेह जमला तो त्यांच्या अकालीं मृत्यूपर्यंत कायम होता. शंकररावांविषयीं अलुरकर मला वारवार सांगत असत. पण नोव्हेंबर १९१३ पर्यंत त्यांची प्रत्यक्ष गांठ पडण्याचा प्रसंग आला नाहीं. या चार दिवसांच्या निकट सहवासानें शंकररावांच्या स्वभावांतील अनेक विशेष मला कळून आले. मुख्यतः त्यांचा विनोदी स्वभाव, आनंदी व उल्लसित वृत्ति, व सरल आणि निष्कपट मन यामुळें माझें अंतःकरण त्यांच्याकडे आकर्षलें गेलें. विनोदी गोष्टींचा शंकररावांजवळ एक प्रचंड सांठाच होता असें ह्मटल्यास हरकत नाहीं. रात्रीं जेवण झाल्यावर कितीतरी उशीर पर्यंत आह्मी गप्पागोष्टी करीत बसत असूं. त्या वेळीं शंकरराव आपल्या सांठ्यांतील विनोदी गोष्टी सांगून हास्याच्या प्रचंड लहरी उत्पन्न करीत. खरोखर शंकररावांसारखी विनोदी, आनंदी व निष्कपटी माणसें ह्मणजे समाजाचें एक मोठें 'ॲसेट'च होत. जेथें जेथें अशीं माणसें जातात तेथें तेथें ते आनंदी वातावरण आपल्या बरोबर नेतात व त्यामुळें सर्व लोकांना प्रिय होतात. शंकररावांचेंहि असेंच होत असे.

शंकररावांच्या स्वभावांतील दुसरा जो विशेष त्यावेळीं माझ्या लक्षांत आला तो त्यांची वाङ्मयाविषयीं आवड हा होय. डॉक्टरीच्या धंद्यांत पडलेला मनुष्य, सदा सर्वदा दुःखी, खिन्न व व्यथित रोग्यांचीं तेजोविहीन मुखें अवलोकन करण्याचा ज्याला नेहमीं प्रसंग, असा गृहस्थ वाङ्मयभक्त असेल,—इतकेंच नव्हे तर—विनोदी लेखक व प्राकृत व संस्कृत कवीहि असेल अशी माझी कल्पना नव्हती. पण शंकररावांच्या उदाहरणानें असें असूं शकतें याबद्दल माझी खात्री झाली. एकदां मी त्यांना ह्मटलें, 'डॉक्टर, तुमचा आनंदी व विनोदी स्वभाव आणि वाङ्मयाची आवड पाहिली ह्मणजे मला वाटतें कीं ज्यांना आयुष्यांतील आपलें खरें क्षेत्र सांपडलेलें नाहीं व जे परिस्थितीच्या प्रवाहामुळें भलतीकडेच ओढले गेले आहेत अशापैकीं तुह्मी एक आहां!' यावर त्यांनीं जें उत्तर दिलें तें सर्वांनीं चांगलें विचार करण्यासारखें आहे. ते ह्मणाले 'ज्या आनंदी आणि विनोदी स्वभावाबद्दल तुम्ही मला श्रेय देतां तो स्वभाव डॉक्टर लोकांमध्येंच असणें अत्यंत जरूर आहे असें नाहीं तुह्मांस वाटत? डॉक्टरानें आपली आनंदी व उल्लसित वृत्ति नेहमीं रोग्याच्या खोलींत नेली पाहिजे. त्यामुळें नकळतच रोग्याला मोठा धीर येतो. पण डॉक्टरच गंभीर वृत्तीचा व दुःखी कष्टी दिसला तर त्याचा परिणाम खात्रीनें रोग्याच्या मनावर वाईट झाल्याशिवाय रहात नाहीं. आतां वाङ्मयाच्या आवडीविषयीं ह्मणाल तर ती अमके धंदे करणाऱ्या माणसामध्येंच प्रतिनियत झाली पाहिजे असें नाहीं. वाङ्मयाची आवड ही प्रत्येकाच्या मनावर अवलंबून असते. मला असे कॉलेजांतील कांहीं प्रोफेसर माहित आहेत कीं इतक्या सुट्या त्यांना मिळत असूनहि स्वतःचा धंदा करण्यास ह्मणजे कॉलेजातील शिकविण्याचें काम करण्यास जेवढें वाचन आवश्यक आहे त्यापेक्षां अधिक वाचन कधीं काळीं ते करीत असतील असा आरोप त्याच्यावर करण्यास कोणीही धजणार नाहीं! त्यांच्या घरीं तुह्मी गेलांतर त्यांच्या स्वतःच्या विषयाच्या अगदीं जरूरीच्या पुस्तकांपेक्षां दुसरें एकहि वाङ्मयाचें पुस्तक त्यांच्या शेल्फवर आढळणार नाहीं!'

'वाङ्मयाची आवड ही प्रत्येकाच्या मनावर अवलंबून असते' या शंकररावांनीं कित्येक वर्षांपूर्वी केलेल्या विधानाचें एक प्रकारचें प्रत्यंतर ह्मणजेच 'वाङ्मय-श्री-खण्ड' हें पुस्तक होय. या पुस्तकांत स्वतः शंकरराव, त्याचे बंधु डॉक्टर रामभाऊ, त्यांच्या तीन भगिनी, एक पुतणी व एक मावसबंधु

अशा सात लेखक-लेखिकांची वाङ्मयनिर्मिति संग्रहित केली आहे. ही सर्व मंडळी प्रायः श्रीखंडे घराण्यांतील असल्यामुळें या पुस्तकास ' वाङ्मय- श्री-खण्ड ' हें श्लेषगर्भ व सूचक नांव देण्यांत आलें आहे. ' वाङ्मय-श्री-खण्डांत ' संग्रहित केलेलें सर्व लिखाण लेखकलेखिकांनीं केवळ मनोरंजनार्थ आवडीनें केलेलें असून ज्यावेळीं तें लिहिलें गेलें त्यावेळीं तें कधीं काळीं प्रसिद्ध करावें अशी कोणाचीच कल्पना नव्हती. शंकररावांच्या मृत्यूपूर्वी कांहीं दिवस मात्र या पुस्तकांतील पद्यविभाग प्रसिद्ध करावा असें शंकरराव व त्याचे बंधु रामभाऊ यांनीं निश्चित केलें होतें. पण शंकररावांच्या आकस्मिक निधनामुळें हा निश्चय सिद्धीस गेला नाहीं. तदनंतर आपल्या मृत बंधूचें महत्त्वाचें सर्व लिखाण एकत्र करून तें प्रसिद्ध करावें व अशा रीतीनें त्यांचें एक प्रकारचें वाङ्मय स्मारक उभारावें अशी कल्पना डॉ. रामभाऊ यांच्या मनांत आली. त्यांतच शंकररावांच्या दुसऱ्याहि निकट आप्तांच्या लिखाणाची भर घालावी ही कल्पना सुचली व या दोन कल्पनांचा परिणाम ह्मणजे ' वाङ्मय- श्री-खण्ड ' या पुस्तकाचें प्रसिद्धीकरण होय.

' वाङ्मय-श्री-खण्ड ' वाचून जो विचार प्रथम मनांत येतो तो हा कीं ज्याप्रमाणें रत्नाकराच्या उदरांत सांठविलेल्या असंख्य रत्नांपैकीं फक्त परिमित रत्नेंच मानवी दृक्पथांत येतात, त्याप्रमाणें समाजांत वावरत असलेल्या शेंकडों साहित्यभक्तांपैकीं फक्त थोड्यांचींच नांवें सर्वांस माहित होतात. एकादा लेख लिहिला किंवा एकादी कविता केली कीं ती प्रसिद्ध केव्हां होते व आपणांस लोक लेखक व कवि ह्मणून केव्हां संबोधतात अशा प्रकारची उत्कण्ठा जी सर्वसाधारण लोकांत दिसून येते तिला समाजांत कांहीं अपवाद आहेत हेंहि वाङ्मय-श्री-खण्डाच्या वाचकांच्या लक्षांत आल्याशिवाय रहाणार नाहीं. वाङ्मय- श्री-खण्डांत संग्रहित केलेले लेख व कविता जरी आतां प्रसिद्ध होत आहेत तरी त्यांच्या निर्माणकालीं प्रसिद्धीकरितां त्या निर्माण केल्या गेल्या नाहींत. येथें संग्रहित केलेलें लिखाण श्रीखण्डे घराण्यांतील स्त्रीपुरुषांनीं ज्याप्रमाणें अन्तःस्फूर्तीनें प्रसिद्धिनिरपेक्ष केलें त्याप्रमाणें दुसरेहि कित्येक साहित्यसेवक समाजास अज्ञात अशी वाङ्मयनिर्मिति करीत असतील. नसतील कशावरून ? कदाचित् त्यांची वाङ्मयनिर्मिति समाजापुढें कधीं येणारहि नाहीं. ह्मणूनच 'वाङ्मय- श्री-खण्ड ' वाचून मला प्रथम हें वाटलें कीं नुसते साहित्यभक्तच नव्हे, तर साहित्यनिष्पादक असेहि स्त्रीपुरुष समाजास अज्ञात रीतीनें आपली साहित्यसेवा करीत

असतील. मनुष्यास अगम्य अशाहि वनगिरिकुहरादिकांमध्यें सुवासिक फुलें फुलतातच कीं नाहीं ?

वाङ्मय-श्री-खण्डाचा गद्यविभाग ११५ पृष्ठांचा असून त्यांतील सर्व लिखाण डॉ. शंकरराव यांचें आहे. त्यांतील प्रथमच्या ८२ पृष्ठांत शंकरराव यांनीं अलेक्झांड्रियाहून आपल्या भगिनी सौ. कृष्णाबाई यांना १९१५ सालीं पाठविलेल्या १७ पत्रांचा संग्रह केलेला आहे. सौ. कृष्णाबाई यावेळीं १७।१८ वर्षांच्या असून त्यांनीं नुक्ताच संसार करण्यास प्रारंभ केला होता. संसारांतील महत्त्वाची जबाबदारी अंगावर पडली असतांना तरुण स्त्रियांनीं आपली वर्तणूक कशी ठेवावी, कोणकोणते गुण अंगीं आणण्याचा प्रयत्न करावा, प्रसंग-विशेषीं कसें वागावें वगैरे बाबतींत बहुमोल उपदेश या पत्रांत ग्रथित केलेला आहे. लेखकानें हीं पत्रें आपल्या भगिनीला लिहिलीं असलीं तरी तीं इतकी महत्त्वाचीं आणि उपयुक्त आहेत कीं सर्व तरुण स्त्रियांनींच नव्हे, तर पुरुषांनींहि तीं वाचून त्यांचें मनन करावें अशी माझी शिफारस आहे. व्यवहारांत उद्भवणाऱ्या प्रायः प्रत्येक प्रश्नावर यांत ऊहापोह केलेला वाचकांस आढळून येईल. ओजस्वती वाणी, व्यावहारिक वर्तन, व्यवहारचातुर्य, सामाजिक सुधारणांचें ध्येय, काटकसर, हिंदुस्थानचा शेतकरी, समर्थ व्हा !, शिशुसंवर्धन, स्वच्छपणा, ‘ अबलोन्नति होईल, पण केव्हां ? ’, भक्ति व ज्ञान, इत्यादि पत्रांच्या शीर्षकांवरून त्यांत प्रतिपादलेल्या विषयांची वाचकांस सहज कल्पना येईल. अमुक कर तमुक कर, किंवा अमुक करूं नको तमुक करूं नको, अशा पंतोजी पद्धतीनें केलेला उपदेश नीरस वाटतो व पुष्कळ वेळां मनाला पटतहि नाहीं. उपदेश अशा रीतीनें करावा कीं, ज्याला आपण उपदेश करतों त्याला आपणास उपदेश पाजला जात आहे असें वाटूं नये. डॉ. शंकरराव यांनीं ‘ एका कल्पित सभेचा मनोरम वृत्तांत ’ आपल्या भगिनीला कळविण्याच्या मिषानें हा उपदेश केला आहे. त्यामुळें हीं सर्व पत्रें फार मनोरंजक उतरलेलीं आहेत. तशांत या कल्पित सभेंत भाग घेणाऱ्या व्यक्तींचें वर्णन करतांना व दुसऱ्याहि कित्येक प्रसंगीं लेखकानें विनोदाचे फवारे इतस्ततः उडविले असल्यामुळें हीं पत्रें वाचतांना कधींहि कंटाळवाणीं होत नाहींत. गद्य विभागांतील बाकीच्या सात लेखांतहि शंकररावांच्या लिखाणाचा विशिष्ट गुण जो विनोद तो भरपूर प्रमाणांत दिसून येतो. त्यांपैकीं ‘ माझा एक अनुभव ’ व ‘ माझ्या कंपाउंडरची कहाणी ’ या दोन लेखांकडे मी वाचकांचें विशेष रीतीनें

लक्ष वेधतों. शंकररावांच्या व्यंग्य लेखनशैलीचा नमुना म्हणून पृ. ११३ वर समुद्र व हिंदुस्थान यांची केलेली तुलना वाचकांनीं अवश्य वाचावी.

वाङ्मय–श्री–खण्डाचा दुसरा जो पद्यविभाग त्याच्या प्राकृत भागामध्यें एकंदर ५३ कविता आल्या असून या सर्व कविता प्रायः जुन्या वळणावर लिहिल्या गेल्या आहेत. इंग्रजी काव्याच्या अभ्यासामुळें जीं एका विशिष्ट वळणाचीं वैणिकें [ lyrics ] सध्यां निरनिराळया नियतकालिकांत प्रसिद्ध होतात किंवा स्वतंत्र पुस्तकरूपानें वाङ्मयक्षेत्रांत अवतरतात त्यांच्यापेक्षां या कवितांचें आंतर व बाह्य स्वरूप निराळया प्रकारचें आहे. त्यांचे आंतर स्वरूप अथवा विषय हे साधारण जुन्या पद्धतींचेच असून बाह्यस्वरूप अथवा वृत्त, चाल इत्यादि आकार हाहि जुन्या प्रकारचाच आहे. त्यामुळें नेहमीं आधुनिक मराठी वैणिकें वाचणाऱ्या वाचकास हा पद्यविभाग कदाचित् तितका हृदयस्पर्शी वाटणार नाहीं. पण स्वानुभवानें मी एवढें सांगू शकतों कीं या विभागांत कित्येक ठिकाणीं अगदीं उच्च प्रतीचें काव्य मला आढळून आलें व माझ्या मनाला फार आनंद वाटला.

या ५३ कवितांपैकीं १२ कविता डॉक्टर शंकरराव यांच्या आहेत. त्यांत त्यांचा नेहमींचा विनोद कांहीं ठिकाणीं दिसतो तर कांहीं ठिकाणीं तत्त्वज्ञानाची छटाहि दृग्गोचर होते. 'संशय-मणि-माला' ही पांचवी कविता वाचकांस विशेष मनोरंजक वाटेल. यानंतर सौ. कृष्णाबाई यांच्या ३, सौ. वेणूबाई यांची एक, सौ. गंगाबाई यांच्या ५ अशा ९ कविता डॉ. शंकररावांच्या तीन भगिनी यांनीं रचलेल्या आहेत. या कविता वाचून या तीन भगिनींच्या मनावरील भक्तिरसाचें प्राबल्य वाचकांच्या सहज लक्षांत येतें. यानंतर शंकररावांची पुतणी कु. कृष्णाताई यांच्या ३ कविता आहेत. कृष्णाताई या कॉलेजस्थ विद्यार्थिनी असल्यानें त्यांनीं मनाच्या एकाग्रतेचे गोडवे गावेत हें योग्यच आहे. सर्व विद्यार्थिवर्गाला त्यांनी बजाविलें आहे कीं—

'एकाग्रता मनाची सर्वहि विद्या शिकावया लागे।
अनुसरुनिया तियेला सर्वहि येतात हो ! तिच्यामागें ॥ १५ ॥
पार्थापरि विद्यार्थी ज्यावेळीं चित्त करुनि एकाग्र।
अध्ययना करतिल तें होइल अंकित सरस्वती साग्र' ॥ १६ ॥ पृ. ३२

यानंतर शंकररावांचे धाकटे बंधु डॉ. रामभाऊ — वाङ्मय-श्री–खण्डाचे प्रकाशक — यांच्या २० कविता आल्या आहेत. डॉ. रामचंद्र चिंतामण श्रीखंडे

यांचें नांव मराठी मासिकांच्या वाचकांस अपरिचित नाहीं. त्यांच्या मराठी व संस्कृतहि कविता मनोरंजन, यशवंत, लोकशिक्षण वगैरे मासिकांत प्रसिद्ध होत असतात. डॉक्टर रामभाऊ यांच्याविषयीं एवढेंच ह्मटलें असतां पुरें होईल कीं ते शंकररावांना पूर्णपणें शोभणारे बंधु आहेत. डॉ. रामभाऊ हे तरुण आहेत. त्यांची वाङ्मयाची आवड व सेवा कौतुकावह आहे. त्यांनीं हा आपला काव्य-निर्मितीचा व्यवसाय असाच चालू ठेवावा अशी त्यांस माझी प्रेमाची सूचना आहे. त्यांच्या या २० कविता विविध विषयांवर लिहिल्या गेल्या आहेत व त्यांवरून त्यांचें भक्तिप्रवण मन, निसर्गनिरीक्षण व लोकपरीक्षण यांची चांगलीच कल्पना येते. डॉ. रामभाऊ ज्यावेळीं सांगतात कीं—

संसाराला उपमिति कुणी घोर त्या सागरानें
याच्या त्रासें कुणि वरियल्या त्या गुहा, शैल, रानें ।
दैवें लाभे जर सुगृहिणी स्वर्ग संसार होतो
पीयूषाचा उदधि अथवा नंदनोद्यान हो! तो ॥१॥ पृ. ६४

त्यावेळीं असें वाटतें कीं हा तरुण डॉक्टर शारीरिक व्याधींचें निदान करण्यांतच निष्णात आहे असें नव्हे, तर संसारांत प्रत्येक घरीं जी अस्वस्थता उत्पन्न होते किंवा उत्पन्न होण्याचा संभव असतो तिचेंहि कारण यानें बिनचूक रीतीनें हुडकून काढलें आहे!

श्रीयुत विश्वनाथशास्त्री कात्रे-शंकरराव यांचे मावसबंधु-यांच्या ९ कवितांनीं वाङ्मय-श्री-खण्डांतील प्राकृत पद्यविभाग पूर्ण झाला आहे. शास्त्रिबोवांचें वेदाध्ययन यथासांग झालेलें असून संस्कृत सारस्वताचाही त्यांनीं बराच अभ्यास केलेला आहे. परिस्थितीच्या प्रभावामुळें इंग्रजीच्या अध्ययनाचा योग त्यांना आला नाहीं. वेदाभ्यासजड विद्वानाकडून काव्यनिष्पत्तीची व विशेषतः मराठीमध्यें काव्यनिष्पत्तीची अपेक्षा सहसा कोणी करीत नाहीं. त्यामुळें शास्त्रि-महाशयांच्या या काव्यनिर्मितीबद्दल मला फार कौतुक वाटतें. हा सापेक्षतेचा विचार सोडून केवळ काव्य ह्मणून जरी त्यांच्या कवितांकडे पाहिलें तरी त्यांची प्रतिभा उच्च दर्जाची आहे हें वाचकांच्या निदर्शनास यावयास वेळ लागणार नाहीं. या नऊ कविताच त्यांची प्रचंड कल्पनाशक्ति व मनुष्यस्वभावाचें सूक्ष्म अवलोकन यांची साक्ष द्यावयास अगदीं पुरेशा आहेत. पण त्यांच्या कवितांपैकीं मला सर्वांत जास्त आवडलेली कविता ' आद्यप्रसव व कुमारसंभव ' ही होय.

मराठींतील अगदीं पहिल्या वर्गांतील कवितांमध्यें हिला सहज स्थान मिळावें इतकी ही उत्तम आहे. कवितेचा विषय संसारी लोकांच्या नित्य परिचयांतला, भाषा साधी, सरळ व प्रसादयुक्त, निरनिराळे प्रसंग वर्णन करण्याची शैली अप्रतिम, कित्येक ठिकाणच्या शब्दांची योजना अत्यंत समर्पक व या सर्वांचो उभारणी मनुष्यस्वभावाच्या व लोकव्यवहाराच्या सूक्ष्म अवलोकनावर केलेली, यांमुळें ही कविता अत्यंत हृदयस्पर्शी झालेली आहे. सगळीच कविता अथपासून इतिपर्यंत वाचनीय आहे. तरी पण श्लोक २ चतुर्थ चरण, ४, ७, ८, ९ व १४ यांचे उत्तरार्ध, १६ व १८ पूर्वार्ध आणि २५, २९ व ३० उत्तरार्ध ( यांतील श्लोक ३० मधील शेवटला शब्द 'कावत' हा अत्यंत समर्पक आहे. या एका शब्दानेंच तो सर्व 'सीन' डोळ्यापुढें हुबेहुब उभा राहतो. ) यांकडे मी वाचकांचें सविशेष लक्ष्य वेधतों. शेवटीं कवीनें ज्यावेळीं सांगितलें कीं—

हाताखालिं सुईण ! तें रगडणें अंगास तें लावणें !
तें न्हाणें ! किति शेकणें ! सतत तें बाजेवरी लोळणें ! ।
डिंकाचे किति लाडु फस्त करणें ! तें तूप ! तें खोबरें !
सारा पाहुनि थाट वाटत मना, बाळंत होणें बरें !! ॥ ३४॥

त्यावेळीं स्वतःशींच किती वेळ तरी मी हंसत होतों विश्वनाथशास्त्री तरुण आहेत आणि कवि या नात्यानें त्यांच्या पुढें सोज्वळ भविष्यकाळ आहे असें मला खात्रीपूर्वक वाटतें. तेव्हां त्यांनीं हा काव्यनिर्मितीचा व्यवसाय सतत चालू ठेवावा अशी माझी त्यांना विनंति आहे.

वाङ्मय-श्री-खण्डाच्या पद्यविभागाचा ९५ ते १३० पृष्ठांचा भाग संस्कृत कवितांनीं व्यापलेला आहे. यांत डॉ. शंकरराव यांच्या ४, डॉ. रामभाऊ यांच्या १३ व श्रीयुत विश्वनाथशास्त्री यांच्या २ अशा कविता आलेल्या आहेत. हल्लींच्या काळीं संस्कृत भाषा विरलप्रचार असून तिच्याकडे सर्वसाधारण लोकांचें असावें तितकें लक्ष्य नाहीं. मातृभाषांना उत्तेजन द्यावयाची जी सध्यां लाट उत्पन्न झाली आहे तिच्यामुळें संस्कृत भाषेची पिछेहाट करण्याचा प्रयत्न कित्येक लोक ज्ञात्वा अज्ञात्वा वा करीत आहेत. अशा परिस्थितींत संस्कृतमध्यें केलेली पद्यरचना मनाला आल्हादकारक वाटते यातील सर्व कविता प्रायः निर्दोष व सरल असल्यामुळें साधारण संस्कृतज्ञासही त्या सहज समजण्यासारख्या आहेत. डॉक्टर श्रीखंडे बंधुद्वय कित्येक वेळां संस्कृतमध्यें पत्रव्यवहार करीत, व तोहि

पद्यात्मक, हें या पद्यविभागावरून कळल्यावर साहजिकच त्यांच्या विषयीं मनाला कौतुक वाटतें. बहुतेक काव्यरचना सुरस व सुंदर आहे.

येथपर्यंत या वाङ्मय-श्री-खण्डाला प्रास्ताविक कांहीं तरी लिहिलें. ज्या अर्थी हें पुस्तक कै. डॉ. शंकरराव श्रीखंडे यांचें एक प्रकारचें वाङ्मय स्मारक आहे त्या अर्थी त्यांचा जीवनवृत्तांत थोडक्यांत येथें दिल्यास तो उचितच होईल असें वाटल्यावरून. आतां तिकडे वळतों. ज्यावेळीं आपण कोणत्याही कविता वाचतों त्यावेळीं त्या कवीची किंवा कवयित्रीची कांहीं माहिती आपल्यास असावी अशी इच्छा साधारणपणें प्रत्येक वाचकाच्या मनांत उत्पन्न होते ती अंशत: पुरी करण्याकरितां ज्या दुसऱ्या व्यक्तींचें लिखाण वाङ्मय-श्री-खण्डांत संग्रहित केलें आहे त्यांच्याविषयींहि थोडिशी माहिती शेवटीं देत आहें.

## डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे, एम्. सी. पी. एस्.

डॉ. शंकरराव यांचा जन्म शुक्रवार ता. ५ नोव्हेंबर १८८६ रोजीं कोल्हापूर मुक्कामीं झाला. खुद्द जन्म कोल्हापुरीं झाला असला तरी शंकररावांचे वडील व मातुश्री यांचें वास्तव्य शेळोली या गांवीं असल्यामुळें शंकरराव व त्यांची इतर भावंडें यांचें लहानपण खेड्यांतच गेलें. शेळोली हें एक लहानसें ब्राह्मण-वस्तीचें खेडेंगांव कोल्हापुरापासून दक्षिणेस ३६ मैलांवर वेदगंगा नदीच्या तीरावर आहे. याचे पूर्वबाजूस भूधरगड नामक एक डोंगरी किल्ला आहे. शेळोलीभोंवतीं मैल दोन मैलावर डोंगरांच्या रांगा दिसत असल्यामुळें या गांवाचा 'शैलालि' या रूपानें केलेला उल्लेख वाङ्मय-श्री-खण्डाच्या संस्कृत पद्यविभागामध्यें वाचकांस आढळून येईल. लहानसें खेडेंगांव, जवळच एक नदी, सभोंवार नानाप्रकारचीं शेतें व जरा लांब चहूंकडे डोंगराच्या रांगा अशा प्रदेशांत शंकरराव व त्यांचीं भावंडें यांचें लहानपण गेलेलें असल्यामुळें त्यांच्या साहजिक काव्यस्फूर्तीला निसर्गानें उत्तेजन दिलें असल्यास नवल नाहीं. वाङ्मय-श्री-खण्डांतील लिखाणांत जी एक निसर्गाची आवड ठिकठिकाणीं दिसून येते तिचें मूळ लेखकलेखिकांच्या शेळोली गांवांतील लहानपणच्या वास्तव्यांत असलें पाहिजे असें जर कोणी चिकित्सक ह्मणूं लागला तर त्यांत फारसें वावगें होणार नाहीं.

शंकरराव यांचें शिक्षण कोल्हापुरांतच झालें. मॅट्रिक पास झाल्यावर कॉलेजांत प्रवेश करून त्यांनीं पी. ई. ( सध्यांची एफ्. वाय्. ए. )च्या टर्म्स् भरल्या व नंतर ते पुण्याच्या बी. जे. मेडिकल स्कूलमध्यें दाखल झाले. पुढें

त्यांची पी. ई. देखील उत्तीर्ण झाली. पुढेमागें ग्रँट् मेडिकल् कॉलेजांत जाऊन तेथील शिक्षण घ्यावयाचें अशी महत्त्वाकांक्षा आतांपासून शंकररावांच्या मनांत वास करीत होती असें दिसतें. व त्याकरितांच त्यांनीं पी. ई. पास होण्याचा खटाटोप या वेळीं केला. लहानपणापासून शंकररावांची गणना हुषार विद्यार्थ्यांत होती. बी. जे. मेडिकल स्कूलमधील सर्व परीक्षांत त्यांना पहिल्या नंबरच्या स्कालरशिपा व बक्षिसें मिळत गेलीं. या स्कूलमधील शेवटची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्यांना १९०७ सालीं हॉस्पिटल असिस्टंटची नोकरी लागली. सर्व परीक्षा उत्तम प्रकारें पास होऊन नोकरी लागल्यावर शेळोलीग्रामस्थांनीं एक जाहीर सभा भरवून शंकररावांचें गुणगौरव व अभिनंदन केलें होतें.

नोकरीच्या निमित्तानें शंकरराव यांस पुण्याशिवाय तळेगांव, बारामती, बेळगांव वगैरे ठिकाणीं रहावें लागलें. १९१५ त आपण होऊनच ते वॉर सर्व्हिसवर गेले. त्या निमित्तानें अॅलेक्झांड्रियांत ते सव्वा वर्ष होते. तेथून परत आल्यावर पुण्यास बी. जे. मेडिकल स्कूलमध्यें अॅनॅटमी या विषयाच्या ट्यूटरचें काम त्यांनीं दीड वर्ष केलें. नंतर १९१८ सालीं मुंबईंत डोंगरी जेल हॉस्पिटलवर त्यांनीं आपली बदली करून घेतली. यांत त्यांचे दोन हेतु होते. एक, आपले धाकटे बंधु रामभाऊ यांची ग्रँट् मेडिकल कॉलेजांत शिकण्याची सोय व्हावी व दुसरा हा कीं स्वतःहि ग्रँट् मेडिकल कॉलेजचें शिक्षण मिळवितां आल्यास पहावें. मुंबईस असतांना स्वतःचें नोकरीचें काम करून एम्. सी. पी. एस्. च्या तिनी परीक्षा त्यांनीं दिल्या व एम्. बी. बी. एस्. ची पहिली परीक्षाहि ते पास झाले. नंतर ते इंटर एम्. बी. बी. एम्. च्या टर्म्स भरूं लागले. पण मुंबईची हवा त्यांच्या प्रकृतीस मानवेना. ते वारंवार आजारी पडूं लागले. ह्मणून नाइलाजास्तव एम्. बी. बी. एस्. चा अभ्यासक्रम सोडून १९२१ सालीं हैद्राबाद मेडिकल् स्कूलमध्यें अॅसिस्टंट सर्जनच्या हुद्यावर सर्जिकल रजिस्ट्रारच्या जागीं त्यांनीं आपली बदली करून घेतली. नंतर पुनः ते मुंबईस आले व तेथून पुणें, सातारा, कऱ्हाड, सौंदत्ती, बेळगांव इत्यादि ठिकाणीं त्यांच्या बदल्या झाल्या. अखेर सातारा जिल्ह्यांतील ह्मसवड गांवीं बदली झाली असतांना शुक्रवार ता. १३ जून १९३० रोजीं सकाळीं ७ वाजतां आकस्मिक रीतीनें मृत्यूनें त्यांच्यावर झडप घातली. तो प्रकार असा:—

डॉ. शंकरराव यांनीं स्वसंरक्षणार्थ एक बंदुक बाळगिली होती. या हत्याराचा उपयोग करण्याचा सराव असावा व नेमबाजी अचुक साधावी यासाठीं

निशाण मारण्याचा व क्वचित् शिकार करण्याचा अभ्यास डॉ. शंकरराव करीत असत. म्हसवड (जिल्हा सातारा) येथें त्यांची बदली झाल्यावर (ता. ३० मे) तेथें हरणाची शिकार करण्यास क्षेत्र आहे असें आढळल्यावरून व तेथील कांहीं शिकारी लोकांचें यश पाहून, त्यांनाही आपण शिकार करावी अशी 'विनाशकाले विपरीत बुद्धि' सुचली. व शुक्रवार ता. १३ जून १९३० रोजीं सकाळीं उजाडतांच ते आपल्या जोडनळी बंदुकीनिशीं शिकारीसाठीं गांवाबाहेर मैलदीडमैल दूर गेले. तेथें नुक्तेच त्यांचे स्नेही झालेले सरकारी व्हेटेरिनरी डॉक्टर त्यांचे बरोबर सोबत म्हणून त्यांनीं घेतले होते. शिकारीचा कांहींच रंग दिसला नाहीं; म्हणून प्रातःकाळचीच शोभा पहात ते उभयतां तेथेंच एका टेंकडीवर गप्पागोष्टी करीत बसले. डॉ. शंकरराव यांनीं आपली भरलेली बंदुक आपले डावे बाजूस शेजारींच ठेविली होती. थोड्या वेळानंतर समोर कांहीं अंतरावर असलेल्या पदार्थास नेम मारून पहावा अशी त्यांना इच्छा झाली व समोर लक्ष्याकडे पहात शेजारची बंदुक त्यांनीं आपलेकडे नळीच्या बाजूनें ओढून घेतली. परंतु तेथील कांहीं खडकाळ भागांत बंदुकीचा चाप अडला जाऊन दाबला गेला व बंदुकीचा सेफ्टी कॅच् उघडा राहिला असल्यानें बंदुक अकस्मात् उडाली. काडतुसांतील अनेक बारीक छरे त्यांच्या उजव्या छातींत वगैरे शिरल्यामुळें एका निमिषार्धांत बसल्या ठिकाणींच अनपेक्षित रीतीनें डॉक्टर शंकररावांचें प्राणोत्क्रमण झालें ! अशा प्रकारें प्रसंगविशेषीं संरक्षणार्थ उपयोगी पडावें म्हणून बाळगलेल्या शस्त्रानें अवचितपणें स्वतःचाच प्राणनाश व्हावा हें दैवदुर्विलसित होय. अनेक दृष्टींनीं असामान्य असलेल्या या व्यक्तीचा अंतहि असामान्यपणेंच झाला. ज्यूलिअस् सीझरची अशी एक गोष्ट त्याच्या चरित्रांत आढळते कीं त्याचा ज्या दिवशीं खून करण्यांत आला त्याच दिवशीं भोजनाचे प्रसंगीं सहज संभाषणांत उत्तम मृत्यु कोणता या विषयीं चर्चा सुरू झाली असतां सीझरनें असें उद्गार काढले कीं, 'नकळत अनपेक्षितपणें आलेला मृत्युच सर्वांत उत्तम !' (That death is best which comes most unexpected.) आणि काकतालीय न्यायानें सीझरचा मृत्यु त्यानेंच प्रतिपादलेल्या व्याख्येप्रमाणें त्याच दिवशीं त्याचेवर ओढवला हें आश्चर्य होय. ज्यूलिअस सीझरची उत्तम मृत्यूची ही व्याख्या डॉ. शंकररावाचे ठिकाणीं प्रत्ययास आली असली तरी अशा अकल्पितपणें इतक्या सद्गुणी प्रियजनाचा अकालीं वियोग घडावा हें त्यांच्या सर्व आप्तबांधवांचें हतभाग्यच म्हटलें पाहिजे. डॉक्टर शंकररावांची वाङ्मयसेवा

महाराष्ट्रिय रसिक विद्वानांच्या कौतुकादरास पात्र होईल व महाराष्ट्रहि या चतुर वाङ्मयसेवकाची स्मृति चिरकाल बाळगील असें प्रस्तुत ग्रंथाच्या वाचकास वाटल्यावांचून बहुधा रहाणार नाहीं.

**सौ. कृष्णाबाई**—या शंकररावांच्या भगिनी. यांचा जन्म १८९७ सालीं झाला. या मॅट्रिक पास झाल्या असून यांचा ट्रेनिंगचा कोर्सहि पुरा झाला आहे. प्रथम या सांगली संस्थानांत नोकरीस होत्या. त्यावेळींच ॲलेक्झांड्रियाहून शंकरराव यांनीं त्यांना पाठविलेलीं पत्रें 'एका कल्पित सभेचा मनोरम वृत्तांत' या सदराखालीं वाङ्मय-श्री-खण्डाच्या गद्यविभागांत प्रथम छापलीं आहेत. सध्यां या फलटण येथें मुलींच्या शाळेवर हेडमास्तरीण आहेत.— सौ. कृष्णाबाई यांचें सर्व शिक्षण त्यांचे पतिराज श्रीयुत शंकरराव सरदेसाई यांच्या प्रोत्साहनानेंच झालेलें असल्यामुळें त्याचें सर्व श्रेय श्रीयुत शंकरराव यांनाच आहे. श्रीयुत शंकरराव सरदेसाई हेहि फलटण येथेंच हायस्कूलांत शिक्षकाचें काम करीत असतात. वाङ्मय-श्री-खण्डाच्या गद्य विभागाच्या ८१ पृष्ठावर हितकारक बालविवाहाचा जो उल्लेख आला आहे तो करतेवेळीं लेखकाच्या मनश्चक्षूपुढें सौ. कृष्णाबाई व त्यांचे पतिराज श्रीयुत शंकरराव सरदेसाई यांचें उदाहरण असण्याचा पुष्कळ संभव आहे.

**डॉ. रामचंद्र चिंतामण श्रीखंडे,** एम्. बी.; बी. एस्.

यांचा जन्म ता. ८ जानेवारी १८९९ रोजीं शेळोली येथें झाला. हे सध्यां कोल्हापूर येथें प्रॅक्टिस करीत असतात. यांच्या वाङ्मय विषयक कामगिरीचा उल्लेख वर आला आहेच. वाङ्मय-श्री-खण्डाच्या प्रकाशनाचें काम यांनींच अंगावर घेतलें आहे. यांनीं जयदेवकविकृत संस्कृत 'गीतगोविंद' काव्याचें मराठींत सुरस श्लोकबद्ध रूपांतर 'सुश्लोक-गोविंद' नामक केलें असून तें लवकरच प्रसिद्ध होईल.

**सौ. वेणुबाई**—या डॉक्टर रामभाऊंच्या धाकट्या भगिनी. जन्म १९०१ सालीं. यांचें शिक्षण लिहिण्यावाचण्यापुरतें झालें आहे. यांचें एकच गाणें 'कृष्णरुक्मिणी-विनोद' हें वाङ्मय-श्री-खण्डांत प्रसिद्ध झालें आहे. यांचे पति श्रीयुत केशव कृष्ण पंडित बी. ए., एस्. टी. सी. हे कोल्हापुरास राजाराम हायस्कूलांत शिक्षक आहेत.

**सौ. गंगाबाई**— श्रीखंडे भावंडापैकीं या सर्वांत कनिष्ठ. जन्म सन १९०४ सालीं. यांचें मराठी शिक्षण लिहिण्यावाचण्यापुरतें झालें असून यांनीं संस्कृताचाही थोडा अभ्यास केला आहे. वाङ्मय-श्री-खण्डांत यांचीं पांच गाणीं आलीं आहेत. यांचा विवाह वे. विद्याधरशास्त्री कशाळकर यांच्याशीं झाला असून त्यांचें वास्तव्य कोल्हापूर मुक्कामीं असतें.

**कुमारी कृष्णाताई**—या डॉक्टर शंकररावांचे बंधु व माझे डेक्कन कॉलेजांतील समकालीन सहाध्यायी मित्र श्रीयुत शंकर आबाजी ऊर्फ भाऊसाहेब हुजूरबाजार यांची कन्यका. श्रीयुत भाऊसाहेब हे शंकररावांचे सख्खे धाकटे बंधु पण त्यांना हुजुरबाजार ( श्रीखंडे ) घराण्यांत दत्तक दिलें आहे. कुमारी कृष्णाताई यांचा जन्म कोल्हापुरास सन १९१२ मध्यें झाला. या सध्यां राजाराम कॉलेजांत शिकत असून गेल्या मार्चमध्यें इंटरमीजिएटच्या परीक्षेला बसल्या आहेत. हायस्कूलपासून परीक्षेंत या स्कालरशिपा व बक्षिसें मिळवीत असतात. १९३० सालीं मॅट्रिकमध्यें संस्कृत विषयांत वर नंबर आल्याबद्दल यांना अकबरनवीस स्कॉलरशिप मिळाली होती.

## श्रीयुत विश्वनाथशास्त्री शंकर कात्रे

डॉक्टर शंकरराव यांचे हे मावसबंधु. जन्म सन १८९९. वास्तव्य शेळोली. यांच्याबद्दल मागें उल्लेख आला आहेच

वाङ्मय-श्री-खण्ड हें कै. डॉ. शंकरराव यांचें एक प्रकारचें वाङ्मय स्मारक आहे. या स्मारक पुस्तकास प्रास्ताविक कांहीं तरी लिहिण्याची संधि मला दिल्याबद्दल डॉ. रामभाऊ यांचा मी फार आभारी आहें.

एल्फिन्स्टन् कॉलेज,<br>मुंबई<br>ता. ११ मे १९३२

अ. बा. गजेंद्रगडकर

# प्रकाशकांचें हृद्गत

# व

# कै. डॉ. शंकरराव यांच्या जीवनांतील कांहीं स्मृतिविशेष



प्राप्तानि दुःखान्यपि दण्डकेषु संचिन्त्यमानानि सुखान्यभूवन् ॥
—रघुवंश ( १४-२५ )

प्रस्तुत ग्रंथ रसिकांच्या हातीं देतांना अनेक सुखदुःखामिश्रित भावना आमचे अंतःकरणांत हेलावत आहेत. यांतील पद्यविभागापैकीं कांहीं काव्यें मात्र 'काव्य–श्री–खण्ड' या नांवानें प्रसिद्ध करण्याचा संकल्प १९३०च्या मे मध्येंच कै. ती. शंकरराव–आमचे प्रिय दादा–व मी यांनीं केलेला होता. परंतु अकल्पितपणें निर्घृण कालानें दादांना आमच्यांतून ओढून नेल्यामुळें 'काव्य–श्री–खण्ड' मूर्तस्वरूपांत अवतरण्याचा योग आला नाहीं. ती. दादांच्या मृत्यूनंतर बरेच दिवसपर्यंत आमच्या मनाची स्थिति 'सूर्यापाये न खलु कमलं पुष्यति स्वामभिख्याम्' यांत वर्णिल्याप्रमाणें हताश व उत्साहशून्य झाल्यामुळें आह्मी केवळ दिङ्मूढ होऊन गेलों होतों. अशा मनःस्थितींत मनास थोडा विरंगुळा वाटण्याचें साधन ह्मणजे गतबंधूंचीं आह्मांस आलेलीं पत्रेंच होत असें आह्मां सर्वांस आढळून आलें. हीं हृदयंगम पत्रें व त्यांसच जोडून त्यांच्या व आमच्या प्राकृत संस्कृत कविता–हीं एकत्र करून ग्रंथरूपानें प्रसिद्ध केल्यास आमच्या कैलासवासी बंधूंचें एक योग्य वाङ्मय स्मारक होईल असें वाटल्यावरून हें कार्य गेल्यासालीं मी हातीं घेतलें व परमेश्वरकृपेनें आणि अनेक आप्तबंधु व सुहृज्जन यांच्या निरपेक्ष सहाय्यानें हें कार्य पूर्ण होऊन 'वाङ्मय–श्री–खण्ड' या नामाभिधानानें महाराष्ट्र–वाचकांचे हातीं दिलें जात आहे. प्रस्तुत ग्रंथाची सरसनीरसता वाचक व टीकाकार ठरवितील. 'हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकापि वा' या कविवचनाप्रमाणें वाङ्मयाचें परीक्षण होऊन–तें वाचक-टीकाकारांच्या विवेचक बुद्धीच्या भट्टींतून तावून सुलाखून निघाल्यावर–हें सुवर्ण बावनकशी आहे किंवा हिणकस आहे याचा काय निर्णय केला जाईल तें एक भविष्यकाळच ठरवील. विद्वज्जनांच्या आदरास 'वाङ्मय-श्री-खण्ड' पात्र होईपर्यंत यशाबद्दल आह्मांस साशंकताच वाटणें स्वाभाविक आहे. तथापि विद्वद्वर्य श्रीयुत अश्वत्थामाचार्य बाळाचार्य गजेन्द्रगडकर, एम्. ए., एल्फिन्स्टन् कॉलेजांतील

संस्कृतचे प्रोफेसर—यांनीं आपल्या अनेकविध कार्यव्यापृतींतून सवड काढून, प्रस्तुत ग्रंथास जी मार्मिक प्रस्तावना लिहून आह्मांस उपकृत केलें आहे, तीवरून ग्रंथाच्या गुणगौरवाबद्दल आह्मांस एक प्रकारचें प्रामाणिक आश्वासनच लाभल्यासारखें वाटत असल्यास नवल नाहीं.

कै. ती. दादांच्या जीवनवृत्ताबद्दल बरीचशी माहिती प्रस्तावनेंत दिली गेलीच आहे तरीहि त्यांच्या आयुष्यांतील अनेक प्रसंगांच्या स्मृति व जिव्हाळ्याच्या गोष्टी येथें दिल्यास अप्रासंगिक होणार नाहीं. चरित्रदृष्ट्या कित्येकांस कदाचित् त्या क्षुल्लकहि वाटण्याचा संभव आहे. तथापि ग्रंथांतील त्यांचें लिखाण वाचून लेखकाविषयीं एक प्रकारचा ‘ आपलेपणा ’ वाचकाचे ठायीं ज्यावेळीं उत्पन्न होतो, त्यावेळीं असें वाटतें कीं या आपल्या लेखकाचा स्वभाव व गुणदोष यांविषयीं आपणास अधिक माहिती असावी व त्याच्या जीवनवृत्तान्तांतील विविध प्रसंगांच्या लहानमोठ्या पण खऱ्या गोष्टी आपणांस कळाव्यात. ही जिज्ञासा अंशत: तृप्त करण्यासाठीं प्रयत्न करणें इष्ट वाटल्यावरून मी यथामति लेखनास प्रवृत्त होत आहें.

दादांचे बाल्यांतील बराच काल कोल्हापुरांत गेला. कोल्हापुरांत आमचे थोरले चुलते ( आतां कै. ) ती. श्रीधर शंकर श्रीखंडे ऊर्फ आण्णा हे रहात असत. व त्यांचे चिरंजीव ती. सदाशिवराव ऊर्फ बापू हे कोल्हापुरांतील प्रायव्हेट् स्कूलमध्यें त्यावेळीं शिक्षक होते. या उभयतांच्या प्रेमळ देखरेखीखालीं दादांचें शैशव फारच उत्तमपणें गेलें. दादांवर—शंकरवर—या पूज्य वृद्ध—तरुण पिता—पुत्रांचा निरतिशय व अकृत्रिम लोभ होता. दादांची बालवयांतील हुषारी, चौकसबुद्धि, श्लोक वगैरे जलद पाठ करण्याची कुशाग्रमति, व सर्वांत विशेष ह्मणजे इतक्या गुणांस शोभणारा विनयशीलपणा, इत्यादिकांमुळें शंकर लवकरच सर्वांचा लाडका झाला. इतका कीं, वडिलमातुःश्री शेळोलीस असूनही त्यांना सोडून आण्णा व बापू यांजपाशीं शंकरनें मोठ्या सुखांत कालक्रमणा केली. मधून मधून वर्षांतून दोनतीन वेळां आमचे वडील करवीरीं कांहीं देवतोत्सवांसाठीं वगैरे येत असत त्याचवेळीं वडिलांची व त्यांची भेट होई. थोडेंसे मोठे झाल्यावर त्यांना शेळोलीस कांहीं दिवस रहावें लागलें. परंतु त्यांचे प्राथमिक शिक्षण कोल्हापुरासच झालें. नंतर इंग्रजी शिक्षणासाठीं प्रायव्हेट स्कूलमध्यें त्यांचें नांव घाळण्यांत आल्यावर त्यांची अभ्यासांत प्रगति बरी होत गेली.

त्यांचे त्यावेळचे सहाध्यायी कोल्हापुरांत आज आहेत. त्यांचे सांगण्यावरून असें कळतें कीं गोट्या, विटीदांडू वगैरे खेळांतही दादांचा हातखंडा असे! खेळांत जरी ते आपल्या प्रावीण्यानें पुढें असत, तरी अभ्यासांतसुद्धां ते कधीं फारसें मागें नसत. खेळत खेळतच अभ्यास करावा व बुद्धिमत्तेच्या जोरावर काय यश येईल तें पदरीं घ्यावें अशी त्यांची प्रवृत्ति दिसून येत होती. परंतु पुढें बी. जे. मेडिकल स्कूलमध्यें त्यांना जेव्हां प्रवेश मिळाला त्यावेळेपासून मात्र त्यांनीं अभ्यासाकडे कधींही यत्किंचितसुद्धां दुर्लक्ष केलें नाहीं. व नेहमीं परीक्षेंत पहिला नंबर कायम ठेवून आपल्या विद्येंत शक्य तें नैपुण्य संपादन केलें व त्यांच्या गुरूंचीही प्रीति या सुविद्यार्थ्यावर कायम जडली.

त्यांचा काव्यविकास लहानपणापासूनच दृष्टोत्पत्तीस येऊं लागला होता. लहान मुलींना हादग्यासाठीं एकाद दुसरें सुंदरसें गाणें त्यांनीं रचून द्यावें व मुलींनींही आपल्या इतर गानसंग्रहांत या नूतन गाण्यालाच अग्रस्थान द्यावें. यांपैकीं एक उपलब्ध गाणें या पुस्तकांत समाविष्ट केलें आहे. ( पृ. १७ पद्य विभाग ) त्यावरून त्यांचें रचनासौष्ठव स्पष्ट दिसून येतें. तसेंच, चुलते तीं. आण्णा यांनीं सांगितल्यावरून श्रीभवानी–कमलेश्वर या आमच्या कुलदैवताची आरति त्यांनीं लहानपणींच ( १९०४ त ) रचून दिली होती. ही आरति ( पृ. ८ प. वि. ) तीं. आण्णा हे आपल्या नित्य व सोमवारच्या शिवपूजेच्या वेळीं मोठ्या भक्तिभावानें ह्मणत असत. सोमवारच्या किंवा शिवप्रदोषाच्या शिवपूजेच्या आरतीचे वेळीं घरांतील सर्व लहानथोर मंडळींनीं जमावें असा तीं. आण्णांचे घरीं परिपाठ होता. [ व पुढेंही १९१४ त आण्णा कैलासवासी होई-पर्यंत हा अव्याहत चालला होता. ] पूजेस लागणारा बेल वगैरे काढून देण्याचें काम बाल शंकरकडेच असे. झाडावर चढण्याची हौस असल्यामुळें व तीं. आण्णांविषयींच्या * अत्यंत आदरामुळें हें काम दादा आवडीनें करीत.

---

* आमचे दुसरे चुलते कै. तीं. पांडुरंग शंकर श्रीखंडे ऊर्फ तात्या यांच्या विषयींही दादांचा पूज्यभाव अतिशय होता. तात्यांचा मराठी काव्य व वेदान्तग्रंथ यांविषयीं उत्तम व्यासंग होता. त्यांची वृत्ति शांत व एकाद्या तत्त्वज्ञान्यास साजेसी होती. हे मामलेदार कचेरींत कारकून होते. पण त्यांच्याविषयीं सर्वांसच फार आदर वाटे. नोकरीनिमित्त पुष्कळ वर्षें गारगोटी येथेंच त्यांचें वास्तव्य झालें दादांची वडिलांकडे आलेलीं सर्व पत्रें प्रथमत: तात्यांना लिहिलेलीं असत व तेथून तीं शेळोलीस आमचे घरीं पाठविलीं

( टीप पुढें चालू )

वर उल्लेखिलेल्या कवितांशिवाय क्वचित् एखादी कविता रचून सुवाच्य अक्षरांत देवालयाच्या तुळईवर, भिंतीवर वगैरे सहज दिसण्यासारखी लिहून ठेवण्याची हौस लहानपणापासूनच दादांस होती असें दिसून येतें. शेळोलींतील विठ्ठलमंदिराचे पुढच्या तुळीवर अशीच एक सुंदर आर्या त्यांनीं रचून लिहिलेली रस्त्यानें जातां येतां सहज दिसे व आह्मांकडून लहानपणीं वाचली जाई. ती आर्या अशीः—

गमनागमनीं सत्वर घ्या नामचि सतत रामरायाचें ॥
घ्या या एकाग्रमनें लवकरि चुकवा तरा-मरायाचें ॥ १ ॥

त्याचप्रमाणें संस्कृत भाषेचा अभ्यास करूं लागल्यावर त्यांनीं एक श्लोक रचून तेथील वे कात्रे यांचे महादेवालयाचे कीर्तिमुखावरील तुळईवर कागदावर छानदार अक्षरांनीं लिहून ती. भाऊसाहेबांचे सहाय्यानें चिकटविला होता. पुढें कित्येक वर्षें तो श्लोक तेथें टिकला होता. ( ती. दादा १९१५ त लढाईवर गेल्यावेळीं मी व मावसबंधु श्री. विश्वनाथशास्त्री यानीं त्या श्लोकाचा पुनः

---

जात. ती. तात्यांशीं झालेला दादांचा पत्रव्यवहार पुष्कळ ठिकाणीं वेदान्तविषयकही आहे. (पृ ११७ प वि टीप पहा.) तात्यांचे अन्तःकरणांत ईश्वरविषयक दृढ भक्तिभाव होता. त्यांचें भक्तिपर अभंगांचें एक शतक असून त्यांत त्यांच्या मनाची आर्तता, जिज्ञासा व अनन्य भक्ति हीं चांगलीं व्यक्त होतात. त्यांतील एकदोनच अभंग नमुन्यादाखल येथें दिल्यास आमच्या विधानाची सत्यता प्रतीत होईल:—

कैसी तुझी कृपा राहील अचल । ह्मणुनि तळमळ वाटतसे ॥ १ ॥
नाहीं मन स्थिरु नाहीं व्यवहारु । लेशही विचारु नाहीं मज ॥ २ ॥
नाहीं मज भक्ति युक्ति नाहीं देवा ! । कैशी करूं सेवा नाहीं ठावी ॥ ३ ॥
नाहीं प्रेम अंगीं वैराग्य अढळ । राहीन निश्चळ पायीं ऐसा ॥ ४ ॥
पांडुरंग ह्मणे देई भरंवसा । लक्ष्मीनिवासा ! मायबापा ! ॥ ५ ॥

❖ ❖ ❖

माझे बोल तूं कां नायकसी माये ! । घेई लवलाहे ओसंगासी ॥ १ ॥
सोळा प्रहर माते ! दुःख करी बाळ । याची कळवळ ह्मणूनियां ॥ २ ॥
ओसंगीं न घेणें यांत माझें हित । आहे कां अनंत गुरुमाये ? ॥ ३ ॥
ह्मणुनियां मज दुरीं टाकियेलें । सांग गे कनवाळे माउलीये ! ॥ ४ ॥
साहवेना मज वियोग दुःसह । तुज गे ! सुसह कैसा झाला ? ॥ ५ ॥
आजवरी जे जे केले मनोरथ । ते ते तूं त्वरित पूरवीले ॥ ६ ॥
आतां कां गे ! हट्ट धरिलासी माये ! । सांग गे ! सदुपाये मजलागीं ॥ ७ ॥
पांडुरंग मूल झालें कासावीस । घेईं ओसंगास झडकरी ॥ ८ ॥

जीर्णोद्धार केल्याचें स्मरतें!) तो श्लोक संस्कृत विभागाच्या आरंभींच दिला असून (पृ. ९५) येथेंही पुनः देत आहे.

तृष्णापानीयपूर्णे मदगुरुपवनोद्धूतमोहोर्मिमाले
दाराद्यावर्तयुक्ते सहजसुतसुहृद्ग्राहसंघाकुले च
संसाराख्ये पयोधौ भवतु पशुपतिर्मज्जतां नाविको नः
श्रीगौरीशंकरस्यांघ्रियुगकमलयोर्भक्तिनौकां ददातु ॥ १ ॥

हा श्लोक ज्यावेळीं रचला गेला त्यावेळीं या नवकवीचे मनश्चक्षूपुढें 'मुकुंदमाला' स्तोत्रांतील पुढील श्लोक असावासें दिसतें. उभय श्लोकांतील कल्पनासाम्य व शब्दसादृश्य सहजच दिसून येणारें आहे. फक्त, दादांचा श्लोक स्तोत्रश्लोकाची सुधारून वाढविलेली आवृत्ति आहे असें मात्र खास ह्मणतां येईल. तो श्लोक असाः—

तृष्णातोये मदनपवनोद्धूतमोहोर्मिमाले
दारावर्ते तनयसहजग्राहसंघाकुले च
संसाराख्ये महति जलधौ मज्जतां नस्त्रिधामन्
पादांभोजे वरद! भवतो भक्तिभावं प्रदेहि ॥ —बृहत्स्तोत्ररत्नाकर

या दोनी श्लोकांची तुलना करून पहातां मंदाक्रांता वृत्ताचें स्रग्धरेंत कौशल्यानें रूपांतर केल्याचें आढळून येतें. शिवाय बुडणाऱ्यास नौकेचा उपयोग अधिक असल्यामुळें श्रीशंकराच्या पदपद्मभक्तीची नौका मिळावी अशी प्रार्थना या नवकवीनें केली आहे व हीच मूळ श्लोकार्थांत घातलेली भर होय. दादांच्या संस्कृत श्लोकसंग्रहांत क्वचित् एकादा श्लोक असा आढळून येईल कीं, जो रचित असतां कवीचे अंतरंगांत पूर्वकवीचा एकादा तत्सदृश श्लोक घोळत असावा. या माझ्या विधानाचें मला दुसरें जें एक उदाहरण आढळलें आहे, तेंहि येथेंच देतों. वाङ्मय- श्री-खण्डांत (पृ. १०१ प. वि.) पुढीलप्रमाणें दादांचा एक सुंदर श्लोक आहे. मुंबईच्या बॅकबेवरील रमणीय दृश्य वर्णितांना ते ह्मणतातः—

तीरे तरुण्या वदनं सुहासं नीरे तरण्यां रमणं च भर्तुः ।
आलोक्य धावत्युभयत्र मुग्धा कटाक्षमालाऽधरपानलुब्धा ॥ ८ ॥ —तृतीयपुष्पम्

हा श्लोक रचतांना कवीस जगन्नाथपंडितांच्या भामिनीविलासांतील पुढील श्लोकाची जाणीव असलीच पाहिजे असा तर्क कोणासही करतां येईल.

तीरे तरुण्या वदनं सहासं नीरे सरोजं च मिलद्विकासम् ॥
आलोक्य धावत्युभयत्र मुग्धा मरन्दलुब्धालिकिशोरमाला ॥२१॥ —शृंगारविलास

या दोन्ही श्लोकांवरून पहातां असें दिसतें कीं, दादांनीं क्वचित्स्थळीं पूर्वीच्याच एकाद्या चांगल्या श्लोकाचें वर्ण्यप्रसंगानुरोधानें रूपांतर केलें आहे. व तें शोभूनही गेलें आहे. प्रथम हीं स्थलें प्रस्तुतलेखकास माहित नव्हतीं परंतु नंतर सहज आढळांत आलीं. व त्यांवरून नूतनकवीचें रूपांतरकौशल्य दृष्टोत्पत्तीस येऊन नवलही वाटलें. पूर्व कवींचें ऋण अशाप्रकारें या कवीनें प्रारंभीं कोठें कोठें एकाददुसऱ्या स्थळीं घेतलें असलें तरी इतरत्र अनेक ठिकाणीं या लेखकाची स्वतंत्र प्रतिभा उज्ज्वळपणें विलसत असलेली कोणाही रसिकास दिसून येईल. बाकी कवीनें केलेली हातचलाखी जितकी अधिक बेमालूम साधेल तितकें त्याचें अधिक कौशल्य. ह्मटलेंच आहे —

नास्त्यचौर: कविजन: नास्त्यचौरो वणिग्जनः ।
स नंदति विनावाच्यं यो जानाति निगूहितुम् ॥ —राजशेखर

कवि काय किंवा व्यापारी काय? दोघांनाही थोडी लबाडी लागतेच! पण ती ज्याला सफाईनें लपवितां येते त्यानें खुशाल उजळ माथ्यानें मिरवावें! परंतु प्रस्तुत स्थलीं गोपनाचा प्रयत्नच मुळीं केलेला आढळत नाहीं.

दादांच्या काव्यांतील विनोदी छटाही मूळपासूनच दृष्टीस पडते. तसल्या कवितांचे दोनतीन उतारे मला येथें देता येतील. या कविता त्यांनीं स्वत: कोठेंही लिहून ठेवलेल्या नाहींत, परंतु मुंबईमध्यें १९१८ सालीं आह्मी असतांना, त्यांच्या लहानपणींच्या अनेक कथा त्यांच्या तोंडून ऐकण्याचें मला साहजिकच कुतूहल असल्यामुळें त्यास अनुसरून मी त्यांना पृच्छा केल्यावर आपल्या कांहीं कविता त्यांनीं स्मरणांतून मला ज्या सांगितल्या त्या मला मौजेच्या वाटल्यावरून मी सहज टिपून घेतल्या होत्या. तें टिपणच या कवितांना आधारभूत आहे. या कवितांचे प्रसंगहि नेहेमींचेच असले तरी गमतीचे आहेत.

कोल्हापुरांत दादा शिकत असतां रा. सदाशिवरावबापू श्रीखंडे यांचे बिऱ्हाडीं रहात असत हा उल्लेख मागें आलाच आहे. त्यावेळीं त्यांचेबरोबर बंधु, चुलतबंधु व इतरही कांहीं विद्यार्थी असत. हीं सर्व मंडळी ज्या माडीवर निजत तिचा केर काढण्याचे कामीं वाद होऊं नयेत ह्मणून मंडळींनीं एक क्रम ठरविला होता. मार्जनाचें हें नित्य कृत्य करण्यास सर्वतोपरी लायक असे तेथें सहा युवक होते. गुरुवारपासून मंगळवारपर्यंत सहा वार क्रमानें एकेकानें केर काढावा व प्रत्येक बुधवारचा केरही त्याच अनुक्रमानें काढावा असें ठरवून हा क्रम दादांनीं विनोदानें श्लोकबद्धहि केला होता तो असा:—

जनु: शंकरो बापुरावश्च दत्तु: स वासुस्तथा माधवो मार्जनेऽत्र ।
गुरोर्वासराद्भौमवारान्तमेव बुधेऽनुक्रम: सर्वदा पालनीय: ॥ १ ॥

नंतर सर्वांनीं कोणत्या जागीं व कसें निजावयाचें, कोणाचीं इंथरुणें पूर्वपश्चिम व कोणाचीं दक्षिणोत्तर असावयाचीं याचाही क्रम त्यावेळीं दादांनीं असाच गोंविलेला आहे ! मात्र तो श्लोक 'प्राकृतसंस्कृतमिश्रित कंथे' सारखा असून त्यांत विनोद भरपूर आहे:—

वासू गोंदू शंकरू दत्तु तात्या माधो अण्णा बापु जनूबा तसेच
अंत्या दोघां दक्षिणोदीचि निद्रा शेषा: सर्वे पूर्वपश्चीम आहु: !! ॥२॥

यांपैकीं एक व्यक्ती ढेंकणाच्या त्रासामुळें बेजार होऊन, मध्यरात्रींच उठे व बारकाईनें ढेंकूण हुडकून काढून त्यांचा संहार करीत असे. पण एवढ्यानें ते प्राणी कुठले कमी व्हायला ? दादांनीं त्या पराक्रमाचें वर्णन थट्टेनें असें केलें आहे:—

घालोनि खालीं मुंडी धुंडी पाताळ ढेंकणाकरितां ।
मारी जरि बहु परि तरि करितां नच येइ एक ठाव रिता ! ॥३॥

शेळोलींत आमच्या एका मावस बहिणीच्या लग्नांत ( १९०३ ) जामातांचे पक्तीस दादांनीं एक श्लोक रचून ह्मटला. वास्तविक तो श्लोक अत्युत्तम आहे. परंतु त्याच्या दुसऱ्या ओळींतील 'मोठे सज्जन' या शब्दांबद्दल पाहुणेमंडळींतील कांहीं 'तज्ञ' रागावले. कांहींना ही व्याजस्तुति वाटली व कांहींनीं तर त्यांचा 'मोटेच्या उपयोगी जन' असा भलताच अर्थ कल्पून गैरसमज करून घेतला. मोठ्या प्रयत्नानें पाहुण्यांची समजूत कशीबशी काढण्यांत आल्यावर दुसऱ्या दिवशींच्या पंक्तींत दादांनीं पुनः एक आर्या ह्मणून पाहुण्यांनीं निष्कारण आलेला राग घालवावा अशी विनंति केली. तो श्लोक व आर्या येथें दिलीं आहेत:—

आधीं लग्न मुळीं सुखप्रद, तयामाझारि हे पाहुणे
मोठे सज्जन, त्यांतही नच दिसे साहित्य कांहीं उणें !
जोडा योग्य असा न देइल कसा संतोष सर्वां जनां
ही ज्याची करणी, वदा तरि ह्मणीं तन्नामसंकीर्तना ॥ १॥
आला कोप वृथा मम वचनें तो आजि पाहुणे ! शमवा
अन्नरसा सेवुनियां हरिनामें आपुल्या मना रमवा ॥ २ ॥

कोल्हापुरांत इंग्रजी शिक्षण चालू असतां वेळोवेळीं ज्या सुट्या मिळत त्या ती. दादांनीं शेळोली गांवीं घालविल्या. तेथें त्यांचा काळ अतिशय आनंदांत जात असे. सुटीच्या दिवसांत आमचे बंधु गांवीं आले ह्मणजे तेथें

अनेक प्रकारचे खेळ सुरू होत. व त्यांमुळें खेड्याचें संथ वातावरण आनंद-तरंगांनीं भरल्याप्रमाणें दिसे. प्रायः सकाळीं तेथील वेदगंगेंत स्नानास जाण्याचा कार्यक्रम नित्याचा होता. या नदींत कांहीं ठिकाणीं पोहण्यास उत्तम जागा आहेत. तेथें पाण्यांत पुष्कळ डुंबणें व पोहणें हा दादांचा व त्यांचे बालगोपाल मित्रगणांचा नेहमींचा व्यवसाय असे. क्वचित् डोंगरांत जाऊन पळसाचीं, वडाचीं वगैरे पानें पत्रावळींसाठीं आणण्याचें घरचें कामहि दादांवर पडे. लहानपणीं पत्रावळी लावण्यांतसुद्धां त्यांचा हात इतरांपेक्षां फार जलद चाले. एकदां तर त्यांनीं एका बैठकीस पत्रावळींचें एक शतक तयार केल्याशिवाय जेवायचें नाहीं अशा निश्चयानें बसून शतक पूर्ण केलें! लहानपणीं हस्तकौशल्यानें इतक्या पत्रावळी तयार करणारा बालक पुढें थोरपणीं वाङ्मयांतही शेंकडों पत्रावली (पत्रांच्या पंक्ति) सर्वोत्कृष्ट अशा रचील, असें जर त्यावेळीं कोणी तज्ञ गर्गाचार्यांनीं भाकीत केलें असतें तर तें पूर्णांशानें खरेंच झालें असतें असें आतां आपणांस ह्मणतां येईल. कारण दादांनीं लिहिलेलीं पत्रें तशींच अलौकिक आहेत. दोनप्रहरच्या जेवणानंतर वे. मू. शंकर रामचंद्र कात्रेशास्त्री ऊर्फ आप्पा, (आमचे मावसबंधु श्री. विश्वनाथशास्त्री यांचे वडील,) यांचेकडे कांहीं वेदाध्ययन करण्यासाठीं व संस्कृत काव्यादि पठनासाठीं जाण्याचा दादांचा नेम असे. आप्पांजवळ दादांनीं सर्व सुट्यांत मिळून सौर, पुरुषसूक्त, श्रीसूक्त, रुद्र, पूजा, वैश्वदेव वगैरे ह्मटलीं व अमरकोश, रघुवंश, भारतचंपू इत्यादींचेंही थोडेंबहुत अध्ययन करून संस्कृत भाषेंत बरीच प्रगति केली. दादांनीं पुढें कित्येक पत्रांतून गुरुवर्य आप्पांविषयीं आदरयुक्त व कृतज्ञतेचे उद्गार काढले आहेत. दादांची बुद्धि, स्मरणशक्ति व शिकण्याची आवड हीं असामान्य असल्यामुळें ते हातीं घेतलेला कसलाही विषय सहज आत्मसात् करीत. सायंकाळीं ४ वाजल्यानंतर बहुधा विटीदांडूचा किंवा दुसरा कसला तरी सामुदायिक खेळ सुटीच्या दिवसांत चाले, व अस्तसमयास सर्व मंडळी नदीच्या घाटावर संध्यावंदनास जमत. त्यावेळीं केव्हां केव्हां, तेथेंच चुना बनविण्याचें दगडी चाक आहे तें उचलण्यांत या युवकजनांची एक प्रकारची सात्त्विक अहमहमिकाही चाले. कधीं कधीं नदीच्या पलीकडे कोणाचा दगड पोंचतो या विषयींही या संवगड्यांत चढाओढ लागे. बहुतेक सर्व प्रकारच्या खेळांत दादांचा गुणानुक्रम प्रायः वर असे. संध्यावंदनानंतर सर्वजण रामरक्षास्तोत्र मोठ्यानें ह्मणत नदीवरून घरीं येत. इतर कांहीं स्तोत्रें वगैरे ह्मणून रात्रौ भोजनोत्तर गप्पागोष्टी होऊन

दादांचा दिवसाचा कार्यक्रम खलास होई. व अशा तऱ्हेच्या खेळांत व तेथील ऊंस, आंबे, फणस, जांभळें, करवंदें, बोंडू, हासोळया, हाळू इत्यादि इत्यादि ऋतुमानाप्रमाणें लाभेल त्या खाद्यांचा यथेच्छ आस्वाद घेण्यांत दादांच्या सुट्या केव्हांच संपून जात व पुनः अभ्यासाचे व शाळेचे दिवस चक्रनेमिक्रमानें उगवत. शेळोलींतील रहिवासाचा अशाच प्रकारचा आनंदाचा काल, ती. दादांना सरकारी नोकरींत असतां हक्काची रजा घेऊन वर्षदोनवर्षांनीं 'शैलाली'कडे आल्यावर प्राय: अनुभवावयास मिळे.

सन १९०३ नोव्हेंबर मध्यें मॅट्रिक झाल्यानंतर राजाराम कॉलेजांत त्यांनीं नांव दाखल केलें. डॉ. शंकरराव यांचा विवाह १९०४ सालीं ते पी. ई. मध्यें असतांना झाला.* प्रीव्हिअसच्या टर्म्स भरल्यानंतर पुण्याच्या मेडिकल स्कूलमध्यें त्यांनीं प्रवेश केला. व उत्तम प्रकारें यश मिळवून त्यांनीं १९०७ सालीं हॉस्पिटल असिस्टंटच्या नोकरीस आरंभ केला. प्रथम कांहीं काल त्यांना पुण्यासच रहावें लागलें व तेथें त्यांनीं सकुटुंब बिऱ्हाड केलें. पगार दरमहा अवघा २५ रु. असल्यामुळें, अगदीं काटकसरीनें वागून त्यांनीं आपल्या स्वतंत्र संसारास सुरवात केली. त्यांच्या एका पत्रांत (पृ. २८) सौ लवंगीबाईंचें 'काटकसर' या विषयावर जें मननीय व्याख्यान आहे त्यातील मूलतत्त्वें शंकररावांनीं स्वत: या वेळेपासूनच योग्य निश्चयानें अमलांत आणण्याचा ओनामा सुरू केला. छानछोकी व मूर्खपणाचे ऐषआराम यांचें सेवन त्यांनीं कधींच केलें नाहीं. नाटक व सिनेमा यांसारख्या करमणुकींचे पायीं कवडीही खर्च न करण्याचा त्यांचा प्रथमपासूनच कटाक्ष असे. निदान ही वृत्ति त्यांच्या आरंभीच्या अल्प पगाराच्या कालांत अतिशय दृढ होती. व मलाही लहानपणीं एकदां कांहीं इतर मंडळीबरोबर मी नाटकास निघालों असतां त्यांनीं रागें भरून राहविलें. त्यावेळीं माझ्या निराशेबद्दल मला फार वाईट वाटलें असलें तरी आतां त्या त्यांच्या रागें भरण्याबद्दल मला अत्यंत आदरच वाटतो!

---

* त्यांच्या पत्नीचें नांव लक्ष्मीबाई. या पन्हाळ्याचे कै. गोपाळराव सबनीस यांच्या कन्या होत. दादांच्या अपत्यांपैकीं सर्वांत वडील चि. सौ. शांताबाई-हिचा विवाह १९३० मे मध्यें श्री. कृष्णराव भागवत यांचेशीं झाला. दुसरें अपत्य चि. गजानन हा एफ्‌ वाय्‌ ए. होऊन बी. जे. मेडिकल स्कूलमध्यें नुक्ताच गेला आहे. याशिवाय चि. सिंधू, सरोजिनी व श्रीकृष्ण हीं अपत्यें लहान असून अनुक्रमें १०, ८ व ६ वर्षांचीं आहेत.

त्यांच्या आयुष्याच्या सर्व कालांत ते जेथें जेथें म्हणून गेले तेथें तेथें ते आपल्या अंगच्या अनेक गुणांनीं लोकप्रियता सहज पावले. वक्तृत्व सहजसुंदर, संभाषणाची शैली मार्मिक व हृदयंगम, विनोद सभ्य व बहारीचा, स्वभाव आनंदी व मनमिळाऊ व वैद्यकींत चांगलेंच नैपुण्य व परोपकारशीलता इत्यादि गुणसमुच्चयामुळें त्यांच्याविषयीं सर्वांसच सादर प्रेम वाटत असल्यास नवल कसलें ? साहित्याप्रमाणेंच त्यांची संगीताचीहि आवड प्रशंसनीय होती. विशेषत: सतारवादनांत त्यांनीं बरेंच कौशल्य संपादन केलें होतें. १९१५ त अलेक्झांड्रिआ येथें गेल्यावर तिकडे त्यांनीं एक व्हायोलिन् विकत घेऊन तेंही वाजविण्याचा परिपाठ केला होता. बुद्धिमत्ता, ज्ञान, वक्तृत्व, थोडेंसें संगीत-नैपुण्य व अंतःकरणांतील परमेश्वरविषयक दृढ भक्तिभाव इत्यादि गुणांचा सुंदर मिलाफ त्यांच्या ठायीं झाल्यामुळें त्याना क्वचित् कीर्तनेंहि करावींशीं वाटत. मोठी रजा घेऊन ते कोल्हापुरास आले म्हणजे एखाददुसरें सुरस आख्यान बसवून आपले घरींच आप्तेष्ट व कौटुंबिक मंडळींत त्यांचें कीर्तन होत असे. ध्रुवचरित्र, अंबरीषाख्यान व सुभद्राहरण या सुप्रसिद्ध कथाधारें त्यांचीं कीर्तनें ऐकण्याचें भाग्य मला लाभलें होतें. भक्तिप्रेमविषयक एकादी कथा सांगावयास त्यांनीं प्रारंभ केला कीं त्यांच्या मनोहर वक्तृत्वशैलीनें श्रोतृवृंद सहज तन्मय होई. कथेंतील भक्तिभावनेच्या उत्कट प्रसंगीं त्यांचा कंठ इतका सद्गदित व्हावा कीं, त्यांना व श्रोत्यांनाही डोळ्यांतून येणारे सात्त्विक प्रेमाश्रु आवरणें जड जावें. तो सुखसोहळा पाहण्याचा व अनुभवण्याचा योग लाभल्या-मुळें लेखकास एक प्रकारची धन्यता वाटते; तसेंच पुनरपि तें सौख्य आपणास कधीं लाभणार नाहीं याबद्दल विषण्णताही मनास जाच देते.

गुर्लहोसूर येथील सुप्रसिद्ध वेदान्ती कै. खंडो कृष्ण ऊर्फ बाबा गर्दे यांचा व आमचे वडिलांचा पुष्कळच पूर्वीपासूनचा ऋणानुबंध होता. सौंदत्ती येथें ती. दादाचें सन १९२३ ते १९२८ पर्यंत वास्तव्य होतें. गुर्लहोसूर गांव सौंदत्तीहून अवघा ३–४ मैलच दूर आहे. येथें असतांना दादा व बाबा गर्दे यांचा परिचय अधिक दृढ झाला. दादांना मुळचीच वेदान्ताची आवड अस-ल्यानें बाबांसारख्या ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध सज्जनाच्या सहवासाचा मधून मधून येणारा काल दादांना अतिशयच आनंददायक वाटल्यास नवल नाहीं. गुर्लहोसूर येथें चिदंबरस्वामींच्या उत्सवप्रसंगीं केव्हां केव्हां दादांचीं प्रवचनेंही होत असत.

त्यांचें विषयप्रतिपादनाचें कौशल्य असामान्य होतें व त्यामुळें हीं प्रवचनें फारच सुंदर होत असावींत. विशेषतः डॉक्टरी पेशाच्या गृहस्थाकडून धर्मविषयक, भक्तिपूर्ण व विचारपरिप्लुत प्रवचनें ऐकावयास लाभणें ह्मणजेच आधीं सर्वांस आश्चर्याचें वाटत असलें पाहिजे. केव्हां केव्हां सदरहु कथाप्रसंगीं कै. बाबा गर्दे हेही श्रोतृवृंदांत असत व ते या अभिनव प्रवचनकारांची मनःपूर्वक तारीफ करीत.

दादांचें मराठी भाषेवर जितकें प्रभुत्व होतें, तितकेंच इंग्रजी व हिंदी या दोन भाषांवरही होतें. संस्कृतच्या त्यांच्या नैपुण्याबद्दल त्यांची संस्कृत कविताच साक्ष देईल. पण या चार भाषांशिवाय कर्नाटकांत त्यांचा बराच काल गेल्यामुळें त्यांना कानडी भाषाही समजण्याइतकी व बोलतां येण्याजोगी अवगत होती. अलेक्झांड्रियांत असतां अरबी भाषेचा त्यांनीं थोडकाच पण पद्धतशीर अभ्यास चालू केला होता. हरएक प्रकारें आपलें ज्ञान वाढवावें हाच श्लाघ्य हेतु त्यांच्या अनेक कृतींत दिसून येतो. ज्योतिषविषयक ज्ञान त्यांनीं विद्यार्थि-दशेंतच संपादन केलें होतें. विशेषतः ग्रहज्योतिष, कुंडलिज्ञान, व थोडेंसें फलज्योतिष यांची त्यांनीं प्रयत्नपूर्वक माहिती करून घेतली होती. सुतारकामाचीं पुष्कळ आयुधें त्यांनीं घरींच बाळगिलीं होतीं व घरचें सर्व किरकोळ सुतार-काम ते स्वतः करीत. पुढें शिवणकलेचीही त्यांनीं कांहीं माहिती मिळविली व त्यांच्या एका स्नेह्यांनीं त्यांना शिवण्याचें मशिन बक्षिस दिल्यानें, त्या यंत्राचा उपयोग घरगुती लहानसहान सर्व कपडे शिवण्याकडे ते करीत असत. व हें सर्व त्यांच्या काटकसरीच्या पोक्त धोरणास साजेसेंच होतें. अनेकदां प्रथम प्रथम, स्वतःच शिवलेले ओबडधोबड कपडे त्यांना घालावे लागत, पण असें करतांना स्वावलंबनाचें 'सूत्र' त्यांत गोंवलें असल्यामुळें त्यांना खरोखर आनंद वाटत असे. घरच्या मंडळींनाही या यंत्राचा उपयोग करण्यास त्यांनीं शिकविलें होतें. केवळ करमणुकीच्या खेळांचाच विचार केला तर दादांना कितितरी प्रकारचे कितितरी खेळ चांगले येत असत. पत्ते, गंजिफा, सोंगट्या, ड्राफ्टस वगैरेमध्यें त्यांचें पटुत्व दिसेच. पण विशेष आवडीचा खेळ ह्मणजे बुद्धिबळें होत. अलेक्झांड्रि-यांतील त्यांच्या संस्मरणीय कालांत या क्रीडेचा व्यासंग वाढविण्यासाठीं नामांकित बुद्धिबळपटूंचे इंग्रजींतील ग्रंथ घेऊन त्यांनीं आस्थापूर्वक अभ्यास चालविला होता. व पुण्यास असतां प्रो. अभ्यंकर व त्यांचे बंधु श्री. बळवंतराव या निष्णात खेळाडूंशीं खेळण्यांत त्यांचा रिकामा वेळ बराचसा जात असे. याशिवाय

त्यांच्या आवडीचा एक विशिष्ट व्यासंग म्हणजे बाग बनविणें. जागा व पाणी असल्यास स्वतः राबून निरनिराळ्या प्रकारचीं उपयुक्त व शोभिवंत झाडें ते बहुधा लावीत असत. डोंगरी जेल कार्टर्समध्यें रहात असतां (१९१८ ते १९२१) त्यांनीं असेंच एक तेथें लहानसें उद्यान बनविलें होतें. ( पृ. १०८ प. वि. श्लोक २ तत्संबंधींच आहे. ) अलेक्झांड्रियांत असतांना त्यांनीं मुद्दाम इकडून तुळशीचें बी मागवून घेतलें होतें व तिकडील रेताड जमिनींत त्यांच्या समुद्र-काठच्या कँपाशेजारीं तें लावून त्यांनीं अंकुरांची जोपासना यत्नपूर्वक चाल-विल्याचें त्यावेळच्या कांहीं पत्रांतून त्यांनीं उल्लेखिलें आहे. या एकाच गोष्टी-वरून त्यांचा मनाचा कल व्यक्त होतो. अलेक्झांड्रियांत असतांना ते नेमानें भगवद्गीता व एकनाथी भागवत वाचीत असत. वृक्षसृष्टींतील त्यांनीं वाढविलेले अंकुर आज नष्ट झाले असले तरी शारदेच्या उपवनांतील त्यांचे वाङ्मयांकुर चिरकाल आनंद देत राहतील असे गुणवान व ओजस्वी आहेत.

आपल्या कृतींत बुद्धिचातुर्य प्रकट करावें अशी आवड त्यांचे ठायीं स्पष्ट दिसून येते. कांहींही लिहावयास घेतलें तरी हस्ताक्षर, वाक्यरचना, इत्यादि-कांमध्यें त्याचें सहजसौष्ठव दिसून येई. १९२१मध्यें ते हैद्राबाद सिंध येथें असतां तेथून त्यांनीं एक पोस्टकार्ड मला लिहिलें असून, त्यांत ते सिंधमध्यें भूगर्भांत सांपडलेल्या प्राचीन देवळांचे अवशेष पहावयास गेल्याच्या वेळचें वर्णन त्यांनीं केलें आहे. परंतु विशेष नवलाची गोष्ट ही कीं, या कार्डांत बारीक पण सुवाच्य अक्षरांत इतका मजकूर आहे कीं, त्याची टाईपरायटरवरून मी नक्कल करून पाहिली तो फूल्सकॅप तावांचे तीन बंद भरले. शिवाय या कार्डांत एकही खाडाखोड नाहीं. त्यांचा नेहमींचा विनोद, वर्णनकौशल्य, ज्ञानलालसा, चिकित्सकबुद्धि व प्रतिभा हे गुण त्या वर्णनांत सहज उतरले आहेत. या पत्रां-तील बहुतेक सर्व मजकूर येथें व पुढें टीपेंत दिला आहे.* आमच्या अल्पस्वल्प

---

* I wonder if you will like the following:

Hirabad, Hyderabad Sind 1st March 1921

*Dear Rambhau,*

I have received no letter from you for the last fortnight. I hope to hear from you in the near future. If you be busy with your studies, then it's alright.

Day before yesterday, I had been to Mirpurkhas, a town 63 miles off Hyderabad, to see some ancient temples dug out of earth.

कै. ती. दादांच्या स्वभावांतील दोषच लिहावयाचे तर हेच कीं ते चहा व सिगरेट्स यांचा केव्हां केव्हां अतिरेकानें उपयोग करीत असत. तथापि हे दोष टाळावेत असे त्यांचे प्रयत्न नेहमीं चालू होते. व केव्हां केव्हां मनोनिग्रहानें त्यांना कांहीं काल यशहि येई. एका पत्रांत (ता. २०-३-२४) सौंदत्तीहून त्यांनीं मुंबईस मला असें लिहिलें आहे:—'I am glad to let you know that I have left off tea and smoking for the last fortnight. I cannot boast of having shaken them off till another month is past.'! तसेंच ते केव्हां केव्हां काम करूं लागले म्हणजे अतिशय उत्साहानें, जागरणें करूनहि काम करीत. अर्थात् या अनियमितपणाचा क्वचित् अतिरेक होऊन त्यांच्या प्रकृतीवर–पचनशक्तीवर–वाईट परिणाम होत असे. विशेषतः मुंबईच्या हवेंत असल्या अनियमितपणाचाच परिणाम त्यांना फार जाणवला व मुंबई त्यांना सोडावी लागली. इतरांस नियमितपणें वागा म्हणून उपदेश करणारे डॉक्टर स्वतःच असें वागूं लागले तर त्यांना असें वागूं नका म्हणून कोणी सांगायचें? क्वचित् त्यांच्या निश्चयी स्वभावाच्या अतिरेकाचें कांहींशा हेकेखोरपणांतहि पर्यवसान होई, परंतु असले प्रसंग अगदींच अल्प असत. व 'एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः ॥' अशा प्रकारचें त्यांच्या दोषांस स्वरूप येत असे. साहस करण्याकडेहि त्यांची प्रवृत्ति केव्हां केव्हां दिसते. मूळची नोकरी 'सिव्हिल' बाजूची असतां १९१५ च्या डिसेंबरमध्यें लष्करी बाजूकडे त्यांनीं आपली स्वखुषीनें तात्पुरती बदली करून घेतली. व ही घटना सर्व निश्चित झाल्यावर मग वडिलमातुःश्रींकडे शेळोलीस कळविली! सुदैवानें ते अलेक्झांड्रिया येथें 'बेस हॉस्पिटल'मध्येंच राहिले व १९१६ एप्रिलमध्यें परत हिंदुस्थानास सुखरूप आले. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या लष्करी छावणींत अनेक उत्तमोत्तम पत्रें लिहिण्याइतकें मनःस्वास्थहि त्यांना लाभलें. तरी त्यांच्या काव्यमय पत्रांत (प. वि. पृ. १०६ श्लोक ७–८) एकदोन ठिकाणीं 'शक्तोऽस्माकं रक्षणे देव एकः' '–स हि विधुधरः शंकरो रक्षिता मे' अशा प्रकारचें वर्णन त्यांनीं लिहिलें आहे, तें त्यावेळची परिस्थिति भीषण होती हेंच दाखवितें.

वर्तमानपत्रें व मासिकें वगैरेसाठीं ते फारसे कधीं लेख लिहीत नसत. तथापि 'चित्रमयजगत्'च्या १९२६ नोव्हेंबरच्या अंकांत 'मुलगा होणार कीं मुलगी?' या मथळ्याचा एक लेख त्यांनीं लिहिला आहे. गर्भाचें लिंग कोणत्या प्रकारचें आहे किंवा असेल हें ठरविण्याचें साधन शास्त्रज्ञांना अद्याप

शोधून काढतां आलेलें नाहीं. या महत्त्वाच्या प्रश्नाविषयीं त्यांनीं स्वतःच्या व इतर कांहीं अनुभवांवरून बसविलेली उपपत्ति व नियम या लेखांत त्यांनीं मांडलेले आहेत. ते अनुभवास कितपत येतात याची प्रचीति जिज्ञासूंनीं अवश्य पहावी.

अशाच शोधकबुद्धीनें त्यांनीं लिहिलेला ' इतिहास पुराणांतील ' नाग '' या नांवाचा एक छोटासा निबंध ' महाराष्ट्रांतील साप ' या आपल्या ग्रंथाच्या परिशिष्टांत लेफ्टनंट कर्नल डॉ. खं. ग. घारपुरे, बी. ए. आय्. एम्. एस्. यांनीं आभारपूर्वक घेतलेला आहे.

याशिवाय वैद्यकीय स्वरूपाचे त्यांचे कांहीं कांहीं नवीन लेख 'अँटिसेप्टिक' या वैद्यकीय मासिकांत आलेले आहेत. तसेंच ' हॉस्पिटल् असिस्टंट ' नामक एका पूर्वीच्या नियतकालिकांतहि त्यांचें लेखन कधीं कधीं येत असे.

त्यांचे ' मनाचे श्लोक सन १९२० चे सुमारास संपूर्ण तयार झाले असले तरी ते १९३० मेमध्यें ' मासिक मनोरंजन 'कडे त्यांनीं पाठविले व त्यांच्या आकस्मिक मृत्यूनंतर दोनच दिवसांनीं ते मे-अंकांत प्रसिद्ध होऊन आह्मांस मिळाले ! 'मना'चे श्लोक हे मराठींतील ' लीलानुकरणा 'चें ( Parody या शब्दास ' रागिणी 'कर्त्यांनीं सुचविलेला शब्द – ) विनोदप्रचुर असें एक उत्कृष्ट उदाहरण होईल. ( प. वि. पृ. ११ )

असो. कै. ती. दादांच्या विषयींच्या स्मृतिविशेषांत ' फोलपटांत सुखाचा दाणा ' हुडकावा तसें कांहीं आनंददायी सांपडेल या दृष्टीनें हें शब्द-चित्र रेखाटण्याचा मी येथवर प्रयत्न केला. या वर्णनांतील माझ्या गुणदोषांकडे हंसक्षीरन्यायानें रसिकांनीं पहावें अशी त्यांस माझी सविनय प्रार्थना आहे. ' गन्तुर्हि स्खलितं भवेत् ' या नियमाप्रमाणें माझ्या कांहीं चुका झाल्याच असतील. पण याहूनहि ' आपलें स्वतःचें असेल तेवढें आपणांस उत्तम वाटतें ' या मनुजस्वभावाप्रमाणें मजकडे कै. ती. दादाचें वर्णन करतांना अत्युक्तीचाहि कांहीं दोष येणे संभवनीय आहे. हे दोन्हीहि दोष टाळण्याची मी शिकस्त केली असली तरी आमच्या कृतींतील कांहींशा अपरिहार्य वैगुण्यांकडे निदान सहृदय वाचक क्षमाशील अंतःकरणानें पहातील असा मला भरंवसा वाटतो.

' वाङ्मय-श्री-खण्डां 'तील कै. ती. दादांचे लिखाणांत समर्पक शीर्षकें देणें, व्याकरणदृष्ट्या कांहीं अशुद्धें दुरुस्त करणें, अति खासगी मजकूर इ. गाळणें, व कांहीं टीपा देणें यापलीकडे कोणताच फेरफार केलेला नाहीं. त्यांच्या हयातींत हें छापण्याचा योग आला असता तर याहून उत्तम असे आणखीहि कांहीं बदल

त्यांनीं कदाचित् केलें असते असें आम्हांस वाटतें.

प्रस्तुकाच्या छपाईचें काम शक्य तितकें सुबक, वक्तशीर व आपलेपणानें करून दिल्याबद्दल आर्यभानु प्रेसचे हुषार मॅनेजर श्री. मोहिते व त्यांचा कर्तबगार 'स्टाफ' यांचा मी आभारी आहें. ( कंपॉझिटर रा. दादोबा व प्रेसमन रा. राम यांनीं आपलें काम कसोशीनें करतां करतांच 'पहिलें बाळंतपण' 'रुक्मिणीगीत' वगैरेंतील कांहीं काव्यमय भाग वाचून मनःपूर्वक आवडल्याचेंहि सांगितलें. अनाहूत चांगला अभिप्राय ह्मणजे 'पुत्रोत्सवं मन्यन्ते लेखकाः' ! )

शेवटीं प्रो. अ. बा. गजेन्द्रगडकर, एम्. ए. यांनीं आमच्या विनंतीस मान देऊन प्रस्तुत ग्रंथास प्रस्तावना लिहिल्याबद्दल सर्व लेखक-लेखिका त्यांच्या अत्यंत ऋणी आहेत. त्यांनीं प्रस्तावनेस 'कांहीं तरी' असें विनयानें ह्मटलें असलें तरी ती अतिशय सहृदयतेनें व मार्मिकपणें लिहिली असल्यानें आम्हांस बहुमोल वाटते. ग्रंथास अशी प्रस्तावना लाभलेली पाहून 'समानयंस्तुल्यगुणं वधूवरं चिरस्य वाच्यं न गतः प्रजापतिः ।' हीच उक्ति एका रसिक मित्रानें प्रशंसापूर्वक उच्चारली.

तसेंच माझे कविमित्र श्री. सुमंत, श्री. नागेश, श्री. माधव ज्यूलिअन्, व श्री. विरागी, एम्. ए. इत्यादि सद्गृहस्थांनीं वेळोवेळीं केलेल्या हितकारी सूचनांबद्दल मी त्यांचाहि फार आभारी आहें. यांशिवाय डॉ. रा. शं. किबे, एल्. एम् ( डब्लिन ), प्रो. द. सी. पंगु, एम्. ए., श्री. मोरेश्वर सदाशिव श्रीखंडे, बी. ए. (ऑनर्स), श्री. गो. श्री. हुपरीकर, बी. ए., श्री. रं. कृ. चिंचलीकर, बी. ए. (ऑनर्स), श्री. शं. अ. बेलवलकर याहि रसिकांचे नामनिर्देशपूर्वक आभार मानतांना मला फार आनंद वाटतो. श्री. अ. वि. देसाई, एम्. ए. यांनीं कांहीं प्रुफें तपासण्याचें कार्य केल्याबद्दल (व मलाहि त्या कामीं लवकरच कार्यक्षम केल्याबद्दल) मजवर त्यांचे उपकार आहेत. याप्रमाणें उपर्युक्त व अनुक्त सहायकांचें जर मला प्रोत्साहन न लाभतें तर इतक्या लवकर 'वाङ्मय-श्री-खण्ड' प्रकाशांत येतें ना.

असो. ज्या जगन्नियन्त्याच्या प्रेरणेनें हें कार्य सिद्धीस गेलें, त्यास नम्रतेनें नमन करून मी वाचकांची रजा घेतों.

हुजुरबाजार यांचा वाडा
कोल्हापूर
ता. १० जुलै १९३२

रामचंद्र चित[redacted]

# अनुक्रमणिका



# वाङ्मय-श्री-खण्ड

## गद्यविभाग

लेखकः—कै. डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे एम्. सी. पी. एस्.

---

## पद्यविभाग ( प्राकृत )



### कै. डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे-कृत

श्री. सौ. कृष्णाबाई श्रीखंडे ( सौ. पार्वतीबाई सरदेसाई )-कृत



श्री. सौ. वेणुबाई श्रीखंडे ( सौ. लक्ष्मीबाई पंडित )-कृत



श्री. सौ. गंगाबाई श्रीखंडे ( सौ. लक्ष्मीबाई कशाळकर )-कृत



कु. कृष्णाताई शंकर श्रीखंडे ( हुजुरबाजार )-कृत



डॉ. रामचंद्र चिंतामण श्रीखंडे-कृत



कै. डॉ. **शंकर चिंतामण श्रीखंडे,** एम्. सी. पी. एस्.

[ १९१५ सालीं अलेक्झांड्रिया येथें असतांना ]

# वाङ्मय-श्री-खण्ड



## गद्य विभाग



### १ एका कल्पित सभेचा मनोरम वृत्तांत

लेखकः— कै० डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे; एम्. सी. पी. एस्.

[ ती. कै० डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे हे सन १९१५।१६ मध्यें महायुद्धाचे वेळीं वॉरसर्व्हिसवर अलेक्झांड्रिया ( इजिप्त ) येथें असतां, तेथून त्यांनीं आपल्या प्रिय बंधुभगिनींस जीं अनेक उद्बोधक व मनोरंजक पत्रें लिहिलीं, त्यांतूनच पुढील सुंदर सभावर्णन हें उद्धृत केलें आहे. हीं सभावृत्ताचीं पत्रें आमच्या भगिनी ती. श्री. सौ. कृष्णाबाई यांना प्रायः दर आठवड्यास एकेक याप्रमाणें लिहिलीं गेलीं आहेत. —रा. चिं. श्री. ]



पत्र १ लें

#### प्रास्ताविक

अलेक्झांड्रिया. ता. २७-७-१५

चिरंजीव श्रीमती सौभाग्यवती सकलगुणालंकरण कृष्णाबाई यांस:—

अनेक आशीर्वाद उपरी विशेष, आपली सांगली संस्थानांत सनाथ नेमणूक होणार आहे हें ऐकून आनंद झाला. ईश्वरेच्छेनें आपल्यावर मुलांना सुशिक्षित करण्याचें, जबाबदारीचें व विशेष कौशल्य लागणारें, पण फारच उत्कृष्ठ काम पडणार आहे. त्या कामाला आपण योग्य आहांत हें कृतीनें आपण सिद्ध करून दाखवाल, यांत मला बिलकूल संशय नाहीं. अवघड कामें पार पाडण्यास लागणारें धोरण, चिकाटी, युक्ति, मनाचा समतोलपणा, उत्साह, धैर्य, बल इत्यादि जे गुण आहेत त्यांचा आपले ठिकाणीं अभाव नाहीं, असा

मला भरंवसा आहे. शिक्षणाचें काम जितकें कसोशीनें करावें तितकें उत्तम वठतें. मळकें वस्त्र जितकें चांगलें धुवावें तितकें स्वच्छ निघणार. मनांतील मळ काढून टाकून त्याला संस्कृत करणें हें आपलें कर्तव्य आहे. पण, आपलें कर्तव्य आपण जाणत आहांच. मग मी कशास सांगायला पाहिजे?

हें पत्र हिंदुस्थानांत पोंचेल त्यावेळीं आपण सांगलीस असणार. कोल्हापुरीं नसणार हें खास. मग बदललेला पत्ता मला ठाऊक नसल्यानें हें पत्र चि. भाऊसाहेब यांचे मार्फत रवाना करीत आहें; व पत्ता समजेपर्यंत तसेंच करणें भाग आहे. पत्रें पोंचल्याचें सवडीप्रमाणें चि. भाऊसाहेब यांचे मार्फत मला कळविलें तरी माझी कुरकुर नाहीं.

"मी येथें सुखरूप आहें. आपणाकडून बरेच दिवसांत पत्र नाहीं; यामुळें काळजी लागली आहे. (किंवा पत्र येऊन समाचार कळल्यानें काळजी दूर झाली). वरचेवर पत्रद्वारें समाचार कळवीत जाणें. इकडे हवा पाणी चांगलें आहे. मागील आठवड्यांत इतका पाऊस पडला. (किंवा सबंध वर्षांत थेंब सुद्धां नाहीं.) पिकें बरीं आहेत. (किंवा रेतीचीं मैदानें सभोंवार पसरल्यानें मुळींच नाहींत.) सर्वत्र वडील मंडळींस नमस्कार व लहानांस अशीर्वाद. पत्रोत्तराची वाट पहात आहें. आपण प्रकृतीस जपून असावें. कळावें. लोभ करावा हे आशीर्वाद. (किंवा विनंती.)" इत्यादि ठराविक मजकुरानें ओत-प्रोत भरलेलीं पत्रें लिहिणें मला आवडेनासें झालें आहे. ज्याप्रमाणें वर्तमान-पत्रांतील घड्याळांच्या, औषधांच्या, मंत्रसिद्ध ताईत दोऱ्यांच्या, किंवा बाला-मृताच्या जाहिराती कोणी वाचीत नाहींत, (कदाचित् झोंप येण्याकरितां किंवा वेळ जाण्याकरितां वाचीत असतील कोणी हरीचे लाल) तशींच असलीं पत्रें होत. तशीं पत्रें लिहिणें ह्मणजे काल व द्रव्य यांचा अपव्यय होय. प्रत्येक वेळीं कांहीं नवीन लिहिण्याचा प्रयत्न केल्यास, पत्रें लिहिणें ह्मणजे एक कर-मणुकीचा व बुद्धीचें तेज वाढविणारा व्यवसाय होतो. आपण नवीन पाहिलेल्या व शिकलेल्या गोष्टी दुसऱ्यास लिहून कळविल्या असतां आपले मनांत चांगल्या ठसून दुसऱ्यांचा फायदा होतो. विशेषतः आपण आतां हातांत घेणार त्या कार्याला याची फार आवश्यकता आहे. दुसऱ्यास समजेल अशा तऱ्हेनें विचाराचें चित्र शब्दांनीं काढून त्याची मूर्तिमंत कल्पना डोळ्यापुढें उभी करणें ही कला शिकण्यासारखी नाहीं काय? चांगलीं पत्रें लिहितां आलीं तर तसें करतां

येतें. लिहिण्यापासून विचार संगतवार कसे मांडावेत हें समजतें. कदाचित् वक्तृत्वसुद्धां वाढेल. व्याकरण घटतें व शुद्धलेखन सुधारतें. असो.

हें पत्र लिहिण्याचा माझा हेतु मुख्यत्वेंकरून हाच आहे. वास्तविक तो प्रथम सांगावयास पाहिजे होता. पण पत्र संपण्यापूर्वी सांगितला तरी चालतें. खरें ह्मटलें तर पत्र लिहिण्यापूर्वीच तो माझे मनांत होता. त्याचेंच हें मूर्त स्वरूप आहे. तो माझा हेतु कितपत साध्य होतो, तें पहाणार आहें.

काल रात्रीं जेवण झाल्यावर माझ्या एका स्नेह्याबरोबर मी बुद्धिबळें खेळलों. बरेच डाव मी जिंकले. पण शेवटचा डाव माझेवर झाला. माझी चूक कोठें झाली तें मी पाहूं लागलों. बऱ्याच वेळानें चूक सांपडली. व ती सहज दुरुस्त होण्यासारखी होती ह्मणून माझ्या निष्काळजीपणाबद्दल मला वाईट वाटलें. नंतर मी निजावयास गेलों. पण झोंप येईना. शेवटीं बऱ्याच वेळानें मला झोंप लागली, पण केव्हां तें समजलें नाहीं. नंतर पहांटे मी एक ठळक अक्षरांनीं छापलेलें हस्तपत्रक ( Handbill ) पाहिलें व वाचलें. त्यांतील मजकूर जो आठवणींत राहिला तो पुढीलप्रमाणें:—

" आजरोजीं सायंकाळीं ५ वाजतां × × × ठिकाणीं ( मी तेथें गेलों होतों पण त्याचें नांव विसरलों ) सुशिक्षित स्त्रीमंडळाची सभा होणार आहे. पुढील उत्तमांचीं ( उत्तमा वरवार्णिनी इत्यमरकोशे । ) भाषणें होतील.

श्री. सौ. लक्ष्मीबाई शंकरराव ज्ञानसिंधु.
,, ,, अन्नपूर्णाबाई जगन्नाथभट पंचपात्रे.
,, ,, रसनाबाई अमृतराव श्रीखंडे.
,, ,, वेत्रिकाबाई हेमाडपंत दोरखंडे.
,, ,, नवीबाई डौलाजी सुधारक.
,, ,, लवंगीबाई चुनीलाल पोफळे.
,, ,, सारजाबाई धनाजी क्षेत्रपाळ.
,, ,, चंडिकाबाई रुद्राजीराव महाशब्दे.
,, ,, यशोदाबाई आनंदराव अभयंकर.
,, ,, त्रिजटाबाई घामटराव अजागळ.
,, ,, भीमाबाई लंबोदराचार्य अवाढव्य.

श्री. सौ. अरुंधतीबाई वामनराव ठेंगे.
,, ,, सरस्वतीबाई विद्याधरशास्त्री राजपाठक.
,, ,, श्रद्धाबाई गुरुचरणदास राजयोगी.

सर्व स्त्रियांनीं अगत्य यावें. मुलें रडकीं नसल्यास आणावींत. मिशा न आलेल्या विद्यार्थ्यांनीं येण्यास हरकत नाहीं. विडी ओढण्याची सक्त मनाई आहे. (हा नियम फक्त विद्यार्थ्यांकरितां होता.) सभ्यपणानें वागणारांना शेवटीं खिरापत मिळेल. दंगा करणारास कोंडून ठेवलें जाईल. मुलांना भूक लागल्यास खाऊ ज्यांचा त्यांनीं पुरवावा. अगदीं लहान वत्सांकरितां पाळणा, दोऱ्या व दुपटीं आणलीं पाहिजेत. भाषण सुरू असतां खोकूं नये व शिंकूं नये. रडणाऱ्या मुलास त्याचे आईचे ताब्यांत दिलें जाईल. प्रत्येक प्रेक्षक व श्रोत्यानें दोन दोन हातरुमाल बाळगले पाहिजेत. इत्यादि."

मला मिशा असतांना व मी स्त्री किंवा विद्यार्थी नसतांना माझा शिरकाव आंत कसा झाला समजत नाहीं. पण मी एकटाच तेथें होतों. मी सर्व भाषणें ऐकिलीं व स्वतः भाषण केलें. सभाविसर्जनाच्या वेळीं सर्वांनीं आर्यमातेचा जयजयकार केला; त्या आवाजानें मी जागा झालों. त्या वेळीं चार वाजले होते. नंतर झोंप येईना. सभेचा देखावा डोळ्यापुढें चित्राप्रमाणें उभा राहिला. मग उठून मुखमार्जनादि प्रातर्विधि आटोपला. स्वप्नें खोटीं होतात ह्मणतात पण हें स्वप्न खरें झालें. अगदीं अक्षरशः खरें झालें. त्या सभेची हकीकत पुढील अंकीं—नव्हे पत्रीं-देणार आहें. सर्व वक्त्यांचीं भाषणें मुद्देसूद, जोरदार, विद्वत्ता-प्रचुर, स्पष्ट, अस्खलित, माहितीपरिपूर्ण व मनोरंजक झालीं. त्यांतील जीं आठवतील तीं लिहीन.

पुष्कळांस स्वप्नापेक्षां खऱ्याखुऱ्या गोष्टी आवडतात, पण मला आपलें स्वप्नच आवडतें. गोड असतें, व प्रत्येक वेळीं नवें.

"तदेव रूपं रमणीयतायाः
क्षणे क्षणे यन्नवतामुपैति ॥" *

ताजें लोणकडें घमघमीत तूप कुणास आवडणार नाहीं? अहाहा! रोज उंटाचें

* "तेंच तर सौंदर्याचें स्वरूप कीं जें क्षणोक्षणीं नाविन्य धारण करतें."

तूप खाणाऱ्या मला आतां हिंदुस्थानांतल्या तुपाचा वास येत आहे! तोंडास पाणी सुटतें!

बरें, असो. आपण उभयतां सुखरूप आहांत ना? मग झालें. 'सुख घ्यावें सुख द्यावें, सुखी सर्वदा असावें ॥' हे आशीर्वाद.

आपला बंधु
शंकर चिंतामण श्रीखंडे.

---

## पत्र २ रें

## अध्यक्षांची निवड

अलेक्झांड्रिया. श्री. ता. १।८।१५

चि. सौ. कृष्णाबाई यांसः—

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. हें पत्र आपले हातीं जाईल त्यावेळीं आपण कामावर असाल. करितां, काम कसें आहे, किती वेळ लागतो, परिस्थिति कशी आहे, वरिष्ठ अंमलदार कोण, राहण्याची व्यवस्था कोठें वगैरे सविस्तर हकीकतीचें पत्र यावें. आपणास ऊर्जितावस्थेस आणल्याबद्दल रा. रा. शंकरराव यांचें मी मनापासून अभिनंदन करतों. हिंदुस्थानांतील कर्तृत्ववान् पुरुषांत त्यांची गणना होणें अवश्य आहे. बोलण्यापेक्षां करून दाखविणें हा जो त्यांचे वर्तनांतील विशेष आहे, तो प्रत्येक व्यक्तीनें शिकून अभ्यासण्यायोग्य आहे, यांत बिलकूल शंका नाहीं. ईश्वर आह्माला तसेंच वागण्याची बुद्धि व शक्ति देवो!

मागील पत्रांत लिहिल्याप्रमाणें त्या महिलाबालविशिष्ट सभेची हकीकत पुढीलप्रमाणें आहेः—

"सुमारें ४॥ वाजतां एका भव्य व लतामंडप-तोरण-सुशोभित प्रासादासमोर गाड्या व मनुष्यें (स्त्रीजातीचीं) येण्यास सुरवात झाली. रस्ता रुंद व सुंदर असून त्यावर गुलाबपाणी शिंपडलें होतें. आजूबाजूस सुंदर कुंड्यांतून वनस्पती डुलत होत्या व आपले पर्णरूपी हस्त हालवून सर्व येणारांचें स्वागत करीत होत्या. वारा मंदपणें वहात असून मधून मधून मंजुळ स्वर काढीत होता.

सूर्याचा ताप बराच उतरल्यामुळें जिकडे तिकडे उत्साह दिसत होता, व घामही बंद झाला होता. क्वचित् हातरुमाल फडकतांना दिसत पण ते फक्त शोभेकरितां किंवा कांहीं खुणा दुसऱ्यास कळविण्याकरितां होते. जिकडून तिकडून स्त्रियांचे व बालकांचे थवे लोटत असून ते प्रासादाचे दरवाजाजवळ थांबत. तेथें स्वागत कमिटीचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, खजीनदार, मदतनीस, सेक्रेटरी, स्वयंसेवकांचे कप्तान व त्यांचें एक पथक स्वागतार्थ राहिलें होतें. म्हणून फक्त एक वेळीं एकच व्यक्तीला आंत जातां येईल इतका मार्ग खुला होता. बाहेरून आलेल्या प्रत्येक वनितेस या दुतर्फा उभे राहिलेल्या मंडळींशीं हस्तांदोलन करीत करीत सुहास्यवदनानें आंत प्रवेश करावा लागे. त्या गर्दीत कडेवरील मुलांचे थोडे हाल होतसें दिसतें. कारण ती रडूं लागत. कदाचित् भीतीमुळें असेल. पण त्या मार्गांतील दोहीं बाजूंच्या दाबामुळें कित्येकांचा वात झडला व अंग रगडल्यासारखें झाल्यामुळें पुष्कळांचा शीण हरून ते आनंदी व उत्साहयुक्त झाले. विद्यार्थी केव्हां केव्हां घुसमटत असत, पण चपळपणामुळें निसटून जात, व त्यांना ती एक करमणूकच होत असे. सुदैवानें डॉक्टर बोलावण्यापर्यंत कोणास पाळी आली नाहीं व असती तरी मी तेथें होतोंच. मंडळींना विवक्षित स्थानीं बसविण्याकरीतां व्यवस्थापक मंडळी होतीच. तळमजल्यांत पुष्कळ खुर्च्या व बाकें टाकलीं ( व्यवस्थितपणें ) असून त्यांचे समोर एक स्टेज (Stage) होतें. बाजूस दुसऱ्या मजल्यावर ग्यालरीत मुलें ( ६ ते १२ वर्षांपर्यंत ), प्रौढ स्त्रिया व स्तनंधय वत्सें नसलेल्या बायका बसविल्या होत्या. स्तनपान करणाऱ्या मुलांना ग्यालरींत बसविलें तर खालीं बसलेल्या समाजावर क्षारोदकाचा अभिषेक वारंवार होण्याची भीति होती; याकरितां, त्यांना तळमजल्यांत एका बाजूस स्पेशल जागा केली होती. तेथें पाळणे बांधून परस्परांना न आपटतां चांगले झोके देतां येतील अशी व्यवस्था केली होती. पाळणे विजेच्या शक्तीनें हालत व म्हणून आयांना सावचित्तपणें व्याख्यान ऐकावयास सांपडे. विद्यार्थ्यांची उंची श्री. सौ. अरुंधतीबाई ठेंगे यांनीं उभ्यानें वर केलेल्या हातापेक्षां जास्त असल्यास त्यांस बाहेर घालविलें जाई. विद्यार्थी व बायका यांचें मिश्रण झालें होतें व तें फणस आणि आंबे यांचे समुदायाप्रमाणें शोभत होतें. मध्यभागीं स्टेजवर एक विस्तृत टेबल असून त्यावर चित्रविचित्र वेलबुट्या काढलेलें कापड पसरलें होतें. टेबलाचे पलीकडे मध्यभागीं अध्यक्षांची खूर्ची असून जवळच वक्त्याकरितां एक

खुर्ची ठेविली होती, आणि बाजूस भाषणें करण्याकरितां आलेल्यांना बसण्या-करितां खुर्च्या होत्या. टेबलावर एक मोठा पुष्पगुच्छ असून, दुसरे लहान लहान गुच्छ इतरत्र ठेविले होते. दिवे विजेचे असून पंखेही फिरत होते. हंड्या झुंबरें छतास टांगलीं होतीं, व सर्वत्र मधुर सुगंध पसरला होता. आंत येतांच चित्तास शांत वाटून, आनंदोर्मी उसळाव्यात अशी व्यवस्था ठेविली होती.

बरोबर ५ वाजतां सर्व मंडळी स्थानापन्न झाली व सभेचे कामास लवकरच सुरवात होणारसें दिसूं लागलें. इतक्यांत श्री. सौ. रसनाबाई श्रीखंडे ह्या उठल्या व टेबलाजवळ जाऊन, प्रथम उत्साहपूर्ण टाळ्यांनीं सभागृह दणाणून सोडून नंतर स्तब्ध झालेल्या श्रवणोत्सुक समुदास त्यांनीं पुढील प्रमाणें संबोधिलें.

त्या ह्मणाल्या "सकलभरतभूमिभूषणभूत रमणीजन हो, आपल्या आगमनानें मला किती आनंद झाला आहे हें शब्दांनीं व्यक्त करणें शक्य नाहीं. आमचे विनंतीस मान देऊन, आपण आपला अमूल्य वेळ खर्चून येथें येण्याची कृपा केली याबद्दल मी सर्वांची फार आभारी आहें. आपलें स्वागत मी अत्यंत उल्हासानें व नम्रपणें करतें. आपणाला पाहून, सुशिक्षित-पणा, सुंदरपणा, व्यवस्थितपणा, करारीपणा, सद्गुणसंपन्नता, शहाणपणा, प्रेमळपणा वगैरेंनीं बनविलेल्या पुतळ्याच आपणासमोर उभ्या बसल्या-आहेत कीं काय असा भास होतो. आज आपण आपले अनुभव आह्मांस ऐकवून आमचे ऐकण्याकरितां इथें आलां आहांत. अशा प्रसंगीं, या सभेचें अध्यक्ष-स्थान श्री. सौ. लक्ष्मीबाई ज्ञानसिंधु यांना द्यावें असें मला वाटतें. (टाळ्या) करितां सर्वांचे तर्फे मी त्यांना तें स्वीकारण्याविषयीं विनंति करितें. (जोराच्या टाळ्या) त्या ज्ञानवृद्ध, आचारशुद्ध, अप्रतिहतबुद्ध असून, स्वधर्माविरुद्ध वर्तन त्यांना खपत नाहीं. त्यांची शांति अवर्णनीय आहे. (माझीहि तशीच आहे *) तेव्हां आमचे विनंतीस मान देऊन श्री. सौ. लक्ष्मीबाई या अध्यक्षस्थान स्वीकारतील व आह्मांला ज्ञानामृताचे घुटके पाजतील अशी मला आशा आहे. (भयंकर टाळ्या) त्यांच्यासारखी योग्य व्यक्ति–विभूति–आज आह्मांला लाभली याबद्दल मी ईश्वराचे आभार मानतें. हा परम भाग्याचा दिवस इतिहासांत

* या ठिकाणीं लेखकाच्या 'शांता' नामक कन्यकेचा उल्लेख असावासें वाटतें.

—रा. चिं. श्री.

अजरामर होऊन राहील यांत शंका नको." (टाळ्याच टाळ्या) इतकें बोलून त्या खालीं-खुर्चीवर-बसल्या. नंतर श्री. सौ. अन्नपूर्णाबाई पंचपात्रे यांनीं त्यांना पुष्टि दिली. त्या ह्मणाल्या:—

"सुवासिनींनो! श्री. सौ. रसनाबाईंनीं आतां जी सूचना सभेपुढें आणली त्याला माझें संपूर्ण अनुमोदन आहे. श्री. सौ. लक्ष्मीबाई या फारच सज्जन व ममताळू आहेत. परवां आह्मी त्यांचे घरीं जेवावयास गेलों होतों. त्यावेळीं त्यांनीं फारच आग्रह केला. पक्वान्नें किती तरी केलीं होतीं, साखरभात, श्रीखंड, पुऱ्या, लाडू, चिरोटे, (यावेळीं मुलांमध्यें फारच गडबड उडाली, कांहीं अर्भकें 'मला लाडू दे कीं' ह्मणून आईजवळ हट्ट करूं लागलीं, ह्मणून वक्त्यांना भाषणाचा ओघ फिरवावा लागला.) वगैरे पुष्कळ जिन्नस केले होते. सांगण्याचें कारण त्यांना अगत्य फार आहे. दक्षिणाही चांगली दिली. त्यांचे यजमान आह्मांला आपलें उपाध्येपण देणार आहेत ह्मणून आमचे घरीं ह्मणत होते. (श्री. सौ. चंडिकाबाईंना हें भटीणबाईंचें चऱ्हाट आवडेना ह्मणून त्या गुरगुरूं लागल्या.) एकंदरींत श्री. सौ. लक्ष्मीबाई या अध्यक्षस्थानाला अगदीं योग्य आहेत. (श्री. सौ. लक्ष्मीबाईस उद्देशून) खरेंच लक्ष्मीबाई, त्या मधल्या खुर्चीवर तुह्मी बसाच. या सभेला कशी शोभा येईल हो. चला मी तुह्मांला बसवितें." (इतक्यांत श्री. सौ. वेत्रिकाबाईंनीं अन्नपूर्णाबाईस खेंचून खालीं बसविलें, व आपण उभा राहून ह्मणाल्या—) "आमच्या अन्नपूर्णाबाई आहेत भोळसर. सरळपणा जास्त. खांचखोंच नाहीं. पण मन शुद्ध असून प्रेमळपणा जास्त आहे. मनाला गोष्ट पटल्याबरोबर लगेच कृतीला सुरवात करतात. बरें. असो. श्री. सौ. लक्ष्मीबाई या अध्यक्षस्थान स्वीकारून सर्वांच्या इच्छा पूर्ण करतील अशी मला उमेद आहे." (टाळ्यांचा कडकडाट) नंतर श्री. सौ. लक्ष्मीबाई उठल्या व टाळ्यांच्या गजरांत अध्यक्षस्थानापन्न झाल्या. मग उठून त्या ह्मणाल्या—पण तें आतां पुढील पत्रींच लिहीन. वेळ बराच झाला आहे.

आपण उभयतां सुखरूप असल्याचें कळवावें. पत्रांतील दोष दाखविल्यास व सुधारणा सुचविल्यास मला आनंद होईल. कळावें हें आशीर्वाद.

आपला बंधु.

**शंकर चिंतामण श्रीखंडे.**



## पत्र ३ रें.

# श्री. सौ. रसनाबाईचें व्याख्यान.

## ओजस्वती वाणी



अलेक्झांड्रिया. श्री. ता. ५।८।१९१५

चि. सौ. कृष्णाबाई यांसः—

अनेक आशीर्वाद. उपरी विशेष. मागील पत्रावरून सभेचा पुढील वृत्तांत याप्रमाणेः—

श्री. सौ. लक्ष्मीबाई ह्मणाल्याः— " अर्भकांशीं कामधेनूप्रमाणें, मुलांशीं मातेप्रमाणें, व विद्यार्थ्यांशीं प्रेमळ गुरूप्रमाणें वागणाऱ्या विदुषी हो! माझ्यापेक्षां, गुणानें, ज्ञानानें, वयानें व योग्यतेनें सरस अशा ललना या सभेंत पुष्कळ असूनही मलाच तुम्हीं अध्यक्षस्थान दिलें, हा माझा तुह्मीं फार मोठा सन्मान केलेला आहे, व याबद्दल मी तुमची अत्यंत आभारी आहें. सुशिक्षित अशा स्त्रियांच्या सभेचें अध्यक्ष होणें हें फार जबाबदारीचें व कौशल्याचें काम आहे. आपली सर्वांची इच्छा तें मींच करावें अशी असल्यामुळें शक्य तितक्या उत्तम रीतीनें हें काम करण्याची मी खबरदारी घेईन. तुह्मी सहानुभूतिपूर्वक मला मदत द्याल असा मला बळकट भरंवसा आहे. आजच्या सभेचा हेतु श्री. सौ. रसनाबाई, स्वागत कमेटीचे अध्यक्ष यांनीं आपल्या काव्यप्रचुर व कोमल वाणीनें सर्वांस विदित केला आहेच. जें जें कांहीं नवें देखावें। तें तें शिकून हृदीं भरावें॥ व

जितुकें कांहीं आपणास ठावें । तितुकें हळूहळू शिकवावें ।
शहाणे करून सोडावे । बहुत जन ॥

हें करण्याकरितां आपण येथें आलों आहोंत. वर सांगितलेलीं जरी दोन कार्यें आहेत, तरी तीं दोन्हींहि एकाच वेळीं या सभेच्या द्वारें आपण करणार आहोंत. एकच काम करावयाचें असल्यास किती लक्षपूर्वक करावें लागतें. मग आतां तर दोन कार्यें एकदम करावयाचीं. फार सावधान राहिलें पाहिजे. सभेचीं हस्तपत्रकें पूर्वीच प्रसिद्ध झालीं आहेत त्यांत निर्दिष्ट केलेल्या वक्त्यांचीं आज भाषणें होतील. आतां ( मनगटावरील घड्याळांत पाहून ) सव्वापांच वाजले आहेत. प्रत्येक वक्त्यानें १५ च मिनिटें भाषण केल्यास सभेचें काम

९ वाजतां संपेल. त्यापेक्षां जास्त वेळ स्त्रियांच्या सभेचें काम पुष्कळ कारणांकरितां इष्ट नाहीं.

अशा तऱ्हेनें वेळेचा निर्बंध असला म्हणजे बरेच फायदे होतात. एक तर वक्त्यांना भरकटतां येत नाहीं व भाकडकथा बंद होतात. विषयाचें सार काढल्यासारखें होऊन तो मनावर चांगला ठसतो. यामुळें वेळ वांचतो, तो विविध विषयांवरील पुस्तकवाचनास वापरतां येतो. प्रत्येक वक्त्यानें आपल्या आवडत्या विषयावर बोलावें म्हणून विषय नेमलेले नाहींत. आतां श्री. सौ. रसनाबाई या बोलतील. तेव्हां सर्वांनीं सावधान असावें." [ टाळ्या ].

नंतर श्री. सौ. रसनाबाई श्रीखंडे या बोलावयास उठल्या. आडनांव श्रीखंडे म्हणून त्या आपल्यापैकींच आहेतसें मला वाटलें. पण त्यांना कोठें पाहिल्याचें आठवेना. अमृतरावांनाही मी पाहिलेलें नाहीं. सौ. रसनाबाईची अंगलट सडपातळ असून निरोगी व तेजस्वी होती. लहानपणापासून कचाट्यांत व भयंकर संकटांत दिवस गेल्यामुळें व मोठेपणींसुद्धां स्वतःचें काम स्वतःच करावें लागत असल्यामुळें, त्यांचे अंगीं आळस तर नव्हताच पण चपळपणा अद्वितीय होता. चतुरपणांतसुद्धां त्या कोणाला हार जात नसत. लहानपणापासून त्यांना बोलण्याचा नाद असावासें दिसतें. कारण त्या अस्खलित भाषण करीत. सिनेमॅटोग्राफमधील चित्रें जसे हावभाव व अंगविक्षेप करितात, त्याप्रमाणें प्रत्येक शब्दाला, किंबहुना प्रत्येक अक्षराला त्यांचे निरनिराळे हावभाव होत. नुसत्या हावभावावरूनसुद्धां त्या काय बोलत आहेत हें बहिऱ्यास परंतु डोळसासमुद्धां समजलें असतें. इतका चपळपणा असूनही त्यांनीं कधीं मर्यादातिक्रमण केलें नाहीं. सर्वांना त्या हव्याशा वाटत असा त्यांचा गोड स्वभाव होता. सर्वांवर समदृष्टि असली तरी बुद्धिवान् व चणचणीत मुलांवर त्यांची विशेष प्रीति असे. त्यांच्या कामांत चूक होतच नसे म्हटलें तरी चालेल. त्यांचें भाषण सुरू झालें. ऐका: —

"वाचमोजस्वतीं देवा जनयांचक्रिरे पुरा ॥
सास्माकं सुप्रसन्नास्तु वरदाखिलसिद्धिदा ॥ १ ॥ *

* "पूर्वी देवांनीं प्रभावशाली व तेजस्वी अशी (जी) वाणी निर्माण केली, ती सुप्रसन्न होऊन आह्मांला चांगले वर व सकल सिद्धि देवो!"

ईशकृपेनें प्राप्त झालेल्या तेजस्वी वाणीला नमन करून मी तिचा अनुवाद करण्यास प्रवृत्त झालें आहें. ती भगवती माझेवर सुप्रसन्न असो.

भगिनींनो ! तुह्मांला माहीत नाहीं असें नवीन माझेजवळ कांहीं नाहीं. ह्मणून तसलें सांगण्याचा प्रयत्न मी करणार नाहीं. प्रयत्न न करितां प्राप्त झालेल्या वस्तूचा अपव्यय व अनादर होण्याचा संभव असतो. श्रीमंतांचीं मुलें बहुशः दुर्गुणी व उधळीं निपजतात. कारण स्वकष्टानें त्यांनीं संपत्ति मिळविलेली नसते. ह्मणून तिजकरितां मिळविणारास किती श्रम पडले याची त्यांना कल्पना होत नाहीं. तसेंच आपल्यास सहज प्राप्त झालेल्या वाणीचा दुरुपयोग न होईल याबद्दल आपण जपलें पाहिजे. चांगल्या कामाकडे वाणीचा विनियोग कसा करावा याविषयीं थोर लोकांनीं व साधुसंतांनीं सुचविलेले कांहीं मार्ग मी आपणांपुढें मांडणार आहें. वाणीची शरीर व मनाइतकी किंबहुना कांकणभर जास्तच योग्यता आहे. काया, वाचा, मन हा त्रिवेणी संगम आहे. हीं तिघेंही जीवाला परमात्मदर्शन करून देण्याला समर्थ आहेत. तथापि वाणीची योग्यता जास्त आहे. ती स्वतः तरून इतरांस तारूं शकते. वाणीच्या सामर्थ्यानें थोर पुरुष अजरामरत्व पावतात. व्यास, वाल्मीकि, कालिदास, शंकराचार्य, ज्ञानदेव, तुकाराम वगैरे महापुरुषांनीं ग्रंथ केले नसते तर त्यांचीं नांवें आज आपणांस ऐकूं आलीं असतीं काय? ग्रंथ हें वाणीचें मूर्त व तीमधील सामर्थ्याप्रमाणें–ईश्वरी अंशाप्रमाणें–चिरकाल टिकणारें स्वरूप आहे. दरवर्षी लाखों ग्रंथ निर्माण होतात, पण बहुतेक सर्व दुसरे वर्षापूर्वीच मरतात. कारण त्यांचे ठायीं जोम नसतो. जोम, तेज, सामर्थ्य वाणीपासूनच ग्रंथास मिळतें. वाणींत सामर्थ्य उत्पन्न करा. शक्ति ही ईश्वरी सत्ता आहे. ती ईश्वराबरोबर राहते. तुमचे वाणींत ईश्वर असेल तर ती समर्थ असलीच पाहिजे. ईश्वरानें वाणी उत्पन्न केली, त्याचेच गुणानुवादानें ती पुनीत होते. हा तिचा अत्युत्तम विनियोग आहे. वाणीचा शरीरावर व मनावर ताबा असतो. हजारों शरीरें व मनें ती एकटी सहज आकर्षण करील. वाणी मनाला हवें तें रूप देऊं शकते. मनाची वाढ वाणीवर अवलंबून आहे. चांगले विचार व उच्च मनोविकार जागृत करण्याकडे वाणीला लावा. तुमचे भाषणानें दुसऱ्यांचीं मनें वळवून सन्मार्गाकडे प्रवृत्त करा. तुमच्या शरीराला व मनाला तुमच्या वाणीप्रमाणें वागण्यास भाग पाडा. तुमच्या उपदेशानें जो ठसा ऐकणारांचे मनावर उमटेल तो

तुमच्या वर्तनानें दृढ होईल. लोक तुमचें अनुकरण करतील. तुमच्या वर्तनानें तुमच्या वाणीचें सामर्थ्य वाढतें. शक्ति एकसारखी वर्तत असल्यास परिणाम घडविते. वाणी अस्खलित असावी ह्मणजे केव्हांही इष्टकार्य घडविते. शब्द हे विचारांचे घटकावयव किंवा दर्शक आहेत. चांगले विचार प्रगट करण्याकरितां योग्य शब्द निवडून काढा. सुव्यवस्थित अशी त्यांची रचना करा. निरनिराळ्या शब्दांनीं तोच अर्थ दाखविण्यास शिका, ह्मणजे तीच कल्पना तुह्मांला दृढ करितां येईल, व तुमचें भाषण कंटाळवाणें होणार नाहीं. शब्दांचा बरोबर अर्थ लक्षांत आणून शब्द वापरावे. अतिशयोक्ति नसावी. असत्यानें वाणीचें सामर्थ्य नाश पावतें. असत्य ही वाणीची कीड आहे. तिला थारा देऊं नका. वाणीला सत्याचें पाणी पाजा. ह्मणजे तिचें तेज वाढेल. वाणी स्त्री जातीची असल्यानें तिला विनोदरूपी वस्त्र व शब्दालंकार आवडणें साहजिक आहे. तें वस्त्र फार झिरझिरीत नसावें व ओबडधोबड राठही असूं नये. त्यांत खोंच नसल्यास बरें. अलंकार सुबक व चांगल्या ठेवणीचे असावे. फार अलंकार तिचे सौंदर्यास कमीपणा आणतात. साधेपणा चांगलाच, पण नागडेपणा विशोभित व कुरूप आहे. स्त्रीजातीला योग्य असें तिच्या अंगीं मार्दव व नम्रता असावी. अजागळपणा असूं नये. स्वच्छपणा व शुद्धपणा हे कोणालाही आवडतात. मग वाणीला आवडणार नाहींत कां ? शुद्धलेखन ही तिची वेणीफणी आहे. वाणीचा संचार अप्रतिहत आहे. पाहिजे तें करण्याचें तिला सामर्थ्य आहे. आनंद हा तिचा मुलगा, व कीर्ति ही तिची कन्या आहे. संपत्ति तिची बहीण आहे. वाणीला प्रसन्न केल्यास ही मंडळी सहजच येतात. मग सुखाला पारावार नाहीं. वाणीचे गुण अनंत व उपयोगही अनेक आहेत. जसा उपयोग करावा तशी फलप्राप्ति होते. एका संस्कृत श्लोकांत ह्मटलें आहे:—

कामान् दुग्धे विप्रकर्षत्यलक्ष्मीं
कीर्तिं सूते दुष्कृतं या हिनास्ति ॥
तां चाप्येतां मातरं मंगलानां
धेनुं धीराः सूनृतां वाचमाहुः ॥ १ ॥ *

---

* उत्तररामचरित अं. ५ श्लो. ३० "दैन्य व पाप नाहींसें करून, कीर्ति प्रसवून, जी सर्व कामना तृप्त करते, त्या कल्याणजननी अशा सत्य व प्रिय वाणीला सुज्ञजन कामधेनूच मानतात."

शेवटीं वाणीची अनन्यभावें प्रार्थना करून व आपण माझें भाषण शांतपणें ऐकिलें, याबद्दल अध्यक्षांचे व आपले सर्वांचे आभार मानून मी आपली रजा घेतें." (टाळ्या) याप्रमाणें श्री. सौ. रसनाबाईचें भाषण झालें. पुढील भाषण पुढच्या पत्रीं. कळावें. लोभ आहेच. हे आशीर्वाद.

आपला बंधु,
शं. चिं. श्रीखंडे.

---

## पत्र ४ थें.

## श्री. सौ. अन्नपूर्णाबाईचें व्याख्यान

### व्यावहारिक वर्तन.

अलेक्झांड्रिया. श्रीसद्गुरुमाय प्रसन्न. ता. ७-८-१९१५

चिरंजीविनी सौ. कृष्णाबाई यांस:—

अनेक आशीर्वाद. उपरी विशेष. मी येथें ईशकृपेनें व वडिलांचे आशीर्वादानें सुखरूप असल्याचें हें पत्र तुह्मांस दर्शवीत आहेच. पण याहूनही निराळ्या पुष्कळ गोष्टी तें सांगेल. ढलपा बोलका करण्याचें सुशिक्षितांचें सामर्थ्य अझून नष्ट झालें नाहीं, हें न बोलतांच हें पत्र तुमचे मनास जागृत करील. कोरेपणा टाकून विद्याग्रहणानें स्वतःचें महत्त्व वाढून, आपले विचार दुसऱ्याला देतां येतात असें हें स्वोदाहरणानें सिद्ध करील. पाय नसले तरी दूरचा प्रवास करतां येतो, व अंगीं गुण असल्यास दुसरेहि जीवापलीकडे संभाळून नेतात असें हें सांगत नाहीं काय? प्रत्येक ध्वनीला द्योतक निरनिराळें अक्षर असल्यानें, व्यक्ति तितक्या प्रकृति असणारच हें समजतें. कांहीं अक्षरें मिळून शब्द, कांहीं शब्द मिळून वाक्य होऊन अर्थ उत्पन्न करतें. तसें जनसमूह एक दिलानें एक जुटीनें वागल्यास कार्य होतें. पुष्कळ वाक्यें मिळून ग्रंथ होतो. तो सुविचारपूर्ण असल्यास सर्वमान्य होतो, तसेंच देशाचेंही. ज्याप्रमाणें पोष्टाचा छाप पडल्यानें, पत्राची इतर कागदावर छाप बसते, तसेंच राजमुद्रांकित मनुष्यास इतर लोक जास्त मानतात. पुष्कळ पत्रें न भांडतां आपआपले स्थानाकडे प्रवास करतात. कित्येक वेळां जवळ असेल त्याला चिकटतात. त्याप्रमाणें मनुष्यांनीं

संसारयात्रा गुण्यागोविंदानें करावी, व प्रसंगविशेषीं आपणांस आवडतील त्यांशीं विशेष स्नेह संपादन करावा. पत्रें ज्याप्रमाणें आपलें हृद्गत इतरांना न कळवितां फक्त प्रियजनांनाच सांगतात तसेंच आपणही करावें. तिकिट नसलेलें पत्र जसें लिहिणारास किंवा घेणारास दंड पाडतें, तसेंच विद्याहीन मनुष्याचें आहे. तो इतरांना भारभूत आहे. असो.

पण हे विचार आतां संपविलेच पाहिजेत. त्या पहा. श्री. सौ. अन्नपूर्णाबाई भाषण करावयास उठल्या. त्यांचे ते किंचित् पांढरे झालेले केस अनुभवानें पक्क झालेलें ज्ञान दर्शवितात. त्या बरोबरच इतकें वय झालें तरी अभ्यासानें चपळपणा व उत्साह कायम ठेवतां येतो, व बळवान् राहून सुसूत्रपणें कामकाज चालवितां येतें, असें त्यांची न वांकलेली शरीरयष्टि दाखविते. नेहमीं मनापासून काम करणारांची बुद्धि साठीं नाठी नाहीं होत, पण तरतरीत राहूं शकते, हें त्यांचे भाषणावरून तुम्हांला समजेल. जनांत पुस्तकी विद्येपेक्षां अनुभवजन्य ज्ञानास जास्त मान असावयास पाहिजे, पण नेहमीं असेंच घडत नाहीं. म्हणूनच त्या वयानें श्री. सौ. लक्ष्मीबाईपेक्षां जास्त असतांही अध्यक्ष होऊं शकल्या नाहींत. वयापेक्षां गुणांना मान जास्त. साधेपणा हा त्यांचा ढळढळीत विशेष होता व पोषाखही अगदीं साधा पण स्वच्छ व पोक्तपणास साजेसा होता. एक पांढरें पातळ ( पण तें पातळ नसून फार जाडही नव्हतें ) एक अरुंद काठाची पण आटोपशीरपणें लांब बाह्यांची चोळी, व अंगावर एक साधा शालू, गळयांत मणिमंगळसूत्र, हातांत पाटल्या, ( गोट नव्हते ) व साधीं पण सुंदर कंकणें आणि एक स्वच्छ हातरुमाल इतकाच शृंगार.

त्या म्हणाल्याः—" अध्यक्ष व सुवासिनींनो ! मी शाळेंत शिकली सवरलेली नाहीं, व पुस्तकेंही पाहिलीं नाहींत. पाहिलीं नाहींत, म्हणजे पाहिलीं आहेत पुष्कळ, पण वाचलीं नाहींत. तरी पण, जगांतील चित्रें मी पुष्कळ पाहिलीं व पुष्कळ गोष्टी ऐकिल्या. त्या सर्वांचें मी जें सार काढलें आहे तें मी आज तुम्हांस वाढणार आहें. तुमच्या जिभेनें पुष्कळ तऱ्हेतऱ्हेची व रुचिकर पक्वान्नें व रस चाखले असतील ( पुन्हां मुलें गडबड करतात कीं काय अशी भीति उत्पन्न होते. ) पण साराची मजा कांहीं निराळीच. थोडेंसें घेऊन तर बघा. ( कांहीं मुलें ' माझी वाटी कुठं हाय ? ' असा प्रश्न करितात. ) आज मी दुसऱ्यांशीं कसें वागावें याविषयीं चार—आठ हाणा—शब्द सांगणार आहें. येथें पहिलें

तत्व हें आहे कीं, आपणांशीं लोकांनीं जसें वागावेंसें आपणांस वाटतें, तसें आपण त्यांच्यांशीं वागावें. जग हें आरशाप्रमाणें आहे. आपण आरशांत पाहून तोंड वांकडें केल्यास आरशांतील तोंड वांकडें होतें. आपण हंसतमुख तर प्रतिबिंबही तसेंच. आतां कांहीं आरशे विचित्रच असतात. त्यांत तुह्मी हंसतमुख पाहिलें तरी विद्रूपच कांहीं तरी दिसतें. तो आरशाचा दोष. तसले लोकही जगांत बरेच मिळतात, पण मी आपल्या माझ्या सारख्यांची गोष्ट सांगतें. तसले विचित्र आरसे येथें असतील तर त्यांनीं मजवर रागावूं नये. मी त्यांचें नांव काढणार नाहीं व त्यांचे समोर–त्यांचे वाटेस–जाणार नाहीं. पहा पाहिजे तर.

आपण लोकांवर प्रीति केली तर लोक आपणांवर प्रेम करितात. जसें द्यावें तसें घ्यावें. आपण आनंदी तर सभोंवतालचे लोक तसेच. आपण व्यवस्थित राहिलों तर लोकही आपणांबरोबर तसेंच वागतात. आपण नम्र असल्यास लोक ताठ्यानें नाहीं वागत आपणांशीं. आपण दुसऱ्याचे उपयोगीं पडल्यास ते तुह्मांला मदत करतात. आपण जसें अगत्य दाखवावें तसें तुह्मांला मिळतें. तुह्मी ज्यांना जेवावयास बोलावतां त्यांचीं अमंत्रणें तुह्मांला येतात. विचार करून पहा. आपण जसें लोकांशीं वागतों तसेंच ते आपणांबरोबर वागत नाहींत कां? मग भलेपणा मिळवून सुखी होणें किती सोपें आहे पहा बरें? जसें पेरावें तसें फल भरावें. बीजा ऐसीं फळें। उत्तमें कीं अमंगळें॥ असें श्रीतुकाराममहाराजांचे अभंगांत मीं ऐकिलें आहे.

आपले घरीं लोक आल्यास त्यांचें योग्य आदरातिथ्य करावें. त्यांचे-करितां बसण्याची जागा स्वतंत्र असून व व्यवस्थित आणि अडगळ नसलेली असावी. उंची, मौल्यवान व दिखाऊ जिन्नस तुमचे येथें नसले तरी साधे व स्वच्छ पदार्थ व्यवस्थेनें रचले तर सौंदर्य उत्पन्न करतात. कोणी पाहुणे येणार असले ह्मणजे जसें आपण टापटीप व शिस्त दाखविण्याचा प्रयत्न करतों तसेंच नेहमीं ठेवावें. पाहुण्यांचें मन प्रसन्न होईल व राहील असा बंदोबस्त ठेवावा.

आपण दुसऱ्यांचे घरीं गेल्यास त्यांचेशीं मिसळून वागावें. गरिबाचे घरीं भपकेदार पोशाखानें व श्रीमंताचे घरीं दरिद्री कपड्यांनीं जाऊं नये. त्यांच्यांत आपण शोभलें पाहिजे. तोऱ्यानें वागूं नये व फार हीनत्व दाखवूं नये. लहान मुलांशीं विशेष प्रेमानें वागावें. मुलांचें अंतःकरण जो आपलेकडे ओढील, त्याला मोठ्यांशीं वागतांना अडचण पडणार नाहीं. आईबापांचें हृदय काबीज करण्याचा

सोपा उपाय त्यांच्या मुलांचें प्रेम संपादणें हा होय. यजमानाचे पाहुण्यांशीं सुद्धां आदरानें वागावें. आपण हंसतमुख व विनोदी असावें, पण विनोद असा असावा, कीं, ज्याच्याविषयीं तो असतो त्यालासुद्धां तो आवडावा; तथापि व्यक्तिविषयक थट्टा जितकी टाळतां येईल तितकी बरी. थट्टा करूंच नये असें माझें मत आहे. प्रत्येकाशीं त्या त्या व्यक्तीच्या आवडत्या विषयावर चार शब्द बोलावेत. आवड धोरणानें ओळखावी. नुसत्या गप्पा मारीत फिरण्यापेक्षां काम करतां करतां गप्पा माराव्या. काम अगदीं हलकें किंवा बिनअकलेचें किंवा फार वेळ लागणारें साधल्यास टाळावें. उदाहरणार्थ, पाहुण्याचे धोतराच्या निऱ्या करून देण्यापेक्षां त्यांना विडा करून देणें चांगलें. यजमानाचे मजघरांतील केर काढण्यापेक्षां स्वयंपाकघरांत चटण्या, कोशिंबिरी करणें बरें. धुणीं वाळत घालण्यापेक्षां यजमानीणबाईस दागिने चढविणें, वेणीफणी करणें, लुगडें नेसविणें वगैरे उत्तम. पाट, पानें मांडण्यापेक्षां रांगोळ्या घालणें किंवा पदार्थ वाढणें श्रेयस्कर आहे. प्रत्येक काम करणारीला तिच्या कामाची वाखाणणी करून तिला पसंत पडतील अशा सुधारणा सुचविणें सर्वांत उत्तम. रिकामे माशा मारीत बसूं नये. लोकांपासून माहिती घ्यावी व द्यावी. वादविवाद कधींच करूं नये. कुणाचा पाणउतारा न होईल असें बोलावें. चपळपणें स्त्रिया व पुरुष गंभीरपणें शोभतात. मुलें कशींही शोभतात. मात्र तीं घाणेरडीं नसावींत.

श्री. सौ. रमनाबाईनीं सांगितल्याप्रमाणें भाषण गोड असावें. सुभाषितांची छटा मधून मधून दिसावी, पण त्यांची गर्दी वाईट. विशेष प्रचारांतील व उथळ अर्थाच्या म्हणी वापरूं नयेत. त्या ग्राम्य व अशुद्ध नसाव्या. सुभाषितें व म्हणी ह्या भाषासागरांतील मौक्तिकेंच आहेत. तीं सुवर्णालंकृत ( सुवर्ण=सोनें. पक्षीं चांगले वर्ण, अक्षरें ) केलीं असतां विशेष शोभतात. प्रसंगानुरूप व ऐकणाऱ्याच्या योग्यतेप्रमाणें भाषण असावें. लांबलचक चऱ्हाट वळूं नये. आपल्याकडे आलेल्याशीं अबोलपणें आपलेंच काम करीत राहूं नये. न बोलावतां कोणाचे घरीं जाऊं नये, पण आजारी मनुष्यांचे समाचारास जाण्यास हरकत नाहीं. संकटांत असलेल्यास शक्त्यनुसार मदत करावी. सर्वांभूतीं अन्नदान । द्रव्य सत्पात्र पाहून ।। असें श्रीतुकाराममहाराजांचे अभंगांत म्हटलें आहे. तथापि आळसास उत्तेजन देऊं नये. कामाची आवड उत्पन्न करावी. बक्षिसाची संवय लावूं नये, व होतां होईल तों बक्षीस देऊं नये.

कृत्रिमपणानें आपण जसें केव्हां केव्हां सौजन्य दाखविण्याची खटपट करतों, तशीच संवय अंगवळणीं पडावी, ह्मणजे त्यांतील कृत्रिमपणा जाऊन शुद्ध रूप राहतें. आपले अंगीं सौजन्य व सहनशीलता असली तरी अपाय करणाऱ्यास तात्काळ शासन केलेंच पाहिजे. तुह्मी दुसऱ्यास दुखवूं नका, पण दुसरा जर तुह्मांस दुखवील तर त्याचा जोरानें प्रतिकार करावा. 'कशाला? जाऊं दे कीं. अशानें काय होणार?' असें ह्मणाल तर मग तो तुह्मांला अनावर होईल. अग्नि, शत्रु, सर्प व रोग लहान असतांनाच नाहींसे केले पाहिजेत. बळावल्यावर मग तुमचा घात केल्याशिवाय रहाणार नाहींत. करितां वेळींच त्यांचा प्रतिकार केला पाहिजे. त्याचप्रमाणें मुलें सुद्धां आडमार्गास जातील, तर तत्काळ त्यांना ताळ्यावर आणलें पाहिजे.

सर्वांशीं प्रेमानें वागा, सद्गुणाला उत्तेजन द्या, मुलांचें चांगलें संगोपन करा, पतीला संतुष्ट ठेवा, प्रत्येक काम काळजीपूर्वक करा. वेळ संपत आल्यामुळें मी आतां भाषण आटोपतें घेतें. अध्यक्षांचे व श्रोत्यांचे आभार मानून मी आपली रजा घेतें." (टाळ्या.) इतकें बोलून श्री. सौ. अन्नपूर्णाबाई आपले जाग्यावर बसल्या. नंतर श्री. सौ. वेत्रिकाबाई या उठल्या. त्यांचें भाषण पुढील पत्रीं.

या चार पत्रांपासून कांहीं उपयोग होत आहे असें समजल्यानंतर व सध्यां असलेल्या कामाचा बोजा हलका झाल्यावर मग पुढील पत्रें लिहीन. ह्मणजे १५ दिवसांची थोडी विश्रांति घेण्याचा विचार आहे. काय घडतें पहावें.

आपण कामावर रुजूं झाल्याचें समजलें. काम योग्य रीतीनें संभाळून वरिष्ठांना सुप्रसन्न ठेवाल व सद्गुणांनीं आपल्या कुलाला भूषण व्हाल अशी आशा आहे. कळावें. रा. रा. शंकरराव यांना नमस्कार कळविणें. हे आशीर्वाद.

आपला

**शंकर चिंतामण श्रीखंडे.**



## पत्र ५ वें

# श्री. सौ. वेत्रिकाबाई यांचें व्याख्यान.

## व्यवहारचातुर्य.

अलेक्झांड्रिया. श्री. ता. २१ आगष्ट १९१५

चिरंजीव सौभाग्यवती कृष्णाबाई यांसः—

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. मी येथें श्रीकृपेनें सुखरूप आहें. सभेची हकीगत पुढीलप्रमाणें:—

नंतर श्री. सौ. वेत्रिकाबाई या उठल्या. त्यांची शरीरयष्टि उंच व सडपातळ असून, तरतरीतपणा व चिकाटी त्यांचे चेहऱ्यावर स्पष्ट दिसे. दृढनिश्चयाबद्दल त्यांची ख्याति होती. कर्तव्यमार्गांत येणाऱ्या अडचणींचा जोर असह्य झाल्यास वांकावें, पण मोडूं नये हा त्याचा बाणा होता. आबालवृद्धांना आपण उपयोगीं पडावें अशी त्यांची वृत्ति असल्यामुळें त्या सर्वांना आवडत. हट्टी, बेमुर्वतखोर व दुर्गुणी जनाना ताळ्यावर आणण्याविषयीं त्याचा मोठा कटाक्ष होता. कधीं कधीं मित्रपक्षाभिमानानें, शत्रूला त्यांनीं जबर दुखापती करून जेरीस आणलें होतें. वेत्रिका ( काठी ) हें नाव त्यांना यथार्थ असून अगदीं शोभत होतें. त्यांचा व रा. रा. हेमाडपंतांचा जोडा अद्वितीय होता. आडनांव दोरखंडे सुद्धां फार योग्य. कडक व कठोरपणे वागून दुसऱ्यास ताब्यांत आणण्यापेक्षां, सौम्य व मृदु उपायांनीं त्याला बांधून आपलासा करणें, त्यांना पसंत असावेंसें दिसतें. असो. त्या ह्मणाल्याः—

"मानिनीजनहो! श्री. सौ. अन्नपूर्णाबाईनीं आपणांस जें आतां सांगितलें, त्याचीच पुरवणी मी आपणांपुढें सादर करणार आहें. दुसऱ्याशीं आपण वागतांना जी क्रिया करतों तिला मी ' व्यवहार ' हें नांव देतें. व्यवहारचातुर्याविषयीं चार शब्द मी बोलेन. प्रत्येकाला व्यवहार करावा लागतोच, व त्यापासून थोडें बहुत शिक्षण त्याला मिळतें. पण आपण त्यापासूनच मिळविण्याचा प्रयत्न केल्यास जास्त मिळतें. शिक्षणप्राप्तीचें प्रमाण प्रयत्नावर अवलंबून आहे. प्रत्येक गोष्टीचा निरनिराळ्या दृष्टीनें विचार करावा. विचार व धोरण यांचे

मिलाफानें व्यवहार उत्तम वठतो. अनुभवजन्य ज्ञान मिळेल तितकें मिळवून सांठवावें, व प्रसंगीं त्याचा उपयोग करावा. मला कसेकसे अनुभव आले, त्याचें दिग्दर्शन मी करतें. व्यवहारांत यश मिळण्यास मनुष्यस्वभावाची माहिती असणें अवश्य आहे. स्वभाव ही दृश्य वस्तु नाहीं. पण बोलण्याचालण्यावरून, स्वरूप व पोषाखावरून, आचार व वागणुकीवरून, त्याचें अनुमानस्वरूप काढतां येतें. मनुष्याचीं पुष्कळ कृत्यें त्याचे स्वभावानुरूपच असतात. प्रथम स्वभाव ओळखण्यास शिकलें पाहिजे. येथें तर्काचें विशेष काम आहे. धूर पाहून येथें कोठें जवळपास अग्नि आहे–असावा–असें अनुमान आपण काढतों, किंवा दारांत मांडव पाहून लग्नमुंजीची आठवण होते, व दिवा पाहून मनुष्यवस्तीचा तर्क आपण करतों, तसेंच स्वभावाचें. आवाजावरून जसें आपण कोण बोलत आहे तें जाणतों, तसेंच कृतीवरून व बाह्य स्वरूपावरून जाणण्यास शिका. धडा थोडा अवघड आहे खरा, पण शिकल्यास येतो.

मुद्रेवरून स्वभाव थोडासा समजेल. साधूची शांत व गंभीर मुद्रा पहा, व लुच्च्याच्या डोळ्यांतील चंचलपणा पहा. विद्वान् मनुष्याचें भव्य कपाळ पहा, मग एखाद्या टोणप्याकडे दृष्टि फेंका. एखाद्या चिताऱ्याच्या किंवा गवयाच्या रेंखल्यासारख्या भुंवया पहा, व नंतर दुष्ट, क्रूर अशा एखाद्या गुन्हेगाराकडे नजर टाका. मुलांचा निरपराधी, निष्कपट व कोमल चेहरा पाहून तुमचे मनांत त्यांचेविषयीं प्रेम, वात्सल्य व सहानुभूति उत्पन्न होत नाहीं काय? राग, द्वेष, प्रेम इत्यादिकांच्या छटा चेहऱ्यावर तुम्हांला दिसतात. त्याच वारंवार उमटल्यास चेहऱ्याचा आकार तसाच होतो व स्वभावही तसाच बनतो. नाटकांत स्त्री–वेष घेणारा पोरगा बायकांसारखेच हावभाव इतर ठिकाणींही करतो. तसेंच स्वभाव किती झांकला तरी बाहेर पडल्याशिवाय रहात नाहीं. क्वचित्प्रसंगीं सहवासानें स्वभाव बदलतो. बहुतकरून सारख्या स्वभावाच्या लोकांचें सख्य आढळतें.

स्वभावाचा $\frac{१}{३}$ चेहरा, डोळे व पोषाखावरून–बाह्य स्वरूपावरून–समजतो. त्याहून $\frac{१}{६}$ जास्त त्याचे भाषणावरून समजतो. त्याहून $\frac{५}{१२}$ जास्त कृतिपरीक्षणानें व सहवासानें कळतो. राहिलेला $\frac{१}{१२}$ कोणासच कळत नाहीं. समजलेल्या भागावरून अंदाज काढतां येतो व तो सहसा चुकत नाहीं. व्यवहारास तितका बस्स आहे.

पाणीदार चंचळ डोळे, तीव्र बुद्धि व ग्रहणशक्ति दाखवितात. त्याचबरोबर आरशाप्रमाणें स्पष्ट व मनोविकारांचें योग्य चित्र दाखविणारा चेहरा असल्यास, तो मनुष्य संगतीस योग्य असतो. पण चेहऱ्यावर कपट असल्यास तो महा-बिलंदर आढळून येतो. तुमच्याशीं बोलतांना किंवा तुमचें भाषण ऐकतांना ज्याचे डोळे तिसरीकडेच असतात, त्याच्याशीं संभाळून वागा. वारंवार ज्याचे डोळे हालतात, किंवा पापण्या उघडझांक करतात, तो चंचल मनाचा असतो. निश्चयानें काम करणार नाहीं, वचन पाळणार नाहीं व धरसोड्या राहील. झोंपेंतून उठल्याप्रमाणें अर्ध्या मिटलेल्या पापण्यांचा, किंवा जड, धुंद पापण्यांचा मनुष्य आळशी असेल, पण बोलेल त्यापैकीं बरेंच करील. अशा मनुष्याचें शत्रुत्व संपादिल्यास जबर नुकसान होतें. मोठे व बाहेर आल्याप्रमाणें दिसणाऱ्या डोळ्यांचा मनुष्य अदूरदृष्टि पण बुद्धिमान् असतो. व तोच दूरदृष्टीचा असल्यास क्रूर व पुंड होऊन पुष्कळांवर ताबा चालविणारा असतो. लहान डोळ्यांचा संकुचित बुद्धीचा असतो. काणा कपटी व लुच्च्या असतो. दोन डोळ्यांच्या माणसापेक्षां एक डोळ्याच्यास धोरण जास्त असतें. हरिणासारख्या डोळ्यांचे लोक सुस्वभावी, सुशील व निरुपद्रवी असतात. डोळ्यांत स्वभावाचें प्रतिबिंब दिसतें असें तुम्हांला वाटत नाहीं ?

असले प्रकार पुष्कळ वर्णन करतां येतील. तुम्हांला एक मार्ग दाखविला. कोणीही मनुष्य तुम्हासमोर आल्याबरोबर, वरपासून खालींपर्यंत त्याचेकडे एकदां पहा; व तो कसा असेल याची प्रथम कल्पना करून, मग त्याच्याशीं भाषण करा व तुमची कल्पना कितपत बरोबर आहे तें ताडून पहा. हा अभ्यासण्यायोग्य विषय आहे. फारच मनोरंजक असून परिणामीं हितकर आहे.

मनुष्याला पाहिल्याबरोबर त्याचे स्वभावाची साधारण बरोबर कल्पना तुम्हांला करतां येऊं लागली कीं तुमचा व्यवहार यशस्वी होण्यास सुरवात झालीच. तत्पूर्वीचे व्यवहाराचे नियम ढिले व अपूर्ण होत. प्रथम स्वभाव ओळखण्यास शिकलें पाहिजे. इतिहासप्रसिद्ध ज्यूलियस् सीझर व आपले शिवाजीमहाराज यांसारखे पुरुष याच गुणानें मोठेपणास चढले. कोणत्या मनुष्याचा कसा उत्तम उपयोग करून घेतां येईल, या प्रश्नाचें उत्तर हीच यशाची किल्ली. झटून शिकल्याशिवाय ही किल्ली हातीं येणार कशी ?

आपणांस जर सरळपणें जावयाचें–चालावयाचें–तर मग हा उपद्व्याप कशाला ? होय. सरळपणें चालावयाचें. पण आमचें चालणें जमिनीच्या स्वभावावर अवलंबून आहे. सपाट, उंच, सखल, बुळबुळीत, कोरडी, मऊ, टणक, भुसभुशीत किंवा दलदलीची जमीन असल्यास, चालण्याची पद्धत बदलणार कीं नाहीं ? तीच गोष्ट व्यवहाराची.

जगांत प्रत्येक वस्तूची किंमत पैशानें ठरविली जाते. पैशाच्या मापानें सर्व पदार्थ मोजले जातात. सद्‌गुणसुद्धां पुष्कळ अंशीं पैशानेंच तोलले जातात. व्यवहारांत पैशाला प्रथम महत्त्व मिळतें. किती पैसा पेरला–खर्चिला–तर किती प्रमाणानें तो वाढतो, हा जो पैसा वाढविण्याचा प्रकार तोहि व्यवहाराचेंच एक अंग आहे. पैसा किंवा ज्याला पैसे पडतात असले जिन्नस खर्च करून आपण सुख विकत घेतों. सुखाकरितां सगळे प्रयत्न आहेत. व्यवहारही त्याकरितांच. त्या व्यवहारांत आपण चूक केल्यास सुखाऐवजीं दुःख पदरीं पडतें; तसें न व्हावें ह्मणून जपावयाचें. आपण सुखी राहून दुसऱ्यास सुख देणें हें पहिलें कर्तव्य आहे. तथापि दुसऱ्यास सुखी करण्याचें धोरण फार विचारानें ठरवावें लागतें. तो प्रकार असाः—

दुसऱ्यांनीं प्रयत्न न करतां जर त्यांस तुह्मी सुख देऊं लागलां, व तें त्यांना मिळूं लागलें ह्मणजे ते निष्काळजी, आळशी व दुर्गुणी होतात. व या परोपकाराबद्दल तुह्मांला पश्चात्ताप होईल. आपणांस पुढें मागें पश्चात्ताप करावा लागेल व अमुक गोष्ट केली नसती तर बरें, असें वाटेल, ती गोष्ट प्रथमच करूं नये. याचा अर्थ प्रत्येक गोष्ट दूरवर विचार करूनच करावी. तुमच्या श्रमानें पुष्ट बनलेले तुमचे आश्रित, जर तुह्मांस दुःखाला कारण झाले, तर तुम्हांला कसें बरें आवडेल ? प्रयत्नावांचून कोणतीही वस्तु कोणास मिळूं देऊं नये व स्वतः देऊं नये. किंबहुना त्यांचे प्रयत्नाप्रमाणेंच–योग्यतेप्रमाणेंच–त्यांना आपण सुख देणें इष्ट आहे. तसेंच तें न्यायाचेंही आहे.

सर्वांभूतीं बंधुप्रेम जरी चांगलें दिसलें व तत्वतः चांगलें असलें तरी सेवकांशीं धन्यानें धन्याप्रमाणेंच वागलें पाहिजे. सेव्यसेवक, पतिपत्नी, पितापुत्र, गुरुशिष्य, इष्टमित्र वगैरे भाव पूर्णपणें पाळणेंच श्रेयस्कार आहे. आपले वरिष्ठ अधिकारी कितीही चांगल्या स्वभावाचे असले तरी, आपली सेवकाची पायरी सोडून आपण वागूं नये. व्यक्तीच्या स्वभावानुरूप प्रत्येक व्यक्तीशीं वागावें.

हा जो फेरफार आपण करतों, त्यांतच आपलें व्यवहारचातुर्य दिसून येतें. मित्रांना मदत करणें हें आपलें कर्तव्य आहे. पण, थोडीशी ओळख झाल्याबरोबर जो आपणांस तुमचा मित्र ह्मणवूं लागतो, व लगेच थोडे दिवसांत कांहीं पैसे उसने मागतो, तो लुच्चा समजावा. त्याची संगत टाळलीच पाहिजे. जे पुष्कळ बोलतात त्यांना भिण्याचें कारण नाहीं. कारण ते बहुधा आपले शब्द कृतींत उतरीत नाहींत, व तुह्मांला त्यांची समजूत घालतां येईल. पण न बोलणाऱ्यांनाच भ्यालें पाहिजे. वाईट मित्रांपेक्षां चांगले शत्रू बरे. कारण ते आपला हेतु स्पष्ट व उघड दाखवितील, व मग तुह्मी त्यांना तोंड देण्यास तयार राहूं शकाल.

आपण नेहेमीं हंसतमुख असावें, ह्मणजे मन प्रसन्न राहून प्रसंगीं बावरत नाहीं व प्रकृति चांगली राहते. तथापि, आपणांस राग आणतां व दाबतां आला पाहिजे. आपण कोणाची आगळिक करूं नये, पण दुसऱ्यानें केल्यास त्याला योग्य कारणाशिवाय क्षमा करूं नये. शिक्षा केल्यास दावा धरूं नये. योग्य रीतभात सोडून कोणी वागल्यास, ती गोष्ट तत्काळ किंवा वेळ पाहून त्याचे नजरेस आणावी. उदाहरणार्थः— धन्यासमोर सेवकानें बसून राहूं नये. आपण कोणी बाजीराव नाहीं, बसेना नोकर बिचारा, असें ह्मणून त्याला तुमच्या अपमानाबद्दल तसाच जाऊं देऊं नये. कारण पुढें थोडे दिवसांनीं तोच तुमच्यांशीं उद्धटपणानें वागतांना पाहून तुह्मांस वाईट वाटेल. वेळींच त्याला शिक्षा केली पाहिजे. गोड शब्दांप्रमाणेंच कठोर शब्दही ठाऊक असावेत, व प्रसंगीं वापरावेत. आपणांसमोर उगीच चऱ्हाट वळीत बसणारे नोकर कुचकामी ठरतात. सांगितलेल्या कामासंबंधीं सबब ऐकूं नये. तें काम झालेंच पाहिजे असा निग्रह धरावा व करावा. शब्दांप्रमाणें चेहऱ्यावर आविर्भाव उमटले पाहिजेत, व हावभाव —नाटकी नव्हे—करावेत. त्याशिवाय तुमचे शब्दांचा परिणाम होणार नाहीं. राग आला असतां मोठ्यानें बोललेंच पाहिजे. दुसऱ्याचें मन वळवितांना हळुहळु व त्याचा हात धरून किंवा त्याचे खांद्यावर हात ठेवून बोलावें. तो एकटाच असल्यास तुमचें काम हटकून होईल. तुमचें मन नेहेमीं शांत व विचारी ठेवावें. असो. वेळ संपल्यामुळें मी आपले आभार मानून रजा घेतें." (टाळ्या)

कळावें. लो. अ. हे आशीर्वाद. आपला

शंकर चिंतामण श्रीखंडे.

———

## पत्र ६ वें

# मिसेस् नवीबाई यांचें व्याख्यान

## सामाजिक सुधारणांचें ध्येय.



अलेक्झांड्रिया. श्री. ता. ३० आगस्ट १९१५

श्री. सौ. चिरंजीविनी कृष्णाबाई यांस.

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. कामाचा बोजा किंचित् हलका झाल्यावर सभेची हकीकत कळवितों ती पुढील प्रमाणेंः—

नंतर मिसेस् नवीबाई सुधारक बोलावयास उठल्या. त्यांचा पेहराव हिंदुस्थानांतील खिस्ती बायकांप्रमाणें नसून युरोपियन मडमेसारखा होता. रंग काळा होता, तरी (Powder) पूड लावून शक्य तितकी सफेती चढविली होती. पायांत बूट काळया पायमोज्यांवर घातले होते. घोट्यांपासून गळयापर्यंत नक्षीदार झगा होता. कमरेभोंवतीं एक रेशमीं वस्त्र पट्टयाप्रमाणें बांधलें होतें. हातांत हातमोजे असून डावे खांद्यावरून खालीं एक झोळण्यासारखी पिशवी लोंबत होती. त्यांत चाकू, कात्री, सुई व दोऱ्याचें पाकीट, टांचण्या, नोटबुक व पेन्सिल, कांहीं हातरुमाल, एक लहानसा आरसा व फणी, ॲमोनियाची सुवासिक बाटली, पैशाचें पाकीट, सुतळीचा लांब पण आटोपसर तुकडा, इंच मोजण्याची कापडाची पट्टी, पेपरमिंटच्या गोळया, चकत्या व चॉकलेट्च्या वड्या असलेला एक लहानसा डबा, पॉवडरची [तोंडास लावण्याच्या] डबी, जखमेस लावण्याच्या मलमाची डबी, चष्मा व त्याचें घर, एक मनोरंजक गोष्टींचें पुस्तक वगैरे वगैरे पुष्कळ उपयुक्त जिनसा असाव्यात! पण, तरीसुद्धां ती पिशवी ओबडधोबड पडशीप्रमाणें किंवा अवजड दिसत नव्हती. ती पिशवी ह्मणजे एक टुमदार, उपयुक्त वस्तुभांडारच होतें. त्या वस्तूंचा हरवेळीं कसा उपयोग होऊं शकेल, याची कल्पना कोणासही होण्यासारखी आहे. त्यांच्या डोक्यावरचे केस टोपीप्रमाणें रचले होते. फक्त तोंड व गळा मोकळा; पण त्यावरून सुद्धां एक जाळीदार कपडा बांधला होता. अंगाला व कपड्यावर कोठें कोठें सुवासिक पाणी लागल्यामुळें व सांडल्यामुळें त्या उठून टेबलापाशीं येऊं लागल्याबरोबर, इकडे तिकडे परिमलाच्या लाटा उसळल्या. मला वाटलें यांचें भाषण इंग्रजींत

होईल, ह्मणून मी विशेष उत्कंठेनें पाहूं लागलों. श्रोतृसमाजापुढें ही नवीन व डोळे दिपविणारी व्यक्ति आल्यामुळें त्यांच्यांत बरीच चळवळ [स्वदेशी नव्हे,] उडाली. कांहीं मुलें भेदरून आईच्या कुशींत शिरूं लागलीं. विद्यार्थिवर्गांना ही मडम आतां आपली परीक्षा घेणार कीं काय ह्मणून धास्ती वाटूं लागली, पण झटून अभ्यास करणाऱ्यांना काल्पनिक परीक्षेनंतर आपणांस बक्षीस मिळेल ह्मणून उत्साह वाटूं लागला. असो. त्या काय सांगतात तें तर पाहूं. तें पहा त्यांनीं सुरवात केली. त्या ह्मणाल्याः—

" अध्यक्ष, विदुषीगण आणि श्रोतृवृंद हो! श्री. सौ. वेत्रिकाबाईचें भाषण आपण लक्षपूर्वक श्रवण केल्यानंतर, मी कोणत्या विषयावर बोलणार आहें, हें आपण माझ्या बाह्य स्वरूपावरून ताडलें असेलच. निदान त्यांचे सिद्धांताप्रमाणें साधारण अनुमान तर तुह्मीं केलें असेल. मनुष्यस्वभाव व तदनुरूप त्याची आवड ओळखण्याचा जर हा तुमचा पहिलाच प्रयत्न असेल तर कांहीं चूक होण्याचा संभव आहे. पण प्रयत्न करावाच. मीहि आतां सांगतें. ह्मणजे तुमचें अनुमान कितपत बरोबर आहे तें तुह्मांस समजेल.

हिंदुस्थानांतील स्त्रियांमध्यें काय काय सुधारणा होणें आवश्यक आहे, तें मी आज सांगणार आहें. हिंदुस्थानांतील स्त्रीसमाज नीतिमत्तेंत जरी पाश्चात्य स्त्रीवर्गापेक्षां श्रेष्ठ असला तरी सुशिक्षितपणा व व्यवहारकौशल्य यांत फारच मागें आहे हें विद्वान् व पाश्चात्य स्त्री-पुरुषांशीं संघट्टन घडलेल्यांना कळून चुकलें आहे. या सभेंत प्रकाशमान व प्रतिभासंपन्न अशीं स्त्रीरत्नें आहेत. पण अशीं किती सांपडतील? फारच थोडीं. याचें मुख्य कारण अज्ञान हें होय. शिक्षणावांचून अज्ञान जात नाहीं. अज्ञान संपल्याशिवाय सुधारणा होत नाहीं. तेव्हां प्रथम शिक्षण पाहिजे हें ठरलें. शिक्षणाचे पायावर सुधारणेची इमारत बांधावयाची. शिक्षणामध्यें मुख्य गोष्टी, लिहिणें, वाचणें, अंकगणित, इतिहास, भूगोल, भाषाविषय, पदार्थविज्ञानशास्त्र, अर्थशास्त्र, भूगर्भशास्त्र, पाकशास्त्र वगैरे अनेक शास्त्रांसंबंधीं थोडी थोडी माहिती असणें अवश्य आहे. शरीरशास्त्र, वैद्यशास्त्र, चित्रकला, गायन, नृत्य, वादन, कशिदा काढणें, शिवणकाम, सुईणकाम, रोग्याची शुश्रूषा करणें, बालसंगोपन इत्यादि विषयांचीसुद्धां माहिती हवीच. आयुष्य थोडें व शास्त्रें फार अशी स्थिति आहे. शिवाय आमच्या

मागें गृहकृत्यें इतकीं असतात कीं शिक्षणास वेळ मिळत नाहीं. पण आमच्यावर जबाबदारीही विशेष महत्त्वाची असल्यामुळें वेळ काढून शिकलें पाहिजेच. शिक्षणानें जलद काम कसें करावें हें समजतें व वेळ वांचवितां येतो. हा वेळ पुन्हां शिक्षणास उपयोगी पडतो. आपण कित्येक वेळां वेळ नुस्ता दवडीत असतों, व वेळ जात नाहीं ह्मणून तक्रार करतों. पण शिक्षणाची अभिरुचि उत्पन्न झालेल्यांचें उलट असतें. ह्मणजे त्यांना वेळ पुरत नाहीं. वेळोवेळीं कांहीं नवें शिकण्याचा प्रयत्न करावा व जुन्याची उजळणी करावी. आपणांस ठाऊक नसेल तें विचारून समजून घेण्याचा प्रयत्न करावा. विचारण्यास लाजूं नये व आपणांस माहित आहे असा अभिमान धरूं नये. स्वतः शिकून दुसऱ्यास शिकविणें हें आपलें कर्तव्य आहे. लहानपणीं शिक्षण आईबापांवर अवलंबून असतें. आपणांस समजूं लागल्यावर आपणांकडेच असतें. तुमच्या मुलांना चांगलें शिक्षण द्या व स्वतः रोज शिका. शिक्षणापासून फायदे होतात असें जर तुह्मीं आपल्या कृतीनें सिद्ध केलें तर तुमचे शिक्षणास कोणी आड येणार नाहीं. उदाहरणार्थ, घरचा जमाखर्च, धोब्याकडे दिलेल्या व आलेल्या कपड्यांचा हिशेब, दरमहा लागणारे पदार्थांचा ठोकताळा, इतिहासांतील किंवा दुसऱ्यांच्या अनुभवांचा आपण उपयोग करणें, वेळचे वेळीं काम करणें व संपविणें, करमणुकीच्या गोष्टी वाचून दाखविणें, गाणें, कुशलतेनें वागणें वगैरे गोष्टी तुह्मी करून पतिराजांच्या कामाचा बोजा हलका केल्यास ते तुमच्या शिक्षणास मदत करतील इतकेंच नव्हे तर स्वतः सुद्धां शिकवितील. मात्र तुमचे ठिकाणीं शिकण्याची इच्छा व तदनुसार प्रयत्न पाहिजेत.

पण हें काय ? शिक्षणाच्या वर्णनाबरोबर मी वहातच चाललें ! असो. शिक्षण हा पाया आहे व तो भक्कम करण्याचा प्रयत्न मीं केला. याशिवाय काय काय सुधारणा पाहिजेत त्या पाहूं. शिक्षणानें चांगलें, वाईट याची निवड करतां येईल व त्यामुळें चांगल्याचा स्वीकार करण्यास सोपें पडेल. विचारपूर्वक युक्तीनें काम करण्याची संवय लागून टापटीप, शिस्त व बिनचूकपणा अंगीं येईल. तुमचें काम उत्तम वठून लोक तुमचा कित्ता घेतील. संसारखर्च व्यवस्थितपणें चालून, पैशाचा योग्य विनियोग होईल. त्यामुळें सुख वाढेल. ज्ञान वाढवितां येईल. मुलें सुशिक्षित निपजतील, व कुळाला ऊर्जितावस्था

येईल. जिकडे तिकडे आनंदीआनंद होईल. हें सुखस्वप्न आहे. पण प्रयत्न केल्यास अनुभवास येईल. हें कांहीं अशक्य कोटींतील नाहीं.

स्त्रीवर्गानें पुरुषांप्रमाणें कांहीं स्वतंत्र धंदा शिकला पाहिजे. पुरुष जर आपलें नशीब उद्योगानें उघडूं शकतात, तर स्त्रियांना तसें कां करतां येऊं नये? स्त्रिया कोणत्याही प्रकारें पुरुषांपेक्षां कमी नाहींत. तुह्मी पुरुषांवर अवलंबून किती दिवस रहाणार? पुरुषांप्रमाणें हक्क आपणांस असावेत अशाबद्दल इंग्लंड वगैरे देशांतील स्त्रियांनीं जोरानें मागणी केली आहे. व पुरुषांप्रमाणेंच जबाबदारींचीं कामें पार पाडण्यास त्या तयार आहेत. त्या तुमच्या भगिनींकडे पाहून तरी तुह्मी जागे व्हा.

सुधारणेचे प्रयत्न प्रथम स्वतःच्या शरीरापासून सुरू करावेत. स्वच्छपणा राखण्यानें व स्वच्छ असण्यानें मन प्रसन्न राहतें. स्वच्छपणा देवपणाइतकाच सुंदर आहे. हातपाय, तोंड, डोळे, नाक, कान, मस्तक स्वच्छ ठेवावींत. वेणीपेक्षां बुचडा बरा. कारण केसांस ताण पडत नाहीं. केस ताणल्यानें मेंदूस त्रास होऊन डोकें दुखेल व टक्कल पडण्याचा संभव आहे. केस तेलकट होऊं देऊं नयेत. नाकाकानांस भोंकें पाडून दागिने घालण्याची चाल कोणी शहाण्यानें पाडली ईश्वर जाणे! गळ्यांत किंवा हातापायांत घाला. दागिने न घालणेंच चांगलें. दागिन्यांपासून नेहमीं नुकसानच होतें.

चोळीपेक्षां पोलक्यानें अंग चांगलें मर्यादशीरपणें झांकलें जाऊन थंडीचेंही निवारण होतें. निरुपयोगीपणांत चोळी श्रेष्ठ ठरेल. पोलक्यापेक्षां चोळीच जास्त छचोर दिसते. लांबलचक, बोजड लुगड्यापेक्षां झगा चांगला. पायांत पायमोजे व बूट घालावेत. पुरुषांनीं जोडा घालून व छत्री घेऊन दुपारीं निघावें व बायकांनीं मागून तापलेल्या जमिनीवरून अनवाणी उघड्या डोक्यानें चालावें ही चाल अत्यंत निर्दयपणाची द्योतक आहे. पुरुषांनीं स्वच्छ हवेसाठीं बाहेर फिरावयास जावें व बायकांनीं चूल सोडूं नये असें कां? पुरुषाचे दोन्ही हात कोणतेही कामास मोकळे रहावेत व बायकांच्या एका हातांत पदर पाहिजेच हें काय? बाहेर जातांना पुरुष हातांत काठी घेऊं शकतात, पण बायकांना मात्र तशी परवानगी नाहीं! एखादें कुत्रें, मांजर किंवा जनावर अंगावर आल्यास त्यांना पळण्यावांचून (पळावयास तरी कोठें येतें?) किंवा आरडण्यावांचून दुसरा स्वसंरक्षणाचा उपाय कां नसावा? त्यांचें जीवित इतकें परावलंबि कोणी केलें?

प्रत्येक स्त्रीस स्वतंत्रपणें पोट भरण्याची कांहीं कला येणें अत्यावश्यक आहे. नुसत्या स्वयंपाकीणबाई बनून चालत नाहीं. दुर्दैवानें नवरा मरण पावल्यास त्या स्त्रीचे हाल कुत्रासुद्धां खाणार नाहीं. अंगीं गुण नसल्यानें नात्याची माणसेंसुद्धां मान ठेवीत नाहींत, मग दुसरे कशाला विचारतील? नवरा मेलेल्या स्त्रीपेक्षां पोतेऱ्यालासुद्धां मान जास्त असतो! स्त्रियांची अशी अवहेलना करणाऱ्या पुरुषांना धिक्कार असो!

मुलीचें लग्न लवकर ह्मणजे तिचें शिक्षण पुरें होण्यापूर्वी करणें हें घातक आहे. आईबाप मुलीच्या शिक्षणाची जितकी काळजी घेतील तितकी सासूसासरे घेणार नाहींत. मुळीं बायको ह्मणजे गुलाम, अशी जेथें भावना, तेथें त्या बिचारीच्या शिक्षणाची कोण पर्वा करतो? बायकोच्या शिक्षणाची काळजी वहाणारे नवरदेव तरी कोठें आहेत? तुला अमुक येत नाहीं, तमुक करीत नाहींस ह्मणून नांवें ठेवतील पण कसें करावें हें शिकविणार नाहींत. शिवाय बालसंगोपनाची माहिती असल्यावांचून मुलीचें लग्नच करूं नये. बालविवाहाची चाल अत्यंत निंद्य आहे. लग्नावांचून स्त्रियांनीं राहिल्यास दोष कां मानावा? तुमचे पुराणांत ( नवीबाई या खिस्ती होत्या. ) गार्गेयी, वाचक्नवीसारख्या, वेदांताप्रमाणें गहन विषयावर वादविवाद करणाऱ्या स्त्रिया अविवाहितच होत्या. मिराबाई, मुक्ताबाई यासुद्धां अविवाहित राहूनच पूज्यत्वाला पोंचल्या. पूज्यत्व गुणांवर आहे. रीतिभातींवर थोडेंच आहे? शिवाय अक्षता पडून थोडेच दिवसांत नवरा मेल्यास पुन्हां लग्नाची परवानगी नाहीं. मग हें लग्नाचें सोंग कशाला? व हें आहे तरी काय? पुरुषांना चार चार लग्नेंसुद्धां करतां येतात, पण बायकांनीं अं हं.

पुरुष व बायका यांनीं एकत्र जमून परस्परांचे विचार परस्परांनीं समजावून घ्यावेत; एकत्र फिरावयास, सभेस किंवा प्रार्थनेस जावें. एकत्र मिसळल्याशिवाय बायकांचें अंगीं धीटपणा यावयाचा नाहीं. स्त्रीनें परक्या पुरुषांशीं शुद्ध मनानें भाषण करण्यांत पाप कोणतें? स्त्रियांविषयीं कुत्सित विचार बाळगणारे पुरुष पशूच होत. मी त्यांना काडीइतकीही किंमत देत नाहीं.

स्त्रीला नापसंत असलेल्या पुरुषाशीं तिचा विवाह होऊं नये. व झाला असल्यास तो रद्द होऊन तिच्या मर्जीप्रमाणें वर तिनें पसंत करावा. एखाद्या पशूबरोबर सर्व जन्म घालवण्यापेक्षां मी वैधव्यच पत्करीन.

हिंदुस्थानांतील स्त्रियांची स्थिति सुधारण्यास पारतंत्र्याचें जूं झुगारून देऊन स्वतंत्रच झालें पाहिजे. गुलामगिरींत राहून सुधारणा होणार नाहीं.

भगिनींनो! तुमचे धर्माविरुद्ध किंवा मतांविरुद्ध बोलण्याचा माझा हेतु नाहीं. तसें कांहीं शब्द मी बोललें असल्यास मला क्षमा करा. पण माझें ह्मणण्याचा तुह्मी विचार कराल ना? जें विचारास पटेल व हितावह असेल तेंच करण्याची मी तुह्मांस विनंति करून माझें भाषण संपवितें." (अस्पष्ट टाळया.) या भाषणानें श्रोतृवृंद व्यग्र झाला.

रा. रा. शंकरराव यांना माझे नमस्कार. कळावें, हे आशीर्वाद.

आपला बंधु,

**शं. चिं. श्रीखंडे.**

---

पत्र ७ वें.

## श्री. सौ. लवंगीबाईचें व्याख्यान

**फाटकसर.**



अलेक्झांड्रिया. श्री. ता. ५ सप्टेंबर १९१५

चि. श्री. सौ. कृष्णाबाई यांसः—

अनेक आशीर्वाद उपरि विशेष. रा. रा. शंकरराव हे आजारीपणांतून मुक्त झाल्याचें ऐकून विशेष आनंद झाला. आपण उभयतांनीं सुखरूप व निरामय असावें, अशी ईश्वरचरणीं प्रार्थना आहे.

मागील पत्रावरून सभेचा वृत्तांत लिहीत आहें:—

मिसेस् नवीबाई ह्या आपले जागेवर परत जाऊन बसेपर्यंत श्रोतृवृंदांत विशेषतः प्रौढस्त्रीसमूहांत फार चळवळ उडाली. एकमेकांत कुजबुजणें सुरू झालें व 'धिक्कार, इश्श, थुः, आग लागो त्याला, काय मेलं जिभेला हाडच नाहीं.' इत्यादि शब्दही अस्पष्टपणें उमटले. हा कदाचित् मिसेस् नवीबाई यांच्या शेवटच्या भाषणाचा परिणाम असावा असें मला वाटलें. थोड्या वेळानें येथें बायकांचें बंड होणार कीं काय अशी धास्ती वाटूं लागली. पण लगेच श्री. सौ. लवंगीबाई या उठल्या. लवंग खाल्ल्याबरोबर जशी मळमळ बंद होते, तशा सौ. लवंगीबाई उठल्याबरोबर चळवळ बंद झाली. सौ.

लवंगीबाई यांचा बांधा लहानसर परंतु तरतरीत व पाणीदार दिसत असून, वर्ण काळासांवळा पण तेजस्वी होता. त्यांनीं गुजराथी पद्धतीचा पेहराव घातला होता. आटोपसरपणाकरितां झग्याचा झोळ व चुण्यांची काटाकाट केली होती. बुरखा नव्हता व डोकीवर पदराऐवजीं एक चौकोनी रेशमीं वस्त्र टांचण्यांनीं केसांवर लटकविलें होतें. मध्यवर्ति टेबलाजवळ जाऊन त्या ह्मणाल्या:—

" अध्यक्ष व मानवतीजनहो! थोडा शांतपणें विचार केल्यास तुह्मांस असें आढळून येईल कीं मिसेस् नवीबाई यांनीं आपणांस युरोपिअन् चालीच्या सुधारणा सांगितल्या. त्यांचें शिक्षण त्या पद्धतीनें झाल्यामुळें त्यांचे विचारानें त्या सुधारणा योग्य आहेत. पण आह्मां भारतवासीयांना ह्या विलायती रीतिभाती आवडत नाहींत व कदाचित् शोभणारही नाहींत. त्यांनीं आपले विचार तुह्मांस कळविल्याबद्दल त्यांचे आपण आभार मानले पाहिजेत. तुह्मांला ही नवीन माहिती मिळाली आहे. तुह्मांला आवडत नसेल तसें तुह्मी करूं नका; पण दुसऱ्याचे विचार ऐकून घेऊन आपलें मन क्षुब्ध होऊं देऊं नये. त्यांचे भाषणानें तुमचा किती तरी फायदा झाला आहे. तथापि स्त्रियांनीं पुरुषांशीं स्पर्धा करून चालणार नाहींसें मला वाटतें. स्त्रियांचे अंगीं अधिकार व योग्यता प्राप्त झाली ह्मणजे पुरुष आपोआप सगळे हक्क देतात. अंगीं पात्रता नसतां हक्क मिळविण्याची हांव धरणें हें कोणास शोभेल काय?

योग्यतेनुरूप सर्वांस मिळतेंच. तुमची कर्तबगारी वाढवा, हुषारी दाखवा, व हातीं घेतलेलें काम आपण पार पाडूं असें करा. शिक्षणानें हेंच समजावयाचें. शिक्षणाचा परिणाम जर पुरुषांशीं स्पर्धा करून बंड, बहिष्कार, भांडण व भाऊबंदकी माजविणें हा असेल, तर धिक्कार असो तसल्या शिक्षणाला! पण मिसेस् नवीबाई यांचा हेतु तसा मुळींच नाहीं. चांगल्या शिक्षणाचीच दिशा त्यांनीं दाखविली आहे.

अध्यक्ष, मिसेस् नवीबाई, व तुह्मी या माझ्या टिकेबद्दल क्षमा करावी. तसा प्रसंग प्राप्त झाल्याचें मला वाईट वाटतें. त्यांचे भाषणावर टीका करणें हा माझा विषय नाहीं. आज मी 'काटकसर' यासंबंधीं कांहीं सांगणार आहें. काटकसरीसंबंधीं भाषणांत काटकसर उपयोगाची नाहीं! व प्रसंगीं काटकसर टाळून सढळच झालें पाहिजें. तुह्मांला न रुचणारे कांहीं विचार प्रगट झाल्यानें मला माझा विषय सोडून बोलणें भाग पडलें. असो.

प्रचारांत 'काटकसर,' पैशाचा कंजुषपणें उपयोग करणें या अर्थी वापरतात. अगदीं अवश्य तेवढाच खर्च करून बाकी जमा करणें ही काटकसर होय. थोड्या खर्चानें पुष्कळ उत्पन्न करणें हें काटकसरीचें बीज आहे. परिस्थितीचा निरनिराळ्या दिशेनें व दृष्टीनें विचार करून खर्च करणें ही काटकसरीची शक्ति आहे. सुखासमाधानानें राहून श्रीमंत होणें हें कीलक आहे. प्रसंगीं शिलकींतील पैसा खर्च करून ध्येय मिळविणें हें अस्त्र आहे. काटकसरीची संवय हेंच काटकसरीचें कवच. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष मिळविणें हा परम मंत्र होय. काटकसरीचा विनियोग मी आतां सांगतें. *

पैशाची काटकसर अत्यंत महत्त्वाची आहे. ज्या वस्तूवांचून चालेल किंवा जिचा उपयोग क्वचित्‌च होणार, अथवा ज्यापासून एक व्यक्तीला मात्र सुख, पण पुष्कळांस दुःख होईल असल्या वस्तूंचा संग्रह करूं नये, व त्याकामीं पैसा खर्च करूं नये. साध्या जिनसांनीं जेथें काम होतें तेथें फ्यान्सी व सुदर्शनी वस्तु वापरूं नयेत. कोणत्याही कामीं कितीही पैसा खर्च केला तरी चालतें. यःकश्चित् लिहिण्याचे टांक १ पैशापासून १००० रु. पर्यंत किंमतीचे असूं शकतील. पण विशेष काम देणार नाहींत. कोणत्याही वस्तूचा उपयोग, टिकाऊपणा ( आयुष्य ) जरुरी व शोभा या प्रमाणानें किंमत ठरवावी. त्याच जातीच्या निरनिराळ्या वस्तूंचा तुलनात्मक आढावा काढावा. व त्यांतील मार्क किंमतीशीं ताडून पहावे व ज्या ठिकाणीं किंमतीपेक्षां गुण जास्त आढळतील, ती वस्तु घ्यावी. काटकसर म्हणजे चिक्कूपणा नव्हे किंवा अगदीं हलक्या किंमतींच्याच वस्तु वापरणें नव्हे. काटकसर हें एक शास्त्रच आहे व सद्यःफलदायि आहे. हें अनुभवानें व अभ्यासानें वाढतें.

माझ्या सिद्धांताचे समर्थनार्थ मी एक उदाहरण सांगतें. आपल्या लुगड्याचीच गोष्ट घ्या. सुताडे कच्च्या रंगाचे २॥-३ रु.स एक प्रमाणें मिळतात. पक्क्या रंगाचे ४॥-५ रु. पर्यंत येतात. पण असें सांगण्यापेक्षां मी एक कोष्टकच मांडतें म्हणजे चांगला खुलासा होईलः—

---

* पुरातन स्तोत्रांच्या आरंभीं प्रायः आढळणारे 'बीज,' 'शक्ति,' 'कीलक,' 'अस्त्र,' 'कवच,' 'परम मंत्र' व 'विनियोग' हे समर्पक शब्द काटकसरीच्या 'स्तोत्रा'चें महत्त्व येथें फारच मार्मिकपणें पटवितात. — रा. चिं. श्री.

## काटकसरीचें कोष्टक.

[ खुणांचा अर्थः— ० = नाहीं, – ह्मणजे साधारण, + चांगलें, १ उत्तम. ]

| वस्तूचें नांव. | किंमत रु. | टिकाऊपणा. (एका जोडीचा) | १ वर्षाला किती लागणार व किंमत. | | | शोभा, स्वच्छता व सुख. | | | इतर गुण. | | उत्तमपणांत नंबर. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | नग | | किं. | शो | स्व | सु. | | मार्क. | |
| सुताडे. (कच्चा रंग) | २॥ | १ महिन्यानंतर नेसण्या नालायक. | ४ | = | १० रु. | ० | ० | ० | ० – | १ | ६ |
| सुताडे. (पक्का रंग) | ४॥ | ४ महिने. | ६ | = | २७ रु. | – | – | ० | ओबडधोबड कामाला + | ४ | ५ |
| चिटें. | ३ | ४ महिने. | ६ | = | १८ रु. | – | – | – | रोज नेसण्याला + | ५ | २ |
| पांढरीं पातळें. | ३॥ | ४ महिने. | ६ | = | २१ रु. | + | + | + | रोज नेसण्याला १ | ९ | १ |
| महेश्वरी इलकल. | १२ | ८ महिने. | ३ | = | ३६ रु | + | + | + | रोज नेसण्याला १ | १० | ३ |
| पैठण्या. | ३० | १२ महिने. | २ | = | ६० रु. | १ | १ | ३ | रोज नेसण्याला १ | १६ | ४ |

आतां समजा ० = ० मार्क, – ह्मणजे १ मार्क, + = २ मार्क, १ = ३ किंवा ४ मार्क.

याप्रमाणें मार्कांची बेरीज करा. त्या बेरजेचें प्रमाण खर्चाशीं ताडून पहा. गुणांनीं खर्चास भागा ह्मणजे कोणते गुण स्वस्त पडतात ते तुह्मांला समजेल. अनुक्रमानें ते १०, $६\frac{३}{४}$, $३\frac{३}{५}$, $२\frac{१}{३}$, $३\frac{३}{५}$ व $३\frac{३}{४}$ असे पडतात. यावरून तुमचे ध्यानांत येईल कीं, पांढरीं पातळें नेसावयास उत्तम होत. कच्च्या रंगाचे सुताडे घेणें ह्मणजे व्यर्थ खर्च करणें होय. चिटें व महेश्वरी लुगडीं यांचे गुण सारखेच पडतात. पण दुसऱ्याची किंमत पहिल्याच्या दुप्पट आहे. पण गुण दुप्पट नाहींत. करितां पहिलें चांगलें. अशी ही रीत आहे. व्यवहारांत हें कोष्टक लिहीत बसावयाचें नाहीं. याचा मनानेंच हिशेब करून वागावयाचें. पातळाला जरी २१ रु. पडतात व चिटांना १८ रु. खर्च येतो तरी पातळेंच काटकसरीची आहेत. दूरवर विचार करून स्वस्त तो पदार्थ घेणें ही काटकसरीची किल्ली आहे.

पदार्थ खर्चण्याचा नियम पैशाप्रमाणेंच होय. १ पोत्यांत मणभर तांदूळ राहतात. पोत्याला ६ आणे पडतात. राकेलच्या डब्यांत ३ पायली रहातात व डब्याला २॥ आणे पडतात ह्मणजे मणास १५ आणे झाले, पण डबेच स्वस्त व काटकसरीचे आहेत असें तुमच्या ध्यानांत येईल. तसेंच रोखीनें व सुगींत धान्य घेतलें असतां स्वस्त पडतें, मात्र खराब न होईल अशी खबरदारी घ्यावी. नासणारा माल एकदम जास्त घेऊं नये.

शिवणें, धुणें, रंगविणें वगैरे कामें फावल्यावेळीं केल्यास पुष्कळ पैसा वांचतो. एक पै वांचत असेल तरी वांचवावी. 'थेंबें थेंबें तळें सांचें.' थोड्या भाड्याच्या व गलिच्छ घरांत राहून प्रकृति खराब करून घेऊन डॉक्टर, औषधें वगैरेकरितां पैसे खर्चण्यापेक्षां जास्त भाड्याच्या पण निरोगी घरांत राहणें चांगलें. प्रत्येक कामीं कमी पैसा खर्चणें, ह्मणजे काटकसर नव्हे हा माझा सांगण्याचा हेतु आहे.

काटकसर जेवणांत, खाण्यांत, निजण्यांत, खेळण्यांत, भाषणांतसुद्धां फायदा करून देणारी आहे. याला फक्त एकच अपवाद आहे व तो आपलें कर्तव्य करणें हा आहे. कर्तव्यांत काटकसर हानि करणारी आहे. तिला चुकारतट्टूपणा किंवा वेठीचें काम अशी संज्ञा देतात. इकडे लक्ष्य द्यावें.

वेळाची काटकसर फार महत्त्वाची आहे. तेंच काम कमी वेळांत उत्तम कसें होईल ह्याबद्दल युक्ति चालवावी. उरलेला वेळ उत्तम प्रकारें कसा

घालवितां येईल हा विचार ठेवावा. वेळ ही जाणारच. तिला थांबविणें शक्य नाहीं. पण जातां जातां तिचा चांगला उपयोग करून फायदा करून घ्यावा. वाहत्या गंगेंत नुस्तें हात धुण्यापेक्षां तिच्या वेगाचा फायदा घेऊन व पैसा खर्चून (विचार केला असतां, वांचवून) पाणचक्की बांधणें जास्त श्रेयस्कर आहे. काटकसर ती हीच.

मुलांना चांगलें शिक्षण मिळण्याकरितां पैसा खर्चणें हाही काटकसरीचाच प्रकार आहे. मोठेपणीं ते पगारदार होऊन विपुल पैसा संग्रहीं ठेवूं शकतात, व आपल्या मुलांना विशेष उच्च दर्जाचें शिक्षण देऊं शकतात. अशी ही वाढती काटकसर आहे.

काटकसरीला व्यापारी दृष्टि पाहिजे. ईश्वरकृपेनें खरी काटकसर तुमचे नजरेपुढें वारंवार येवो, अशी प्रार्थना करून मी आपली रजा घेतें." (टाळ्या)

रा. रा. शंकरराव यांना शिरसाष्टांग नमस्कार. कळावें, हे आशीर्वाद.

आपला

**शंकर.**

---

## पत्र ८ वें.

# श्री. सौ. सारजाबाई यांचें व्याख्यान.

## हिंदुस्थानचा शेतकरी.

---

अलेक्झांड्रिया. श्री. ता. १२ सप्टेंबर १९१५

चि. श्री. सौ. कृष्णाबाई यांसः—

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. चि. रामभाऊ दोन दिवस आपले येथें राहून कोल्हापुरास गेला. मला तसें करण्याचा योग येईल काय? मी त्याचा या बाबतींत हेवा करतों. असो. प्रारब्धमनुसरामः। सभावृत्तांत पुढीलप्रमाणेंः—

नंतर श्री. सौ. सारजाबाई या भाषणास आल्या. त्यांचा पेहराव पाटलीणबाईप्रमाणें होता. कडेवर एकवर्षाचें मूल होतें. त्याला एक बाळ-संतोषासारखी चित्रविचित्र रंगाची व कोनदार टोपी घातली होती. हातांत बेंडबाजा दिला होता. मधून मधून तो वाजत असे. व मूल रडूं लागल्यास

त्या आपण वाजवून त्याचे हातीं देत. अंगरखा बंदांचा असून पायांत मोजे नव्हते. (कां होते, कुणाला ठाऊक ! पण पुढें दिसणाऱ्या डाव्या पायांत नव्हता.) बाईचें लुगडें लालभडक रंगाचें असून, पदर लांबलचक, डोकीवरून घेतलेला व थोडासा डोळ्यावर आलेला होता. पाय मोकळेच पण लुगडें पायघोळ होतें. नाकांत चक्राकार मोठी नथ होती, व डोळ्यांत थोडें काजळ लावलें होतें, पण बाळंतिणीइतकें नव्हतें. त्या ह्मणाल्या:—

" आयाबायांनों ! मला सभेंत बोलण्याची संवय नाहीं व मी शिकलेली सवरलेलीबी नाहीं; पण तुह्मीं सगळ्याजणींनीं बोलावल्यावरून मीही चार शब्द सांगतें. लवंगीबाईनीं काय सांगितलें, कसलें कोष्टक मांडलें, तें मला समजलें नाहीं. पण काटकसरीनें वागावें ह्मणजे मनुष्य श्रीमंत होतो, असें त्या ह्मणाल्या. आतां तुह्मीच पहा. शेतकरी उधळेपणानें वागतो काय ? मग तो दरिद्री कां ? (बाजा वाजतो.)

बिचारा सर्व वर्षभर-सर्व जन्मभर-कामाखालीं मरतो. चटणी व भाकरी यांशिवाय पक्वान्न काय काय खात नाहीं. जमिनीवरच पडतो. मच्छरदाणी, पलंग त्याला ठावची नाहीं. अंगांत बंडी, डोक्याला धोतर व खाकेंत कांबळी या शिवाय पोषाख आणिक साधा तो काय करायचा ? कधीं नाटकाला जात नाहीं. तंबाखूवांचून दुसरें व्यसन नाहीं. मेजवान्यांला कोणीं बोलाविलें तर हा जाणार. थाटमाट याच्या लग्नांतसुद्धां नाहीं. झोंपडींत राहणें. तिची डागडुजी हाच करतो. काम करून करून, शेतांत उत्पन्न पुष्कळ करील, पण आपण शेवटीं कोरडाच. पळी जशी सगळ्यांचे द्रोण भरून आपण रिकामीच रहाते तशांतली गत. मग, असा हा काटकसरीचा कांदा अगदीं ठणठणीत कसा ? मुलांचे शिक्षणाला पैसे जातात, किंवा मुलें इलायतीला गेलेंत त्यांना पैसे जातात ह्मणावें तर तेंही नाहीं. हें काय असलें ? (बाजाचा आवाज होतो.)

तुह्मी ह्मणाल मुळीं पहिलेच पैसे जर नसतील, तर त्यानें आणावेत कोठून, काटकसरीनें खर्चावें कसें व श्रीमंत व्हावें कशानें ? बरोबर आहे. त्याच्याजवळ पैसे नाहींत, असाच तुह्मी त्याला नेहमीं पहातां. पण सुगींत त्याचेजवळ पैसा असतो तो जातो कुठें ? मातुश्री जमीन व तीर्थरूप मेघराज

यांनीं कृपेनें त्याला दिलेलें फळ कोण भोगतो ? त्याचे श्रमाचा फायदा कुणाकडे जातो ? जसा शेतकरी बैलाकडून काबाडकष्ट करून घेऊन, त्याला गवताव्यतिरिक्त दुसरें कांहीं न देतां, फक्त खायाला घालूनच काम घेतो, तसेंच शेतकऱ्याच्या कष्टाचा उपभोग दुसरा कोणी घेतो, तो सावकार होय. बैलाच्या संगतीनें शेतकरी बैलच बनतो. कष्ट करावे, खावें व दुसऱ्याचें घर भरावें यांकरितां त्याचा जन्म. बिचारा काटकसरीनें न राहील तर जगेल काय ? (बाजा.)

पण हा सावकार पैसे खाणार कोण ? याचा काय हक्क शेतकऱ्याच्या मिळकतीवर ? प्रसंगीं पैसे देतो, कबूल आहे, पण याचे हिशेब बरोबर आहेत कीं नाहीं, सवाई, दिढी वगैरे व्याजाचे भाव रास्त आहेत काय, सुगींतील भावानेंच धान्य वगैरे त्यानें घ्यावें कीं काय इत्यादि विचार कोणीच कां करीत नाहींत ? सावकार ह्मणतो, " हं, किती रुपये नेले होतेस तूं ? तीस. बरोबर. तीस सव्वे पंचेचाळीस तूं द्यावयाचे. तूं नेहमींचा व इमानी रिणको आहेस ह्मणून पांच रुपये सूट देतों. चाळीस रुपये टाक व खत फाडून टाकतों. मग झालें कीं नाहीं ? " बापडा शेतकरी ५ रु. सूट मिळाली ह्मणून सावकारास दुवा देत घरीं जातो. ( बाजा वाजविला जातो. )

कांहीं माल विकत घेण्यास गेल्यास त्यांतही हा फसतो. माल विकावयास याला दलाल लागतो. पाटील, कुलकर्णी, सरकारी अधिकारी, सावकार यांचे घरीं कांहीं माल भेटीदाखल पाठवावा लागतोच. माल टिकवावा कसा ही अक्कल नसल्यामुळें बराच नासूनही जातो. कष्टाचे मानानें उत्पन्न पदरांत पडत नाहीं. माजघरांतील गुळाचे ढेपेंतील गूळ जसा मुंग्या, माशा, मुलें, माणसें वगैरे संपवितात तसें शेतकऱ्याचें होतें. ( बाजा वाजतो. )

शेतकऱ्याला, तिथि पहावयाची तर पैसा पडतो. पत्र लिहावयास पैसा व उत्तर वाचावयास दुसरा. मुलाचें नांव ठेवावयास पैसा. मुहूर्ताशिवाय कोणतेंही काम करावयाचें नाहीं. मुहूर्तास पैसा पाहिजे. कोणीही शिंकलें तरी याला पैसा दंड. ईशान्येकडील कळकीचे बेटांतल्या आग्यावेताळाला संतुष्ट करावयास आठ–बारा आण्यांचा कोंबडा पाहिजेच. नाकाडोळ्याचे वैद्य तुंबडी लावून सव्वा रुपया काढतातच. जोशीबुवांचा कर निराळाच भरावा लागतो. पोलीस, पाटील, कुलकर्णी, भागकारकून, पट्टेवाले वगैरेंच्या गरजा पुरविण्याचा जसा

काय त्यानें मक्ताच घेतला आहे. शिवकळा सांगील त्या दिवशीं यानें काम करतां उपयोगाचें नाहीं. व मागेल तितके नारळ, तांदूळ वगैरे देवास अर्पण केलें पाहिजे, व अंगारा लावला पाहिजे. व पुष्कळ दिवस न धुतलेल्या, गंध, अक्षता, फुलें वगैरे कुजत असलेल्या मोरींतील तीर्थ प्यालें पाहिजे. फाळा भरतांना रुपयास आणा प्रमाणें लोकल फंड सरकारास व लोखंड फंड पाटील-कुलकर्ण्यांस दिला पाहिजे. खटल्यासंबंधीं वकील लोक बुडवितात ते निराळेच. आणि इतकेंही होऊन तो जिवंत राहतोच! (बाजा.)

याच्या मुलांना गुरें राखणें, औत हांकणें, झाडावर चढणें, थोडेंसें पोहणें, केर काढणें, जमीन करणें, घर शाकारणें, भांगलणें, पेरणें, खोंपट बांधणें व तंबाकू ओढणें इतकीं कामें आलीं, ह्मणजे ते हुशार झाले. यालाही इतकेंच येतें. लिहिणें पुसणें वगैरे बामणांच्या मुलांनीं करावें. यानें शिकून सवरून काय कारकून व्हावयाचें आहे? गाद्यागिर्द्यांपेक्षां शेतकऱ्याला जमीनच बरी. जसा प्रयत्न व इच्छा तसें फळ. (बाजा.)

शिक्षणानें शेतकऱ्याची स्थिति सुधारेल काय? होय. अवश्य सुधारेल. आणि तसें झालेंच पाहिजे. नाहींतर हिंदुस्थान देश बुडाल्याशिवाय रहाणार नाहीं. उच्चप्रतीचे शिक्षणास लागणारे मुबलक पैसे शेतकऱ्याजवळ नाहींत, पण प्राथमिक शिक्षण जर सरकारनें फुकट देण्याचें ठरविलें तर पुष्कळ कार्य होईल. श्रीमन्त लोकांनीं जर प्रत्येकानें एक एक शेतकऱ्याचे मुलास शिक्षण देऊन चागल्या स्थितीस आणले, तर तो ते उपकार विसणार नाहीं, इतकेंच नव्हे, तर त्याची शक्त्यनुसार फेडही करील. (बाजा.)

सुधारलेल्या देशांतील शेतकरी कसे वागतात, जमिनीची मशागत कशी करतात, खत कोणतें वापरतात, पिकें कोणतीं व कशीं काढतात, त्यांना पैसा कोण व काय व्याजानें पुरवितो, इत्यादि माहिती फार उपयोगाची आहे. या माहितीनें परिपूर्ण भरलेलीं व उपयुक्त सूचनांनीं मढविलेलीं हस्तपत्रकें शेतकरी वर्गांत फुकट वाटावींत, ह्मणजे त्या प्रमाणें ते वागण्याचा प्रयत्न करून आपली स्थिति सुधारतील यांत संशय नाहीं. पण प्रथम शेतकऱ्यास वाचावयास आलें पाहिजे. मग गडी कसा तयार होतो तें पहा! (इतक्यांत कडेवरील मूल विशेषच रडूं लागलें व कितीहि बेंडबाजा वाजविला तरी उगें राहीना, सबब,

मुलास खालीं ठेवून बाईनीं भाषण सुरूं केलें. ) मला वाटतें वेळ संपत आलाच आहे. कृषिकर्मविद्या, शेतकरीमित्र, सहकारीपतपेढ्या, नांगरधारीसमाज, शेतकीचीं विद्यालयें, शाळा व क्षेत्रपालमदतगारसभा स्थापन झाल्यावांचून या गरीब परंतु अत्यंत उपयोगी लोकांची स्थिति सुधारणार नाहीं, असें माझें ठाम मत आहे. शेवटीं परमेश्वर तुह्मांला शेतकऱ्याला मदत करण्याची बुद्धि देवो, अशी प्रार्थना करून मी आपलें भाषण संपवितें." ( टाळ्या. )

नंतर अध्यक्षांनीं सांगितलें, कीं, " बहुतेक अर्ध्या वक्त्यांचीं भाषणें झालेलींच आहेत. तेव्हां पांच मिनिटें विश्रांति घेऊन व तितक्या वेळांत थोडा चहा पिऊन तरतरीत होण्यास हरकत नाहीं. चहा घेत नसतील त्यांच्याकरितां नुसतें दूध आहे व दूध मानत नसेल त्यांनीं पानसुपारी खावी. तीनींही चालतील तर घ्यावीं. वक्त्यांना खडीसाखर व लवंग देण्यांत येतील, त्यांचा स्वीकार होईलच. लहान मुलांना दुधाबरोबर बिस्किटें व विद्यार्थ्यांना खजूर मिळेल मात्र त्यांनीं खजुरांतील बिया शत्रु, मित्र व उदासीन यांना मारूं नयेत. जर मारण्याचा हेतु असेल तर त्यांना बदाम देण्यांत येतील. तात्पर्य, बदाम लागला तरी फोडून बी खाल्ल्यावर बरें वाटेल, व सालपटें उसनें फेडण्यास उपयोगीं पडतील. प्रत्येकानें आपल्या उजव्या हाताकडील दार उघडावें, ह्मणजे आंत उपरिनिर्दिष्ट सामुग्री आढळेल. यथामति उपयोग करावा. प्रत्येक खोलींतील वडील व्यक्ति खोलींतील बंदोबस्ताबद्दल जबाबदार आहे." असें ह्मणून त्यांनीं स्वागत कमिटीचे अध्यक्षांचे हातांत हात घालून गमतीनें गजगतीनें गमन केलें.

रा. रा. शंकरराव यांना नमस्कार आहेच.

आपला बंधु,

शंकर.



पत्र ९ वें

## श्री. सौ. चंडिकाबाई यांचें व्याख्यान.

### समर्थ व्हा!



अलेक्झांड्रिया. श्री. ता. २०-९-१५

चिरंजीव सौभाग्यवती कृष्णाबाई यांसः—

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. आपणांकडून बरेच दिवसांत पत्र नाहीं, लवकरच येईलसें वाटतें. आह्मी येथें सुखरूप आहोंत. सभावर्तमान असें:—

उपाहार झाल्यानंतर पुन्हां मंडळी स्थानापन्न झाली. विश्रांति व चहा, फराळ वगैरेनें सर्वत्र संजीवन झालेलें दिसलें. किंचित्काल स्तब्ध राहून नंतर श्री. सौ. चंडिकाबाई या भाषणास उठल्या. यांचा पेहराव मराठी पद्धतीचाच पण गौरीच्या दिवसांत बायका फुगड्या खेळण्याकारितां जसा पदर खेंचून सरसावून बांधतात व काचा मारतात तसा होता. नेभळेपणा किंवा बोजडपणा काढून टाकिला होता. शरीराची ठेवण उंच, भारदस्त व भव्य एखाद्या पंजाबी पहिलवानासारखी होती. चेहरा तेजस्वी, पाणीदार, ठसठशीत व निश्चयी होता. डोळे मोठे व स्थिर होते. दृष्टि तीक्ष्ण व भेदक होती, पण त्यांत क्रूरपणा नसावासें वाटलें. सौंदर्य होतें, पण नाजुकपणा नव्हता. चहामुळें त्यांची तरतरी जागृत झाल्याप्रमाणें दिसत होती. घनगंभीर शब्दानें त्या ह्मणाल्याः—

"अध्यक्ष व अबलाजनहो! त्या जवळच्या खोलींत, दोन मुलांची एका बिस्किटाच्या पुड्यासंबंधानें चुरस लागून झोंबाझोंबी झाली. त्यांत त्या सशक्त मुलानें आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या अशक्तपणाचा फायदा घेऊन त्याचा पराभव केला, व तो पुडा घेऊन मोठ्या आनंदानें त्याचा उपभोग घेता झाला. त्याचा आनंद पाहून मलाही बरें वाटलें व कांहीं विचार माझे मनांत आले, ते मी तुह्मांस सांगतें.

प्रथम येथील परिस्थिति कशी आहे तें पहा. हें मंदिर सार्वजनिक असून, त्यांत निरनिराळ्या खोल्या आहेत. सार्वजनिक खर्चानें फराळाची व्यवस्था केली होती. ज्या खोलींत हा प्रकार घडला तेथें दुसरींही मुलें होतीं. आपणांस

इतरांपेक्षां जास्त व चांगल्या वस्तू मिळाव्यात असें प्रत्येकास वाटतें. आपण श्रेष्ठ असावें, ही इच्छा प्राणिमात्रांचे ठिकाणीं नैसर्गिक आहे. इतर मुलें मिळालेल्या वाट्यांत संतुष्ट होत्सातीं आनंद करीत होतीं. पण या दोन मुलांमध्येंच त्या पुड्याविषयीं लालसा व महत्वाकांक्षा उत्पन्न झाली. प्रतिस्पर्धी असला म्हणजे इच्छेला जागृति त्वरित येते व जोराची क्रिया घडते. त्यांचें युद्ध—अल्पप्रमाणावर कां होईना—झालें. सशक्ताची सरशी झाली. जेत्याचा आनंद जोमदार व उच्च दर्जाचा असतो. तसा त्या मुलाचा होता व त्यानें स्वकष्टार्जित फलाचा उपभोग घेतला.

आतां, जग हें ईश्वरनिर्मित-निसर्गनिर्मित म्हणा–आहे. निरनिराळे देश सोईकरितां व सौंदर्याकरिता केले आहेत. तेथें स्वयंभू संपत्ति विपुल आहे. प्रत्येक मनुष्याचा त्यावर सारखाच हक्क आहे, पण तुमचा हक्क तुम्ही शाबीत करा व घ्या. अंगीं पात्रता नसेल तर कसें मिळावें व सहज मिळाल्यास कसें टिकावें ? प्रयत्नावांचून तुमच्या इच्छा तृप्त होणार नाहींत, व कोणी तुम्हाला आणून देणारही नाहीं. मागा म्हणजे तुम्हांला मिळेल. शोधा म्हणजे तुम्हांला सांपडेल. शिका म्हणजे तुम्हांला समजेल. प्रत्यक्ष प्रयत्न झाला पाहिजे. प्रयत्नावाचून फळ नाहीं.

जो जसा जोराचा प्रयत्न करील, तितका त्याचा फलावर जास्त हक्क पोहोंचतो. स्कॉलर्शिप् वरच्या नंबरानांच मिळते. विद्वान् लोकांनाच यश व कीर्ति प्राप्त होते. कर्त्यालाच लक्ष्मी माळ घालिते. सामर्थ्यवान् पुरुष अशक्तावर सत्ता चालवितो. सृष्टिनियमांतील गुरुत्वाकर्षण या नियमान्वयें मोठे पदार्थ लहानांस आपल्याकडे ओढतात. यावरून शक्ति हाच खरा हक्क आहे. जेथें शक्ति तेथें भुक्ति.

मराठींत ' बळी तो कान पिळी, ' अशी एक म्हण आहे. जो बळी आहे त्याचेशीं अशक्त जर तुटकपणें वागतील तर त्यांचे तो कान पिळणारच. कान पिळून जणूं काय, तो सामर्थ्यवान् होण्यास शीक, नाहींतर दुःख भोग, म्हणूनच सांगत आहे ! तुम्हांला त्रास देण्याच्या हेतूनें जरी त्यानें तुमचे कान पिळले, तरी जोपर्यंत तुम्ही त्याचा प्रतिकार करूं शकत नाहीं, तोपर्यंत त्याचें करणें रास्तच आहे. तुमच्या अशक्ततेबद्दल जें योग्य तेंच तुम्हांला मिळतें.

तुह्मीं अशक्त कां रहावें ? अंगीं मिळविण्याची व मिळालेलें संरक्षण्याची शक्ति नसेल तर न मिळणेंच चांगलें. तुमचें लाड कोणी व कां करावेत ? तुमच्या प्रयत्नांनीं तुह्मी मिळवा व मिळविलेलें रक्षण करा.

यावरून चोर, लुटारू, दंगेखोर लोकांचें मी समर्थन करतें असें समजूं नका. त्यांचीं कृत्यें भेसूर व वाईट आहेत ही गोष्ट खरी, पण तुह्मी स्वतः त्यांचा प्रतिकार करण्यास समर्थ असलें पाहिजे. पृथ्वीच्या पाठीवर पुष्कळ प्रकारचे लोक व प्राणि आहेत. इतिहासावरून तुह्मांस समजेल कीं, जे संरक्षण करूं शकले तेच टिकले. तुमचें शरीर जर तुह्मी निरोगी ठेवाल, तरच तें पुष्कळ वर्षे टिकेल. रोग जर जिकडे तिकडे आहेतच, तर तुह्मी स्वतः रोगांशीं भांडण्यास बळकट व्हावयास नको काय ? रोग वाईट आहेत, गोष्ट खरी, पण आहेत ना ? मग जर तुह्मी त्यांना बळी पडला तर तो तुमचाच दोष आहे.

जें तुह्मी रक्षण करूं शकतां तेंच तुमचें; तेवढेंच तुह्मांला योग्य होय. पसारा कामाचा नाहीं. पानिपतच्या शेवटच्या लढाईत मराठ्यांबरोबर सैन्याच्या दुप्पट बाजारबुणगे होते. ते खाण्याला व लुटालूट करण्याला तयार, पण लढाईचे वेळीं मागें रहात. यांनींच मराठ्यांचा नाश केला. ज्या देशांत असलेच टाकाऊ लोक निपजतात तो देश नाश पावतो. मनुष्यसुद्धां जोपर्यंत स्वकष्टानें मिळवितो, तो पर्यंतच टिकतो. चैन व ख्यालीखुशाली ही आयुष्याची कीड आहे. या कीडीनेंच मनुष्य नासतो. चैनीनें शरीर असमर्थ होतें. आळस वाढतो. ह्मणजे उतरती कळा लागली.

जगाचें रहाटगाडगें सामर्थ्याच्या तत्त्वावर चाललें आहे. अशक्त प्राणी सशक्तांच्या भक्ष्यस्थानीं पडतात. मोठे मासे लहान माशांस गिळून टाकतात. नासलेलें बीं उगवत नाहीं. रोगी वृक्षापासून रोगी बीज निपजतें व शेवटीं त्याची वंशपरंपरा नष्ट होते. रोगी मनुष्यें चांगली संतति उत्पन्न करूं शकत नाहींत. आपण बलवान् असावें अशी निसर्गाची इच्छा दिसते, व बलवंतांविषयीं निसर्ग पक्षपात करतोसें वाटतें. पण तेंच योग्य आहे. तसें जर न होईल तर सारेंच नष्ट होईल. याकरितां सामर्थ्य वाढवा.

लुचे, आडदांड, बंडखोर लोक कुणांला छळतात ? सशक्तांना कीं अशक्तांना ? सशक्तांच्या वाटेस जाण्याची त्यांची छाती आहे ? ते लोक तरी

शक्तीच्या जोरावरच असें करतात. मग तुह्मी शक्ति वाढवा, ह्मणजे झालें. अभ्यासानें शक्ति वाढतें. सर्व अभ्यासानेंच होतें.

बल पुष्कळ प्रकारचें आहे. पण शरीरबळ तत्काळ उपयोगीं पडणारें असून इतर बलांना आधारभूत आहे एकीचें बल श्रेष्ठ आहे. राज्यकारभार एकीचें तत्त्वावर चालतो. एकीनें हक्कांचें संरक्षण व अनाथांचें पालन होतें. अशक्त सशक्त होईपर्यंत सशक्तांनीं त्यांना आश्रय द्यावा व आपल्यासारखे करून एकजूट करावी. एकजुटीनें सामर्थ्य वाढतें व प्रयत्न जोराचे करतां आल्यानें कार्य होऊन, टिकाऊ बनतें. पण याला त्या जुटींतील प्रत्येक घटकावयव तसाच जोरदार पाहिजे. A chain is no stronger than its weakest link. याचा अर्थ सांखळी ही तिच्या कमकुवत दुव्यापेक्षां जोरदार नसते. तिजवर ताण पडल्यास ती त्या कमकुवत दुव्यांतच तुटते. ह्मणून प्रत्येक दुवा चांगला बळकट पाहिजे.

समाज हा व्यक्तींनीं होतो. प्रत्येक व्यक्ति जोरदार, नीतिमान् व कार्यतत्पर असल्यास समाजही तसाच बनतो. तथापि समाजांत सुद्धां प्रबल व्यक्तींच्या अनुरोधानेंच चालावें. मनुष्यास उन्नति पाहिजे असल्यास—नव्हे ती अवश्यच आहे—त्यानें स्वत: कार्यक्षम व बलवान् झालें पाहिजे. नाहींतर हत्तीच्या बलाचा मनुष्य जसा स्वार्थाकडे उपयोग करून घेतो तसें होईल.

शक्तीच्या वारंवार उपयोगानेंच शक्ति वाढते. मुलें भांडतात तेंच बरोबर आहे. त्यामुळें त्यांची स्वावलंबनवृत्ति व धैर्य वाढतें. पण त्या भांडणाचा परिणाम द्वेष होऊं देऊं नये. न भांडणाऱ्या व आजोबाप्रमाणें गोष्टी सांगणाऱ्या मुलास मी कधीं जवळ घेणार नाहीं. असला मुलगा जगांत पुढें येणार नाहीं. गर्दी संपल्यावर मग जाऊं ह्मणून थांबणारे यशस्वी होणार नाहींत. नदींचें पाणी आटल्यावर मग पलीकडे चालत गेलेलें बरें, असें समजणारा मूर्ख आहे. प्रवाह सुरू असणारच. त्याला बाजूला सारून तुमचा मार्ग काढा.

इतरांपेक्षां निराळ्याच दिशेनें किंवा विरुद्ध दिशेनें सुद्धां तुह्मीं आपला हेतु साध्य केल्यास, तुह्मांला होणारा आनंद अवर्णनीय आहे. त्यानें तुमची शोधक बुद्धि वाढेल, व अंगीं धैर्य, समयसूचकता, प्रसंगावधान, दुरदर्शित्व इत्यादि गुण येतील. पुराणांत स्वयंवराचीं किंवा सर्व राजांसमक्ष मुलीला—वधूला—पळवून

नेण्याचीं जीं वर्णनें आहेत तीं हेंच दर्शवितात. प्रत्येक वस्तु योग्य मनुष्यासच मिळाली पाहिजे. व त्याला ती न मिळाल्यास त्यानें प्रयत्न करून ती मिळवावीच. मग प्रसंगीं सामर्थ्याचाही उपयोग करावा, पण ध्येय साधावें. तसें केल्याशिवाय, नुसत्या कल्पनेनें त्याची मजा येणार नाहीं.

श्रोते हो! सामर्थ्याची फुरफुरी ज्ञानापुढें लंगडी पडते. तथापि नुसतें ज्ञान पंगु आहे. म्हणूनच दोन्हींची जोड जमवून श्रेष्ठपणा मिळविण्यास प्रयत्न करा इतकेंच माझें तुम्हास सांगणें आहे." (टाळ्या.)

इतकें बोलून त्या खालीं बसल्या. त्यांच्या भाषणानें शरीरसामर्थ्य वाढविण्याविषयीं सर्वांचें अनुकूल मत दिसलें व कित्येक व्यक्तींना स्फुरणही चढलें. पण श्री. सौ. चण्डिकाबाईंची भव्य मूर्ति समोरच असल्यामुळें, व त्यांच्याकडून कांहीं प्रतिक्रिया झाल्यास स्वसंरक्षण करण्याइतकी ताकद नसल्यामुळें, सामर्थ्याविष्करण कोणीं केलें नाहीं. ज्याप्रमाणें एक व्यक्ति हंसतांना पाहून दुसऱ्यासही हंसें येतें, त्याप्रमाणें आपण दांडगाई केल्यास, यांनाही कदाचित् दांडगाईची स्फूर्ति येईल, व मग त्याचे परिणाम आपणांस सोसणार नाहींत, असें कित्येक हूड व्यक्तींस वाटून त्यांनीं शांततेचा भंग केला नाहीं. पुढील वर्तमान पुढच्या पत्रीं.

रा. रा. शंकरराव यांना शि. सा. न. प्रविष्ट करावेत. आपलें काम कसें काय चाललें आहे तेंही कळवावें. कळावें, हे आशीर्वाद.

आपला बंधु,
**शंकर.**

---

पत्र १० वें

## श्री. सौ. यशोदाबाई यांचें व्याख्यान.

### शिशु-संवर्धन.



अलेक्झांड्रिया. श्री. ता. २५-९-१९१५

चि. श्री. सौ. कृष्णाबाई यांस:—

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. आपणांकडून दोन महिन्यांत पत्र नाहीं! विशेष कामामुळें सवड होत नसेल! तथापि सवड काढून चार ओळी लिहिल्यास मला बरें वाटेल. दूर असलेल्यांना पत्र भेटीच्या खालोखाल आनंद देतें.

फोटोचा नंबर त्याच्याही खालींच लागेल. फोटो बाह्य स्वरूप दाखवितो, तर पत्र अंतरंग प्रकट करतें. बाह्य स्वरूपापेक्षां अंतरंगावर आपलें विशेष व खरें प्रेम जडतें. अंतरंग कृतीनें किंवा पत्रद्वारा ह्मणजे शब्दरूपानें दर्शवितां येतें. करितां पत्र श्रेष्ठ दर्जाचें आहे. शिवाय, फोटोंत फेरबदल होत नाहीं. तो एका विवक्षित क्षणीं असलेली स्थिति व तीच नेहमीं दाखवितो. पण पत्राचें तसें नसतें; दरवेळीं नवीन सीन (Scene दृश्य) तें दाखवितें. ह्मणून मनाला पटतें. जर पत्र 'फील्डसर्व्हिस' पोस्ट कार्डाप्रमाणें (सोबत नमुना पाठविला आहे) असेल तर मग फोटोच बरा. कारण, तसलें पोस्टकार्ड मनुष्य किती तारखेपर्यंत जिवंत होता, हें बिनचूक दर्शवितें ही गोष्ट खरी, पण याहून जास्त काय? कांहीं नाहीं. जास्त माहिती देत नाहीं व मनापुढें व्यक्तीचें चित्र चांगलें, तत्कालस्थिति-दर्शक उभें राहूं शकत नाहीं. असलें पत्र काय कामाचें? ह्मणून फोटो बरा असें मीं ह्मटलें. पण, चांगलेंवाईटपणा आवडीवर अवलंबून आहे. ह्मणून मला जें आवडेल तें सर्वांना आवडेलच असें नाहीं; कारण आवडसुद्धां भिन्न स्वरूपाची असते. सबब माझा निकाल एकतर्फी होतो. पण मला असें काथ्याकूट करीत बसून चालावयाचें नाहीं. सभेचें वर्णन बरेंच शिल्लक आहे. तें प्रथम संपविलें पाहिजे. त्यालाच आतां सुरवात करतों:—

नंतर श्री. सौ. यशोदाबाई या बोलावयास उठल्या. या मध्यम वयाच्या, तितक्याच उंचीच्या, पोक्त, फार स्थूल किंवा कृश नाहींत अशा, मध्यम गौर-वर्णाच्या होत्या. पोषाख साधाच पण स्वच्छ होता. चेहऱ्यावरून त्या शांत, गंभीर वृत्तीच्या दिसत. दृष्टि स्थिर व प्रेमळ होती. यांना पाहण्याबरोबर कोणाच्याही मनांत यांच्याविषयीं पूज्यबुद्धि व आदर उत्पन्न व्हावा अशी यांची चर्या व ठेवण होती. मला तर त्यांना पाहतांच माझ्या प्रिय आक्काची[1] आठवण झाली. ज्यांचा जन्म यांचे पोटीं झाला असेल ते धन्य होत असें मला वाटलें. अहाहा! ती शांत व तेजस्वी मुद्रा अझून माझे डोळ्यांपुढें आहे. माझ्या मातेचें दर्शन घडल्यासारखें मला वाटलें. प्रत्यक्ष दर्शन होणारा भाग्यदिवस कधीं उगवेल[2] !!!

---

१ तीर्थरूप सौ. मातुःश्रीची.

२ सन १९१६ मार्च मध्यें अलेक्झांड्रियाहून हिंदुस्थानांत परत आल्यावर हा मातृदर्शनाचा भाग्यदिवस त्यांना लाभला. —रा. चिं. श्री.

त्या ह्मणाल्या:—"वंशाची कीर्ति वाढवून अजरामर करणारीं जीं पुत्ररत्नें त्यांच्या मूर्तिमंत खाणीच कीं काय अशा भासणाऱ्या साध्वी हो! आपल्यासमोर भाषण करण्याचा भाग्याचा दिवस मला प्राप्त झाल्यानें, आज मला विशेष आनंद झाला आहे. माझ्यापूर्वीं झालेलीं भाषणें फारच सुंदर आहेत. मला त्यांचें अनुकरण साधणार नाहीं. निरनिराळ्या गहन विषयांवर पूर्ण विचार करून जमविलेलीं व अनुभवाच्या कसोटीस उतरलेलीं हीं शब्दमुक्ताफळें बिनमोल आहेत. त्यांचा योग्य उपयोग तुह्मी करालच. मोत्यांचा उपयोग कसा करावयाचा हें बायकांना सांगावयास नकोच.

आपण आपलें अंतर्बाह्य स्वरूप याप्रमाणें नटवीत असतां, परमेश्वरानें आपल्यावर जें जबाबदारीचें व महत्त्वाचें काम सोंपविलें आहे, त्याबद्दल आपण काय करतों याचा विचार करूंया. नुसतें पुत्रांना किंवा मुलींना जन्म दिला, त्यांचें पालनपोषण केलें, व लग्नें करून देऊन हाच धडा गिरविण्यास लाविलें, ह्मणजे इतिकर्तव्यता झाली काय? शरीराच्या पोषणाची आपण जशी काळजी घेतों तसेंच त्यांचें मनही सुदृढ होऊन त्याची चांगल्या दिशेनें वाढ होण्यासाठीं आपण काय केलें पाहिजें, हें मी आज आपणास सांगणार आहें. मनाच्या वाढीस शरीराची वाढ आधारभूत आहे हें तुह्मी जाणतांच. सबब तत्संबंधींही थोडा निर्देश मी करीन.

अगदीं बाल्यावस्थेंत मुलांना दूध पाजणें, स्नान घालणें, निजविणें, व थोडा वेळ मोकळ्या हवेंत फिरविणें, व खेळविणें हीं कामें अगदीं घड्याळाप्रमाणें, नियमित वेळेस व प्रमाणांत करावींत. मुलांचे कपडे स्वच्छ ठेवावेत. त्यांचे निजण्याचे ठिकाणीं ढेंकूण, डांस, पिसवा न होतील अशी तजवीज ठेवावी. पाळण्यावर मच्छरदाणी लावावी. जागच्या जागीं हिसके देऊन पाळणा केव्हांही हालवूं नये. त्यामुळें मुलांना झोंपेऐवजीं मूर्च्छा येते, ह्मटलें तरी चालेल. मुलांचा मेंदु नाजूक व अशक्त असल्यामुळें असले धक्के त्यास सोसत नाहींत व अपाय करतात. लांब झोंके द्यावेत. मूल रडूं लागल्यास कां रडतें, याचा तपास करावा. धपाधप थोपटून व आरडून निजवूं नये. मुलें तीन कारणांनीं रडतात. भुकेनें, असलेल्या स्थितीस कंटाळल्यानें, (फार वेळ त्याच स्थितींत किंवा ठिकाणीं राहिल्यानें, किंवा ढेंकूण, पिसवा चावत असल्यानें, अथवा हंतरूणपांघरूण ओलें झाल्यानें, किंवा कांहीं बोंचत अस-

त्यानें, अथवा कपडे तंग झाल्यानें किंवा हातपाय गुरफटल्यामुळें वगैरे) आणि आजारीपणानें रडतात. या सर्व कारणांचा विचार करून, असतील तीं दूर करावींत. मूल रडतें काम करूं देत नाहीं, द्या अफू, म्हणजे निश्चित पडून राहील ! भगिनींनो ! हा अर्भकांवर जुलुम नाहीं काय ? अफूपासून होणारे दुष्परिणाम जर तुम्ही ध्यानांत घ्याल तर असें कधींही करणार नाहीं. स्तनंधयांनीं आपल्या तक्रारी रडण्याव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्या तऱ्हेनें तुम्हांस कळवाव्या ? आपल्या गरजांबद्दल इतक्या नम्र व केंविलवाण्या रीतीनें त्यांनीं अर्ज केला असतां त्यांना हें बक्षीस काय ? अफू खाऊन दुःख शमविण्याचा प्रसंग माझ्या शत्रूवर सुद्धां येऊं नये ! मुलांना अफू चारणें म्हणजे त्यांची नैसर्गिक बुद्धिमत्ता नष्ट करणें होय.

आईचें दूधच मुलांना चांगलें मानवतें. तें भरपूर नसेल तर गाईचें दूध वापरावें. दांत येण्यापूर्वी मुलांना अन्न खाऊं घालूं नये. पण बालसंगोपनाचे विषयावर स्वतंत्र पुस्तकें आहेत, तींच वाचण्याविषयीं मी तुम्हांस शिफारस करतें.

मुलें स्वाभाविक जे गुण दाखवितील त्यांना उत्तेजन द्यावें. मुलें स्वतः उभें राहण्याची खटपट करीपर्यंत त्यांना आपण उभें करूं नये व चालवूं नये. अशानें मुलांची कोमल हाडें वांकडीं होतात. आपण नवीन नवीन शिकावें ही इच्छा नैसर्गिक आहे. त्या इच्छेप्रमाणें चालावें, तिला पुष्टि द्यावी व योग्य वळण लावावें. आपणांला आवडतात म्हणून बोजड कपडे किंवा अलंकार मुलांना घालूं नयेत. त्यांना स्वतंत्र व सुटसुटीत ठेवावें.

त्यानंतर त्यांचे भाषेस सुरवात होते. भाषा ही विचार दुसऱ्याला कळविण्याची ध्वनिविषयक रीत आहे. ती जितक्या शुद्ध पद्धतीनें मुलांचे मनांत भरेल तसे विचार बनतात. अशुद्ध भाषा बोलणाऱ्यांचीं मुलें बुद्धिमान् निपजत नाहींत. आपण मुलांशीं बोलतांना किंवा त्यांना शिकवितांना शुद्ध व सोपी भाषा वापरावी. त्यांना न समजतील असे शब्द वापरूं नयेत. प्रत्येक शब्दाचा योग्य उच्चार, अर्थ व त्याची प्रतिमा, त्यांचे डोळ्यापुढें ठेवावी व त्यांची सांगड घालून द्यावी. मुलांना अभद्र शब्द शिकवूं नयेत. प्रथम जरी त्यांचें कौतुक वाटतें तरी पुढें ते त्यांच्या मनांतून काढतां येत नाहींत. मुलांचें

मन एकाद्या फोटोच्या काचेसारखें आहे. त्यावर जी प्रतिमा उठेल तीच कायम होते व ती वाईट उठल्यास काच फुकट जाते. करितां मुलांचे मनांत चांगले शब्द व विचार भरावेत.

मनुष्याचे आयुष्यांतील हा काल अत्यंत महत्त्वाचा आहे. या देशांत मुलांच्या या कालांतील शिक्षणाबद्दल घ्यावी तितकी काळजी कोणी घेत नाहीं. ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट आहे. कदाचित् आमचा देश यामुळेंच या हीन स्थितीस पोंचला असेल. हिंदुस्थानांत खरें बोलणारा, स्वार्थत्यागी, बाणेदार, स्वतंत्र विचाराचा, देशभक्त, बोलण्याप्रमाणें करणारा, उत्साही, धैर्यवान्, सशक्त, कर्तव्यनिष्ठ, शोधकबुद्धीचा, विद्वान्, विनयशील व गुरुदेवभक्त असा* पुरुष दुर्मिळ असावा ना! काय ही आमची दशा! वीरप्रसूहो! जर तुह्मी वरील विचार या लहान वयांतच मुलांचे मनांत भरवाल तर तुमचीं मुलें जगाला मार्गदर्शक होतील! जग तुह्मांला पाहून आश्चर्यचकितच होईल.

मुलें नेहेमीं खरेंच बोलतात, पण आपण त्यांना खोटें कसें बोलावें हें शिकवितों, वडिलांचा उपमर्द करावयास शिकवितों, (बापानें मुलास सांगावयाचें 'जा, आईच्या थोबाडींत दे' वगैरे हे सर्व थट्टेनेंच होतें.) सूड घेण्याची बुद्धि जागृत करतों, (खांब लागला तर 'हात रे खांबा!' ह्मणून त्यास फुकणीनें मारून) त्यांना भित्रे करतों, (बागुलबोवाची, सावलीची, साहेबाची, शिपायांची किंवा कुत्र्यामांजराची भीति दाखवून) त्यांना हट्टी करतों, (वारंवार धाक दाखवून, त्यांच्या इच्छा दाबून, किंवा त्यांनीं थोडा हट्ट केल्यावर त्यांची इच्छा तृप्त करून, किंवा आईनें कांहीं नाहीं देत ह्मटलें असतां थोड्या वेळानें बापानें ह्मणावें 'दे कीं, मूल रडतंय तर त्याला देऊं नये? इकडे ये बाळ. मी देतों हां!' किंवा याच्या उलट बापाच्या विरुद्ध आई. परिणाम एकच.) त्यांची जिज्ञासा दाबून त्यांना मंदबुद्धी करतों, (मुलें चौकस बुद्धीनें जेव्हां कांहीं विचारतात तेव्हां त्यांच्या प्रश्नाचें उत्तर न देतां, त्यांच्यावर रागावून 'मी काम करतें दिसत नाहीं? काय तरी विचारतंय, खुळसट. जा तिकडे खेळायला. नाहींतर नीज जा;' किंवा 'गप्प राहतोस कां नाहीं? कां देऊं एक?' इत्यादि शब्द-

* येथें निर्दिष्ट केलेले सद्गुण धीरोदात्त अशा श्रीरामचंद्राचे ठायीं एकत्र वसत होते असें वर्णन आढळतें. (पहा-वाल्मीकिरामायण अयोध्याकांड सर्ग १.)

—रा. चिं. श्री.

संभारांनीं. मुलांनीं आपणांस कांहीं विचारल्यास त्याचें शांतपणें उत्तर द्यावें, व त्यांना समजेल असें सांगावें. आपण जसें सांगतों तसेंच आपण स्वतः वागलें पाहिजे. नाहींतर मुलें ऐकणार नाहींत. ) त्यांचे मर्जीविरुद्ध किंवा त्यांचा कल न सांभाळतां कांहीं गोष्टी आपण धाकानें त्यांचेकडून करवितों, ( मुलानें भात खाल्ला नाहीं तर 'खा, नाहींतर डोकीला बांधीन' ह्मणून, त्यांचेकडून खावबून त्यांना अजीर्ण उत्पन्न करणें, गोड, अगोड, व भलत्याचवेळीं खावयास शिकविणें, त्यांचे इच्छेविरुद्ध जागविणें किंवा निजविणें, वारंवार त्यांचेवर रागावणें, शिव्या देणें, मारणें, वगैरे. ) आणि असें त्यांना बिघडवितों. असलीं मुलें थोरपणीं आई-बापांस पश्चात्तापास कारण झालीं, तर तो दोष कोणाचा? जसें पेरावें तसें भरावें.

खोल विचार केला तर तुह्मांस असें आढळून येईल कीं, आई व बाप यांचेवरच मुलांचें मोठेपण अवलंबून आहे. मुलांना लहानपणीं खेळायची सामुग्री भरपूर द्यावी. निरनिराळया पदार्थांचे नमुने त्यांचे पुढें ठेवावेत. त्यांच्यांशीं गोडीनें व हांसत हांसत बोलावें, पण धाकही असावा. नीटनेटकेपणा व स्वच्छपणा शिकवावा. त्यांची चूक लगेच त्यांना दाखवून योग्य मार्गही सुचवावा. प्रत्यक्ष उदाहरणें त्यांच्यापुढें ठेवावींत. त्यांना इसापनीतींतील, किंवा पुराणांतील गोष्टी सांगाव्यात. कोणतीही गोष्ट कशी व कां करावी, उलट केल्यास काय होतें, तें दाखवावें. प्रत्यक्ष मार देण्याचे प्रसंग टाळावेत. मुलांना वडिलांचा धाक वाटावा, पण भीति वाटूं नये. आज्ञा पाळण्यास शिकवावें. परस्परविरोधीं कार्यें सांगूं नयेत. पौष्टिक अन्न द्यावें व त्यांत दुधाचा अंश पुष्कळ असावा. मुलांशीं दूरवर विचार करून वागावें. मुलांचें शिक्षण हा विषय दिसतो तितका सोपा नाहीं. त्यांतील कूटें, हा विषय तुह्मी जसजसा अभ्यासाल तसतशीं सुटत जातील. याचा योग्य विचार करून आपण हा विषय आचरणांत आणावा अशी आपणास नम्रपणें विनंति करून व आपले आभार मानून मी आपली रजा घेतें." ( टाळ्या. )

रा. रा. शंकरराव यांना माझे शिरसाष्टांग नमस्कार प्रविष्ट करावेत. कळावें, हे आशीर्वाद.

आपला बंधु,

शंकर.

## पत्र ११ वें

# श्री. सौ. त्रिजटाबाई यांचें व्याख्यान.

## स्वच्छपणा.



अलेक्झांड्रिया. श्री. ता. ५-१०-१५

चि. सौ. कृष्णाबाई यांस.

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. सभेची पुढील हकीगत अशीः—

नंतर बराच वेळ सभेंत स्तब्धता होती. जणुं काय मुलांचे शिक्षणाविषयीं झालेल्या व्याख्यानाचें सर्वजण मनन करीत होते. असल्या तऱ्हेचें शिक्षण मुलांना सुद्धां आवडलेंसें दिसलें. कारण त्यांनीं गोंगाट करण्याचें सोडून एकाग्र मनानें श्रवण केलें होतें. व आतां सुद्धां शांतपणें विचार करण्याचें व्रत स्वीकारलें होतें. याप्रमाणें पांचसहा मिनिटें गेलीं, तरी कोणी उठेना. भाषणें संपलीं कीं काय ह्मणून हँडबिल् ( हस्तपत्रक ) पाहतात तों सौ. त्रिजटाबाईचे नांवापासून चारपांच भाषणें व्हावयाचीं राहिलीं होतीं. मग त्या किंवा दुसरे कोणी कां सुरवात करीत नाहींत ह्मणून सर्व जण पाहूं लागले. क्षणभर, थेटरांत जसें वेळ भरून गेली, तरी पडदा उघडत नाहींसें पाहून लोक अधीर होतात, व हातपाय आपटूं लागतात, तसें होतें कीं काय असें मला वाटलें. पण तसें कांहीं एक झालें नाहीं. यावरून स्त्रिया जास्त सहनशील असून, मनोविकारांचा वेग पुरुषांपेक्षां चांगल्या तऱ्हेनें आवरूं शकतात असें माझें मत झालें. कोणीच कांहीं करीत नाहींसें पाहून मी अध्यक्षांजवळ विनंती केली कीं सुरवात व्हावी. त्यानीं सौ. त्रिजटाबाईस खुणेनें उठण्यास सुचविलें, पण परिणाम झाला नाहीं. मग जरा मोठ्यानें सूचना केल्यावर त्या उठल्या. त्या फार हळुंहळुं चालत टेबलाजवळ आल्या. येतांना त्यांच्याच लुगड्यांत त्यांचा पाय अडखळल्याचा मला भास झाला. त्यांची उंची बरीच होती, तथापि पाठीला पोंग आणून चालण्याची त्यांना संवय असल्यामुळें त्या ठेंगू दिसत. चेहरा स्वच्छ होता पण तरतरीत नव्हता. पोषाख साधा होता पण सफाई नव्हती. पदर लांब असून पताके प्रमाणें केव्हां केव्हां उडत असे. हातांतील कंकणें सैल असल्यामुळें, त्यांच्या प्रत्येक हालचालीबरोबर त्यांचा आवाज होत असे. वाटेल तर त्याला मंजुळ ह्मणतां येईल. त्यांच्या

डाव्या हाताच्या मधल्या बोटांत एक सोन्याची आंगठी होती. त्यांचे आविर्भाव याच हातानें दाखविले जात. उजवा हात त्या वारंवार पोटावर फिरवीत, व मधून मधून पोटांत तिडीक उठली असतां, मनुष्य जसें तोंड करतो तसें करीत. ( एकदां मला त्यांना कांहीं होत असावें असा बळकट संशय आला, व शक्य तो मदत त्यांना करावी म्हणून मीं 'आपणांस काय होतें? पोट दुखतें काय?' म्हणून विचारलें. त्यावर त्या हंसल्या व म्हणाल्या, 'नाहीं, मला ही संवय आहे. तुम्ही जसें विचार सुचण्याकरितां डोकें खाजवितां, त्यापैकींच हा एक प्रकार आहे. पण समजा, माझ्या पोटांत दुखत असतें तर तुम्ही काय केलें असतें?' 'तुम्हांला गाडींत बसवून घरीं पोंचविलें असतें.' मी म्हणालों. कारण, जेथें जरूर नाहीं, तेथें मी डॉक्टर आहें, तुम्हांस चांगलें औषध देऊन लवकर बरें केलें असतें, फी घेतली नसती, असले हजारों रोगी मी बरे केले आहेत, रोज पुष्कळ रोगी माझे हाताखालून जातात, वगैरे अनवश्यक गोष्टी सांगणें मला आवडेना. व माझें अनुमान चुकलें हें मी समजलों. ) त्यांनीं पायांत मोजे घातले होते, पण त्यांना वर बन्धनें नसल्यामुळें त्यांच्या वळकट्या घोट्यांवर पडल्या होत्या. पायांत बुटांऐवजीं जोडे होते. ( पायताण नव्हतें हें मी नशीब समजतों! ) बोलतांना मधून मधून त्या, पडसें आलेला मनुष्य जसा 'सुं सुं' करतो तसें करीत. केव्हां केव्हां कोणास ऐकूं न जाईल इतकें हळूंही बोलत. असो.

त्या म्हणाल्या, "अध्यक्ष व भगिनीजनहो! माझें भाषण मी संस्कृत-मध्यें तयार करून लिहून ठेविलें होतें, पण इकडे येण्याच्या गडबडींत तें आणायलाच विसरलें, याबद्दल मला फार दिलगिरी वाटते. असो. मी स्वच्छपणा या विषयावर चार शब्द सांगणार आहें. घाणेरडें नसणें म्हणजे स्वच्छपणा होय. स्वच्छपणाचे तीन प्रकार होतात. शरीराचा स्वच्छपणा, कपडेलत्त्यांचा स्वच्छपणा व घरदारांचा स्वच्छपणा. होय; मनाचा स्वच्छपणासुद्धां महत्त्वाचा आहे. आतां, या सर्वांचा आपण विचार करूंया.

प्रथम शरीराचा स्वच्छपणा. यामध्यें आपलें शरीर स्वच्छ कसें ठेवावें हें येतें. सकाळीं सूर्योदयापूर्वीं उठावें. 'सूर्यवंशी उत्तानपाद राजा-' प्रमाणें ( सूर्य बराच वर आला तरी पाय पसरून उताणे पडलेच आहेत! ) असूं नये. शौचविधि झाल्यावर हात, पाय, तोंड स्वच्छ धुवावेत. नाक, कान, डोळे वगैरे

नवद्वारें स्वच्छ ठेवावींत. साबण लावून स्नान केलेलें बरें. अंग घासून स्वच्छ ठेवल्यास रोमरंध्रें मोकळीं होतात व शरीराचे व्यापार सुरळीत चालतात. दांत घासून स्वच्छ राखावे. प्रत्येक जेवणखाण झाल्यावर मिठानें दांत घासावेत. तोंड व नाक स्वच्छ ठेवल्यास पुष्कळ रोग कमी होतील.

स्नान थंड पाण्याचें चांगलें. रोज नियमित वेळीं शारीरिक क्रिया करण्याचा प्रघात, नव्हे, संवय लावून घ्यावी. म्हणजे शरीर घड्याळाप्रमाणें बरोबर चालतें. स्नानानंतर धुतलेलीं वस्त्रें परिधान करावींत. यावेळीं मन कसें प्रसन्न असतें. मग आपल्या नित्यकर्मास सुरवात करावी. त्यापूर्वी थोडा उपाहार केल्यास चांगलें. उपाहाराचे पदार्थ तिखट व खारट तर नसावेतच, पण गोडही असूं नयेत. सात्त्विक व पौष्टिक असावेत. सकाळीं ७॥ ही उपाहाराला योग्य वेळ आहे.

दुपारचें जेवण ११-१२ चे दरम्यान करावें. जेवतांना सावकाश चावून जेवावें. पूर्ण चर्वण झाल्याशिवाय घास गिळूं नये व पुष्कळ खाऊं नये. नंतर पुन्हां चार वाजतां थोडा फराळ करावा. व रात्रीं ८ वाजतां जेवून ९॥ ला निजावें.

आतां कपड्यांच्या स्वच्छपणाकडे वळूं. रोज अंगाजवळ वापरण्याचे कपडे रोज धुवावेत. एकदां घामानें भिजलेला कपडा धुतल्यावांचून पुन्हां घालूं नये, व वापरलेले सर्व कपडे प्रत्येक आठवड्यास उनांत टाकावे व पंधरवड्यास धुवून काढावेत. ब्लँकेट वगैरे लोकरीचे कपडे, नुसते उनांत ठेवून धुरळा काढण्याकरितां धोपटून, मग वापरले तरी चालतात. तीन महिन्यांनीं धुतले तरी हरकत नाहीं. पण उनांत टाकावेतच. चादरी वगैरे दर आठवड्यास धुवाव्यात.

घरादाराची स्वच्छता तीन प्रकारची आहे. घरांतील, घराची, व घराबाहेरील घराजवळची. घरांतील स्वच्छतेंत केर काढणें, अडगळ न ठेवणें हे प्रकार येतात. यासंबंधीं प्रत्येकानें आपल्या सोयीप्रमाणें, आवडीप्रमाणें व दुसऱ्यास चांगलें दिसेल याप्रमाणें बंदोबस्त करावा. घरांतील जमीन ओलसर नसावी. प्रकाश व हवा मुबलक मिळतील अशा खिडक्या असाव्यात; जाळ्या झुबरें नसावींत ( कोळ्यांनीं केलेलीं. ) दारें व कड्या बळकट असाव्यात. मोरींत घाण पाणी सांठून राहूं नये. सांडपाणी घराजवळ टाकूं नये. शौचकूप

घरापासून थोड्या लांबीवर असावा. उंदरांचीं बिळें वगैरे होऊं देऊं नयेत व झाल्यास मुजवावींत. घरांत उंदीर न होतील असें करावें. घराच्या भिंती भक्कम असाव्यात. किल्ल्याच्या तटाप्रमाणें नसल्या तरी चालतील. छप्पर चांगलें दुरुस्त असून गळतीं नसावींत व भिंतींत कोठेंही मुरूं देऊं नये. घरासभोंवतीं घाण, केरकचरा टाकूं नये. गवत वाढूं देऊं नये. घरांतील जमीन बाहेरच्या जमिनीपेक्षां उंच असावी. सांडपाणी किंवा धुवणाचें पाणी विहिरींत परत जाऊं देऊं नये. ज्या विहीरींत लोक धुणीं किंवा हातपाय धुतात, स्नान करितात, त्या विहिरींचें पाणी पिऊं नये. सारांश इतकाच कीं, घाण पाणी पोटांत जाऊं देऊं नये.

नखें स्वच्छ ठेवावींत. केस विंचरून चांगले राखावेत. डोळ्यांना त्रास होईल अशा रीतीनें प्रखर प्रकाशांत किंवा अंधारांत वाचूं नये, किंवा कांहीं काम करूं नये. छत्रीवांचून व अनवाणी उनांत फिरूं नये. तोंडावर पांघरूण घेऊन निजूं नये व उघडें पडूं नये. जमिनीपेक्षां पलंगावर किंवा माचावर निजणें चांगलें. मच्छरदाणी नेहमीं वापरावी, व डांस, पिसवा, ढेंकूण, चिलटें न होतील असा स्वच्छपणा ठेवावा. निजण्यापूर्वी पाणी पिऊन निजावें. रिकामें बसूं नये. नेहमीं उद्योगी असावें.

आपण सोंवळें ओवळें पाळण्याचा मुख्य उद्देश स्वच्छपणा हाच आहे. इंग्रजी शिक्षणानें सोंवळें तर कमी झालेंच, पण स्वच्छता वाढली नाहीं ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. यामुळेंच रोगराई पुष्कळ वाढत चालली आहे. मोठमोठ्या शहरांत घाण जास्त आढळते, ती खेडेगावांत पुष्कळच कमी असते. म्हणून खेड्यापाड्यांतील लोक पुष्कळ वर्षें जगतात, व बहुधा सशक्त व निरोगी असतात.

मला हें सांगितलें पाहिजे कीं स्वच्छता याचा अर्थ छानछोकी नव्हे. कित्येक लोक ऐटबाज पोषाख करतांना आढळतात, पण ते स्वच्छ असतीलच असें समजूं नये. सुवासिक अत्तरें वापरणें एक अर्थी बरें; कारण मग अस्वच्छतेची घाण झांकली जाते.

स्वच्छपणा हा विषय फार गहन आहे व सर्वव्यापी आहे. त्याचें सविस्तर वर्णन करणें शक्य नाहीं. स्वच्छपणाच्या परीक्षेकरितां नाक व डोळे यांचा उपयोग विशेष लागतो. याकरितां ते प्रथम स्वच्छ असले पाहिजेत, हें मीं पूर्वी सांगितलेंच आहे. या परीक्षेंतून पदार्थ पास झाल्यावर मग तो

टापटिपीच्या वर्गांत येतो. टापटीप स्वच्छपणा राखते व शोभा देते. स्वच्छपणा देवपणाइतकाच सुंदर आहे.

जितका विस्तार जास्त तितका स्वच्छपणा कमी पडत जातो. आपणांला जरूर व आवरेल इतकाच आपल्या गृहराज्याचा विस्तार असावा. अनवश्यक वस्तूंचा संग्रह करूं नये.

वस्तु स्वच्छ असूनही व्यवस्थित नसेल तर तिचा प्रभाव कमी होतो. व्यवस्थितपणाची संवय लहानपणापासूनच लागली पाहिजे. आळस हा स्वच्छता व व्यवस्थितपणा या दोघांचाही शत्रु आहे. विसराळूपणा कदाचित् क्षम्य आहे.

माझें संस्कृतांतील भाषण घरीं राहिल्याचें मला फार वाईट वाटतें. पण इलाज नाहीं. असो. त्याचा पुढील खेपस मी उपयोग करीन.

आपण माझे भाषणाचा शांतपणें विचार कराल अशी मला आशा आहे. शेवटीं आपले आभार मानून मी खालीं बसतें. " ( टाळ्या. )

या प्रमाणें बोलून त्या आपले जागेवर गेल्या. त्यांची आकृति व भाषण विशेष रसभरित नसल्यामुळें, व त्यांच्याच भाषेंत सांगावयाचें ह्मटलें ह्मणजे स्वच्छपणाशीं व्यवस्थितपणाचा, नाविन्याचा व उत्साहाचा मिलाफ न झाल्यामुळें, श्रोतृवृंदावर व्हावा तसा परिणाम झाला नाहीं. तथापि कांहीं गडबड झाली नाहीं. जणूं काय प्रत्येकजण विश्रांतिच घेत होतासें दिसलें. चैतन्य थोडें थंड पडलें. बुद्धीचें उत्तेजन हरपलें व कांहींजण जांभया देऊं लागले. दिव्याचा प्रकाशसुद्धां मंद भासूं लागला, आणि दहा मिनिटांत सर्वजण झोंपीं जातात कीं काय असें वाटलें. पण नाहीं. त्या वेळा श्री. सौ. भीमाबाई उठल्या. त्यांना पाहून सर्वांची झोंप उडाली. किंचित् भीति, किंचित् उत्सुकता, किंचित् मजा व विनोदीपणा इत्यादि मनोविकारांनीं मन जागृत केलें. ' नमवी पहा भूमि ही चालतांना ' याप्रमाणें त्या टेबलाजवळ आल्या. सर्वत्र शांतपणा पसरला पण तो जिवंत होता.

यापुढील मजकूर पुढच्या पत्रीं. रा. रा. शंकरराव यांना शिरसाष्टांग नमस्कार प्रविष्ट व्हावेत. कळावें, हे आशीर्वाद.

आपला बंधु,

**शं. चिं. श्रीखंडे.**



## पत्र १२ वें

# श्री. सौ. भीमाबाई यांचें व्याख्यान.

## अबलोन्नति होईल, पण केव्हां ?



अलेक्झांड्रिया. श्री. ता. ११-१०-१९१५

चि. सौ. कृष्णाबाई यांसः—

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. मागील पत्रावरून सभेचा वृत्तांत पुढें चालूः—

श्री. सौ. भीमाबाई या त्वरित गतीनें वक्त्यानें उभे राहण्याच्या ठिकाणीं आल्या. त्यांची शरीरयष्टि ( येथें यष्टि ह्मणजे काठी हा शब्द वापरतां येईल कीं नाहीं समजत नाहीं. काठी ह्मणण्यापेक्षां सोटा किंवा मलखांब शब्द जास्त शोभेल व यथार्थही होईल, पण तसा प्रघात नसल्यानें ह्मणवत नाहीं. ) भव्य, सशक्त, धिप्पाड पण व्यवस्थित, बांधेसूद व सुंदर होती. नांवावरूनच जर कोणाच्या आकृतीची कल्पना करणेची असेल तर ती श्री. सौ. भीमाबाई अवाढव्य यांचे संबंधानें अगदीं बरोबर होईल. तुमच्या कल्पनेप्रमाणेंच त्या होत्या. पेहराव कर्नाटकी—कानडी—पद्धतीचा होता. डोळे मोठे व दृष्टि चंचळ होती. प्रत्येक मनोविकाराचें प्रतिबिंब चेहऱ्यावर तत्काळ उमटे. आवाज मोठा, खणखणीत पण कर्कश नव्हता. पुरुष जातीचा टणकपणा त्यांचे चेहऱ्यावर दिसे, पण स्त्री जातीला योग्य अशी सफाई त्यांत होती. त्या ह्मणाल्याः—

" अध्यक्ष व भामिनींनो ! स्त्री जातीचें ठिकाणीं पुरुषाप्रमाणेंच सर्व गुणांची वाढ होणें शक्य असतां, तशी झालेली दिसत नाहीं. याला कांहीं कारण असलें पाहिजे. कांहीं प्रतिबंधामुळें या गुणांचा प्रकाश पडत नाहीं व पडला तरी दूरवर पोंचत नाहीं. असें कां झालें आहे? याला उपाय काय? याचा आपण आज विचार करूं या.

स्त्रियांनीं निरनिराळ्या विषयांत व गुणांत प्रावीण्य मिळविल्याचीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळच आहेत. गार्गेयी व वाचक्नवी या स्त्रिया वेदान्तविषयावर याज्ञवल्क्यासारख्याशीं वादविवाद करूं शकत अशाबद्दल उपनिषदांत पुरावा आहे. नृत्यगायनांत स्वर्गांतील अप्सरा प्रसिद्धच आहेत. रुक्मिणीनें

लग्नापूर्वी श्रीकृष्णास जी पत्रिका लिहिली तसलें हृदयंगम पत्र स्त्रियांनाचा काय, पण शिकलेल्या पुरुषांना तरी लिहिणें साधेल कीं नाहीं हा संशयच आहे. स्वर्गलोकीं वृषपर्व्याशीं युद्ध चाललें असतां राजा दशरथाच्या रथाचा कणा मोडला असतां त्या वेळीं त्याच्या सुकुमार राणी कैकेयीनें आपला हात घालून रथ स्थिर केला. प्रमिलेनें अर्जुनासारख्या योद्धयास युद्धांत पराजित केलें. स्त्रियांचें स्वतंत्र राज्यही होतें. बाणासुराची कन्या उषा इच्या दासीनें भिंतीवर सर्व राजेरज-वाड्यांची हुबेहुब चित्रें काढिलीं. या पुराणांतल्या गोष्टी झाल्या. अहिल्याबाई होळकर यांनीं उत्तम रीतीनें राज्यकारभार करून अजरामर कीर्ति संपादिली. श्री. लक्ष्मीबाई झांशीची राणी यांनीं क्षात्रतेज दाखवून रणबहादूर इंग्रजांससुद्धां तोंडांत बोटें घालावयास लाविलें. जोन ऑफ् आर्क नांवाच्या फ्रेंच कुमारीनें फ्रान्स देश शत्रूचे तावडींतून सोडविला. पन्नादाईची स्वामिभक्ति प्रसिद्धच आहे. गायनकलाप्रवीण गोहरजान अझून हयात आहे.[1] रोग्यांच्या शुश्रूषेचें काम व डाक्टरीचें कामसुद्धां बायका पुरुषांपेक्षां चांगलें करतात. विणकाम, शिवणकाम, पाकशास्त्र, बालसंगोपन इत्यादिकांत स्त्रियांचा हात कोण धरूं शकेल? वाटेल ती कला हस्तगत करण्याचें सामर्थ्य स्त्रियांत आहे तर त्यांची अशी स्थिति कां?

याचें कारण स्त्रियांनीं स्वतःस पुरुषाचे गुलाम बनवून टाकिलें आहे. पुरुष पक्षपातानें पुरुषजातीच्या मुलांच्या शिक्षणाची काळजी घेतो, मुलींची घेत नाहीं, व आईला आपली मुलगी जरी अशिक्षित राहिली तरी पर्वा नाहीं. पाहिजे तो गुणग्रहण करण्याचें सामर्थ्य मेंदूंत आहे पण त्याला शिक्षण व उत्तेजन पाहिजे. स्त्रियांनीं जर स्वतःची काळजी घेतली नाहीं, आपल्या जातीची शिक्षणानें उन्नति करून घेतली नाहीं तर कोण करणार? "उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्।"[2] असें श्रीकृष्ण भगवान् सांगतात. स्त्रिया पुरुषांवर इतक्या अवलंबून कां? कारण त्या अशिक्षित म्हणून पंगू आहेत. त्यांनीं प्रयत्नानें शिक्षण संपादून स्वावलंबी व्हावयास नको काय?

---

१ या गायिका सन १९३० मध्यें वारल्या.

२ श्रीमद्भगवद्गीता. अ. ६ श्लो. ५ "आपण होऊन आपला उद्धार करावा; आपली अवनति करूं नये."

पण तुह्मी अशा गुलाम कां बनला? सिंहाचीं लेंकरें असून तुह्मी अगदीं गोगलगाय कशा झालांत? स्वतःचें स्वरूप तुह्मीं विसरून जावें काय? दिवसांतून दहावेळां आरशांत पाहूनसुद्धां तुमची ओळख तुह्मांस कशी पटत नाहीं? विद्या, संपत्ति व कीर्ति या तुह्मांस नको झाल्या काय? इतक्या निरुत्साह व निस्तेज तुह्मी कां झालां? विवाहविधि उरकून एकदां पुरुषाच्या गळ्यांत माळ घातली ह्मणजे झालें, मग त्याच्यावर सर्वस्वीं अवलंबून राहावयाचें. इतका परावलंबीपणा तुह्मीं कां पत्करला आहे ? जन्मभर तुमचें ओझें दुसऱ्यानेंच वहावें असें तुह्मांस कसें आवडतें ? पुरुषांच्या मदतीवांचून स्वतंत्रपणें आपलें कर्तव्य करावें असें तुह्मांस वाटत नाहीं काय ? वीरपत्नी, वीरमाता ह्मणवून घेण्यांत पूर्वीं जो राजपुतान्यांतील स्त्रियांना अभिमान वाटत असे तोसुद्धां येथें दिसत नाहीं. मग स्वतः वीर बनण्याचें लांबच! ही स्थिति फार शोचनीय आहे.

एकादी मुलगी शिकण्याकरितां शाळेंत जाऊं लागली तर आपण तिला नांवें ठेवतों, तिच्याकडे पाहून नाक मुरडतों, तिची हेटाळणी करतों. आपण असें कां करावें बरें ? आपण चिखलांत रुतलेलें असायचें व दुसरी जर अंग झाडून त्यांतून बाहेर पडूं लागली तर तिला मागें ओढायचें. स्वतः करावयाचें नाहीं व दुसरी करूं लागली तर तिला हंसायचें, व करूं द्यावयाचें नाहीं. भगिनींनो ! या कृत्यांनींच तुमची अवनति झाली आहे. तुह्मीं स्वतः शिकून तुमच्या मुलींना शिकवा व पुढें शिकण्यास उत्तेजन द्या. सारख्याच शिक्षणाच्या मुलापेक्षां मुलगी जास्त हुषार व चणचणीत आढळून येते. शिवाय कोणतेंही काम स्त्रीनें व पुरुषानें स्वतंत्रपणें केल्यास स्त्रीचें काम नीटनेटकें व सफाईदार आढळतें. स्त्री ही पुरुषापेक्षां श्रेष्ठ आहे. पण आपला श्रेष्ठपणा आपण राखून घेतला पाहिजे. अंगीं गुण व कर्तृत्व असल्याशिवाय कोणाला कोणी श्रेष्ठपणा देणार नाहीं. कोणतीही विद्या पुरुषांपेक्षां स्त्रियांना लवकर येते. पण शिकल्याशिवाय कशी येणार?

'बायका पुष्कळ वेळ निरर्थक कामांत दवडतात. चारपांच बायका मिळून एक पार्लमेंट बनवावयाचें, व त्यांत शेजाऱ्यापाजाऱ्यांवर टीका करीत बसावयाचें. किंवा कापसाच्या जाळावयास वाती करावयाच्या अथवा लक्ष तांदूळ देवाला वाहण्याकरितां निवडीत बसावयाचें. नाहींतर जपमाळ घेऊन

बसावयाचें. शेजाऱ्याचे दोष पाहून तुह्मीं स्वतः सुधारण्याचा प्रयत्न केला आहे काय? पुढच्यास ठेंच लागलेली पाहून तुह्मी पाय उचलून टाकतां काय? हजारों वाती जाळून तरी तुमचे चित्तांत ज्ञानाचा प्रकाश पडला आहे काय? अथवा तुमचें अज्ञान तुह्मांस दिसलें आहे काय? लक्ष तांदूळ देवाला वाहिल्या-वर ईश्वरविषयक ज्ञान तुमचें रतिभर तरी वाढलें आहे काय? माळेचे मणी जसे एकामागून एक जातात तसें या जन्मांतील तुमचे दिवस एकामागून एक फुकट चालले आहेत. अशा प्रकारें जन्म गेले तरीसुद्धां तुमची स्थिति सुधारणार नाहीं, उलट खालावेल. तुह्मी ज्ञानसंपादनाचाच मार्ग स्वीकारला पाहिजे तरच तुमची धडगत लागेल.

लिहिणें, वाचणें येत नसल्यानें स्वतःचे विचार दूरच्यास कळवितां येत नाहींत, व दुसऱ्याचे कळत नाहींत. प्रत्यक्ष बोलण्याचे प्रसंग सगळ्यांसच येत नाहींत, ह्मणून मोठमोठे लोक स्वानुभवानें ग्रंथ लिहून ठेवतात. तुह्मांला वाचावयास येत नसल्यानें त्या ग्रंथांवर रोज जरी फुलें, तुळशी, गंध, अक्षता घातल्या तरी त्यांतील मर्म तुमच्या डोक्यांत यावें कसें? फराळाच्या डब्याकडे पाहून, त्याची पूजा करून किंवा त्याला उबदार कपड्यांत बांधून ठेवल्यानें तुमचें पोट भरेल कां? त्यांतील पदार्थांची गोडी तुमच्या जिभेंत उतरेल कां?

वाचावयास येऊं लागलें ह्मणजे दुसऱ्या विद्या सुलभ होतात. आपण सर्व गोष्टी जर स्वतःच्याच अनुभवानें शिकूं लागलों तर सर्व जन्मांत फारच थोडें शिकूं. पण दुसऱ्याचे अनुभव आपणांपुढें ग्रंथरूपानें असतात त्यांवरून आपण जलद शिकतों. अरण्यांत प्रत्येकानें स्वतंत्रपणें मार्ग काढण्याचा प्रयत्न केल्यास सर्वांस रस्ता मिळत नाहीं. पुष्कळ लोक ज्या मार्गानें वाट काढीत काढीत गेले आहेत, त्याच मार्गानें आपणास त्यांच्यापेक्षां थोडें पुढें जातां येतें, व असें करतां करतां आपणास आपलें ध्येय सांपडतें. सारांश दुसऱ्याच्या अनुभवाचा फायदा आपण घेतला पाहिजे व तो वाचनद्वारें उत्तम प्रकारें मिळूं शकतो.

स्त्री व पुरुष हीं संसाररथाचीं दोन चाकें आहेत. त्यापैकीं एक चाक चांगलें व सुरळीत चालणारें व दुसरें ओबडधोबड व प्रत्येक ठिकाणीं अड-खळणारें असलें तर रथ कसा चालेल? दोघांनींही जर संसाराचें ओझें वहा-वयाचें आहे, तर दोनींही चांगल्या स्थितींत व प्रगमनशील पाहिजेत. नाहींतर

रथाची गति कुंठितच होईल. पाश्चात्य देशांत ज्यांचे परस्पर गुण मिळतात असेच स्त्री पुरुष विवाहबद्ध होतात. त्यामुळें त्यांचा संसार सुखमय होतो. स्त्रियांना पुरुषांसारखेच राज्यकारभारांतही हक्क असावेत अशाबद्दल तिकडील पुष्कळ स्त्रियांचे प्रयत्न चालू आहेत व ते यशस्वी होतील. नंतर सर्व मानव जातीचें हित होईल व सुख आणि सौभाग्य वाढेल.

स्त्रिया अशक्त व नाजुक प्रकृतीच्या आणि अज्ञानी झाल्यामुळें पुरुषांचे हे खेळ चालले आहेत. स्त्रियांनीं शरीरसंपत्ति प्रथम कमावली पाहिजे. एखाद्या पुरुषानें जर स्त्रीचा उपमर्द केला तर हिंदुस्थानांतील कोणती स्त्री स्वसंरक्षण करण्यास समर्थ आहे ? स्त्रियांची व मुलांची स्थिति सारखीच नाहीं काय ? अशा दुर्बलपणामुळें पुढें होणारी संततिही दुर्बलच होत आहे. दुर्बल लोकांचा देश ऊर्जितावस्थेस कसा येईल ?

स्वच्छ हवेंत फिरण्यास न जाण्यानें, नेहमीं बसून राहिल्यानें, व्यायाम न घेतल्यानें, व पौष्टिक अन्न न खाल्ल्यानें स्त्रियांमध्यें रोग फैलावले आहेत. मुलांची वाढ स्त्रियांवरच अवलंबून असल्यानें त्यांची प्रकृति सुदृढ असणें अत्यंत आवश्यक आहे. आमचे पुरुष स्त्रियांची स्थिति न सुधारतां जर देशसुधारणेच्या मागें लागतील तर त्यांचे ते प्रयत्न वाळूच्या पायावर वाडा बांधण्याचा यत्न करणाऱ्या मनुष्याप्रमाणें हास्यास्पद होतील. पाया खंबीर नसेल तर इमारत वर चढणार कशी ? ती ढांसळणारच. पुरुषांनीं स्त्रियांची मदत घेऊनच यश मिळवावें.

मला मुख्य दोन गोष्टी तुम्हांस सांगावयाच्या आहेत. एक उत्तम प्रकारचें शरीरबल संपादन करणें, व दुसरें स्वतंत्रपणें चरितार्थ चालवितां येईल असें शिक्षण किंवा धंदा शिकणें या दोन गोष्टी स्त्रियांना अत्यंत आवश्यक आहेत. त्या मिळाविल्या म्हणजे स्त्रियांनीं अर्धी लढाई जिंकल्याप्रमाणेंच आहे. त्यांना पुष्कळ तऱ्हेनें त्यांच्या बांधवांच्या व देशाच्या उपयोगीं पडतां येईल, त्यांची योग्यता वाढेल. बायको म्हणजे आजन्म राबणारा गुलाम अशी जी पुरुषांची समजूत झालेली दिसते ती बदलेल. मग पुरुष स्त्रियांना अत्यंत आदरानें व प्रेमानें वागवितील. शेवटीं ईश्वर स्त्रियांना आपली स्थिति सुधारण्याची बुद्धि देवो अशी प्रार्थना करून मी आपलें भाषण संपवितें. " ( टाळ्या. )

रा. रा. शंकरराव यांना सा. न. प्रविष्ट व्हावेत. मी येथें सुखरूप आहें. कळावें, हे आशीर्वाद.

आपला बंधु,

**शंकर चिंतामण श्रीखंडे.**

---

## पत्र १३ वें

# श्री. सौ. अरुंधतीबाई यांचें व्याख्यान.

## युक्तिसाधन.



अलेक्झांड्रिया. श्री. ता. १९-१०-१९१५

चि. श्री. सौ. कृष्णाबाई यांसः—

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. सभेचा वृत्तान्त पुढीलप्रमाणें: —

नंतर श्री. सौ. अरुंधतीबाई या बोलावयास उठल्या. यांची आकृति लहानसर असून उंची साधारण बारा वर्षांच्या मुलीइतकीच. मुलीप्रमाणेंच चपळपणा व उत्साह त्यांचे अंगीं होता. चेहरा किंचित् लंबवर्तुळ असून, वर्ण गोरा होता ह्मटलें तरी चालेल. दृष्टि चंचळ होती. डोळे लांबट व कानांकडे जात आहेतसें दिसे. नाक बारीक व सरळ असून हनुवटी अणकुचीदार होती. पोषाख शिकलेल्या दक्षिणी ब्राह्मण स्त्रीप्रमाणें होता. पायांत पायमोजे व बूट होते. हात लांब असून बोटें लांबट व बारीक होतीं. त्या चपळतेनें वारंवार हालत. त्या ह्मणाल्या:—

"अध्यक्ष व सुमतीहो! तुमचे अंगीं सर्वगुणसंपन्न होण्याचें सामर्थ्य आहे व शरीरही तुह्मांला बलवान् करितां यईल. पण हें सुलभपणें साधण्यास तुह्मीं एका मुलीची मदत घेतली पाहिजे. तुमच्या मनांत इच्छा आहे. सभोंवतीं साधनें भरपूर आहेत. तरीसुद्धां या मुलीला टाकून जर तुह्मीं प्रयत्न कराल तर तुह्मांस यावें तितकें यश येणार नाहीं. काम कमी होईल. वेळ अधिक लागेल, श्रम फार पडतील, खर्च जास्त येईल. पण या मुलीच्या मदतीनें चालाल तर यक्षिणीच्या कांडीप्रमाणें ती तुमचा जिकडे तिकडे फायदाच

दाखवील. ही मुलगी तुह्मांकडे कांहीं मागत नाहीं, तिला खावयास लागत नाहीं. तुह्मीं हिचा स्वीकार केल्यास ही तुमच्या हिताकरितां झटेल, फक्त तुह्मीं तिला संभाळून जवळ बाळगावयाचें, व तुह्मीं जे कांहीं कराल, पहाल, ऐकाल तें तिला कळवावयाचें. ह्मणजे ती तुह्मांस योग्य मार्ग दाखवील. तिच्या धोरणानें चालल्यानें शेंकडों लोक सुखी झाले आहेत व होताहेत. तिच्या लीला पाहून व ऐकून तुह्मांला आनंदच होईल. तिच्याजवळ सुखाच्या कपाटाची किल्ली आहे. ती नेहमीं यशस्वी होत असल्यामुळें आनंदी असते व इतरांस आनंद देते. कित्येक व्यक्तींवर तिचें स्वाभाविक प्रेम असतें व कित्येक प्रयत्नानें तिची मर्जी संपादन करतात. बुद्धिमान् लोक तिला विशेष आवडतात व त्यामुळेंच त्यांचेविषयीं ती थोडी पक्षपातीही दिसते. आपल्या तंत्रानें चालणारांस ऊर्जितावस्थेस आणणें हें तिचें ध्येय आहे. सावधपणा व प्रयत्न हेच तिला वश करूं शकतात.

तुह्मी ह्मणाल, 'बाई! हें तुह्मीं काय चालविलें आहे? आह्मांला कूट प्रश्न घालतां कीं काय? ती मुलगी कोण व तिचें नांव काय हें तरी सांगाल कीं नाहीं आधीं!' होय. मी आतां तेंच सांगतें. तुह्मांला फार वेळ बुचकळ्यांत ठेवीत नाहीं. तिचें नांव युक्ति. युक्तीचें नांव युक्तियुक्तीनेंच सांगावयास नको काय! युक्ति ही शक्ति व बुद्धि यांची धाकटी बहीण आहे, पण फार चाणाक्ष व हिकमती आहे. सर्व जगभर या तिघींचें प्राबल्य आहे. शक्ति निसर्गनिर्मित आहे व ईश्वराप्रमाणें सर्वव्यापी आहे. बुद्धि फक्त मानव जातींतच आहे. व युक्ति ही मनुष्याच्या बुद्धीनें स्वतःच्या मदतीकरितां तयार केली आहे. ईश्वरनिर्मित सृष्टींत युक्ति कोठेंही नाहीं. सृष्टि स्थूल नियमानुसार चालते. तेथें अनंत सामर्थ्य भरलें आहे. त्या सामर्थ्याचा मानव जातीस उपयोग करून देण्याकरितां युक्ति जन्मास आली. आतां तिनें जवळ जवळ सर्व जग व्यापलें आहे, व दिवसेंदिवस तिचेंच प्राबल्य होत जाणार. करितां तिचा आश्रय आपण करणें इष्ट आहे.

कोणतेंही कार्य सोपें करणें हें युक्तीचें काम आहे. युक्तीनें अत्यंत बिकट कामें सुलभपणें होतात. युक्ति याच गुणामुळें प्रत्येकास आवडते. पण मनुष्यास तिचें स्वरूप सहज समजत नाहीं. तुह्मी प्रत्येक काम युक्तीनें करा ह्मणजे

पहा काय मजा होते ती. तुमचें प्रत्येक कृत्य खमंग व रसाळ होईल, व इतर आश्चर्यचकित होतील. युक्तीमुळें शक्ति, बुद्धि, लक्ष्मी, द्रव्य, व काल वांचून कार्य सुंदर होतें. जेथें युक्ति तेथें भक्ति. युक्तिवान् लोक इतरांचे पुढारी व मार्गदर्शक होतात.

पृथ्वीच्या पाठीवर मनुष्य निर्माण झाल्यावर त्याचे ठिकाणीं बुद्धीचा उदय झाला. व तेव्हांच त्यानें युक्तीचें महत्त्व ओळखून तिला जवळ केलें. जठराग्नीला कच्चें अन्न पचविण्यास त्रास पडतो, तेव्हां शिजविण्याची युक्ति निघाली. बीज पेरून पुष्कळ धान्य उत्पन्न केल्यास दुष्काळांत उपयोगीं पडेल असा संग्रह करण्यास तिनें मनुष्यास शिकविलें. विचार दुसऱ्यास कळविण्यास भाषा निघाली. ते विचार दुसऱ्यास कळवितां यावे व चिरंजीव व्हावे ह्मणून लिपी काढली. थंडी, वारा, ऊन, शत्रु, यांचेपासून रक्षण करण्याकरितां घरें बांधणें, वस्त्रें विणणें, व त्यांचे कपडे तयार करणें वगैरे मनुष्यानें शोधून काढलें. मधुर व स्वादिष्ठ अन्न तयार करणें, करमणुकीकरितां गायन, वादन, नृत्य इत्यादि कला निर्माण करणें, राज्यें स्थापणें, कायदे करणें, हत्यारें बनविणें, वाफेच्या शक्तीनें चालणाऱ्या गाड्या, आगबोटी, विजेचे दिवे, व संदेशवाहक यंत्रें, हवेंतून जाण्यास विमानें, चित्रकला, सूर्यप्रकाशानें घेतलेलीं चित्रें वगैरे असंख्य शोध युक्तीनेंच लाविले नाहींत काय ?

दूरवर विचार केला तर तुह्मांस असें आढळून येईल कीं, आपल्या भोंवतीं जसें हवेचें आवरण आहे, तसेंच युक्तीचेंही आहे. जिकडे पहाल तिकडे युक्तीचें व्यक्त कार्य तुह्मांस आढळेल. विश्वकर्म्यानें सृष्टि निर्माण केली, पण मनुष्यानें त्याच्याही वर ताण करून त्या सृष्टीला तर आपले अंकित केलेंच, पण नवीन सृष्टिही निर्माण केली. प्रत्येक ठिकाणीं युक्ति आहे. पण आपण शोधून पाहावयास पाहिजे. युक्ति हें जवळ जवळ ईश्वराचेंच स्वरूप आहे. तसें नसतें तर तिच्यांत इतकें सामर्थ्य, इतका सर्वव्यापीपणा, व इतकी करामत कोठून असती? 'कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ।' * या भगवंतांनीं आपल्या विभूति गीतेंत सांगितल्या आहेत. पण यांत युक्ति कां

---

* श्रीमद्भगवद्गीता अ. १० श्लो. ३४ "आणि स्त्रियांपैकीं कीर्ति, लक्ष्मी, वाणी, स्मृति, बुद्धि, धृति, क्षमा या मी आहें."

सांगितली नाहीं हें मला सांगतां येणार नाहीं, पण युक्ति ही यांपैकीं बहुतेकांना आधारभूत आहे. व प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्ण युक्तीनेंच सर्व कार्यें करीत. किंबहुना ते मूर्तिमंत युक्तिच होते हें त्यांचे चरित्रावरून कळेल.

'युक्ति' शब्द युज्–जोडणें, सांधणें या धातूपासून झाला आहे. स्वल्प-साधनांनीं महत्कार्य साधण्याची जी कला, जें कौशल्य तीच युक्ति. चार स्तुति-वाचक शब्द बोलून मोठी दक्षिणा मिळविणारा ब्राह्मण युक्तिवान् नव्हे काय? मनुष्यस्वभावाचें ज्ञान करून घेऊन, त्यांतील विवक्षित गुणांचा उत्तम उपयोग करून घेणें, सृष्टींतील शक्तीचा आपल्या हिताकडे विनियोग करणें वगैरे एकच काय पण हजारों प्रकार युक्तीचे आहेत. रामरक्षा स्तोत्र रोज ह्मणणारा 'अश्व-मेघायुतं पुण्यं संप्राप्नोति न संशयः' * हा केवढा मोठा शोध आहे? एक अश्वमेध यज्ञ करण्यास किती पैसा व किती सामर्थ्य लागतें? तें कोणाजवळ आहे काय? पांडव फक्त एकच अश्वमेध करूं शकले. पण तुमच्याकरितां बुधकौशिक ऋषींनीं ही सोपी युक्ति शोधून काढिली आहे! सर्व शास्त्रें हीं तुह्मांला युक्त्या शिकवितात. तुह्मी स्वतः युक्ति शिका व आपल्या मुलांना शिकवा.

बिरबल–बादशहांच्या गोष्टींत बिरबल मोठा युक्तिवान् होता ह्मणून ह्मटलें आहे. असेल. पण त्यांच्या प्रचलित गोष्टींत बिरबलाच्या युक्तीपेक्षां बादशहाचा मूर्खपणा जास्त दाखविला आहे. शिवाय विनोद हा भाषेंतील युक्तीचें रूप आहे. विनोदानें भाषण चांगलें वठेल पण तादृश फायदा कांहीं नाहीं व त्यांत मानव जातीचें हितही साधत नाहीं. करितां असल्या युक्त्या केवळ करमणुकी-करितां आहेत. त्या फावल्यावेळीं शिकाव्या. पण व्यवहारोपयोगी युक्त्या शिकण्याकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. कोणतेंही काम करतांना किंवा शिकतांना त्यांतील मर्म कोणतें, खुबी काय, व तें सहज दुसऱ्या रीतीनें कसें साध्य होईल, यांविषयीं विचार करावा. कोणतीही गोष्ट क्षुल्लक ह्मणून टाकून देऊं नये. अभ्यासानें ही विचार करण्याची शक्ति वाढते, व युक्त्या भराभर सुचूं लागतात. युक्तीनें केलेलें काम कधींही कंटाळवाणें होत नाहीं.

जेथें जेथें कांहीं नवीन युक्ति दिसेल ती लगेच स्मरणवहींत टिपून ठेवावी. अशा युक्त्यांनीं भरलेलें स्मरणबुक सांडलें तर युक्तीनें शोधून काढावें.

* "दशसहस्र अश्वमेधांचें पुण्य निःसंशय मिळवितो"

शिकलेल्या युक्त्या तत्काळ व्यवहारांत आणाव्यात, व कृतींत उतराव्यात म्हणजे विसरत नाहींत. दृढ होतात. दुसऱ्यास शिकविल्यानंतर कधींच विसरत नाहींत. युक्तीनेंच विद्या, कीर्ति, संपत्ति व चारी पुरुषार्थ संपादन करावेत.

युक्ति म्हणजे कपट नव्हे. कपटाची कल्पनासुद्धां तुमचे मनास न शिवूं दे. कपटानें दुसऱ्याचें नुकसान व स्वतःचा क्षणिक फायदा होतो, पण युक्तीनें दुसऱ्याचें नुकसान न होतां आपला अक्षय फायदा होतो. हा त्यांत फरक आहे. कपट टाकून युक्तीचा अवलंब करा अशी तुम्हांस विनंति करून व माझें भाषण शांतपणें श्रवण केल्याबद्दल आपले आभार मानून मी रजा घेतें." (टाळ्या.)

इकडील हवापाणी उत्तम आहे. रोज ढग येतात व पाऊस पाडण्याची भीति दाखवितात, पण पाडीत नाहींत. किंचित् थंडी भासमान होते. ऊन प्रखर नसतें व त्रास देत नाहीं. समुद्र बहुतेक शांतच आहे. उत्तरेकडून वारा येतो पण जोराचा नसतो. आहे त्यांत बरें आहे. श्री. रा. रा. शंकरराव यांस सा. नमस्कार. कळावें, हे आशीर्वाद.

आपला बंधु,
शं. चिं. श्रीखंडे.



## पत्र १४ वें

# श्री. सौ. सरस्वतीबाई यांचें व्याख्यान.

## आमचे पुराणग्रंथ

अलेक्झांड्रिया. श्री. ता. १ नोव्हेंबर १९१९

चि. सौ. कृष्णाबाई यांसः—

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. मी येथें सुखरूप आहें. परिस्थितिप्रमाणें मनुष्यस्वभाव बदलतो म्हणतात तें खोटें नाहीं. मी समुद्राचे कांठावर आज तीन महिने रहात असल्यामुळें, समुद्राचे लाटांप्रमाणें अनेक विचारतरंग माझे मनांत उद्भवतात. कितीही मोठ्या लाटा आल्या तरी समुद्र मर्यादातिक्रमण करीत नाहीं, तसेंच मीही करीत नाहीं. सूर्यानें पुष्कळ पाणी शोषलें

किंवा नद्यांनीं विपुल आणून भरलें, तरी तो कृश होत नाहीं किंवा फुगूनही जात नाहीं. तसाच मी होत चाललों आहें. पोटांत पुष्कळ जीवांना आधार व आश्रय देऊन पाठीवर फिरण्यासही त्याची परवानगी असते, तसा मी होईन काय? मोठमोठे खडकसुद्धां फुटेपर्यंत लाटा त्यांवर आदळतच असतात. गति कुंठित झाली तर परततात पण फिरून वेगानें येतात तसा कर्तव्यनिष्ठ मी होईन काय? सूर्यचंद्रांच्या गतीप्रमाणें भरती, ओहटी होते त्याचप्रमाणें मीही नव-ग्रहांच्या गतीप्रमाणें फिरतों आहें. हलक्या वस्तूंना समुद्र पोटांत ठेवीत नाहीं तसाच मीही हलके मनोविकार व क्षुल्लक विचार टाकीत आहें. तसांना तो शांत करितो आणि मलाही तसेंच करावेंसें वाटतें. आपलें पाणी खारें असलें तरी तो मेघांना गोड पाणीच देतो व पर्यायानें जगाची तहान भागवितो तसें मला करतां येईल काय? पण अझून मला वाटतें कीं आपण गोडच असलेलें बरें. आणि तेंच खरें आहे.

पण आतां सभेच्या वार्तेस सुरवात करितों. तूर्त तेंच कर्तव्य मजपुढें आहे. श्री. सौ. सरस्वतीबाई ज्यावेळीं बोलावयास उठल्या तो देखावा आतां मला दिसत आहे. तो असाः—

श्री. सौ. सरस्वतीबाई या सडपातळ, उंच, पाणीदार व बऱ्याच तरुण होत्या. पोशाख साधा, स्वच्छ, आटोपशीर व कुलीन ब्राह्मण स्त्रीप्रमाणें होता. चेहरा टवटवीत व प्रफुल्ल असून कपाळ भव्य होतें. अंगावर ठळक दागिने बरेच होते. ह्मणून "निसर्गभिन्नास्पदमेकसंस्थं तस्यां द्वयं श्रीश्च सरस्वती च" * असें मला वाटलें. क्वचित् स्थलीं पाश्चात्य सुधारणेची झांक दिसे. (त्यांचें पोलकें, बुचडा, स्प्रिंगच्या गोटपाटल्या, पायमोजे व जोडा, कमरपट्टा वगैरे-वरून.) टेबलाजवळ येऊन त्या ह्मणाल्या, "अध्यक्ष व विदुषीगणहो! मी वाचावयास शिकल्यावर बऱ्याच तऱ्हेचीं पुस्तकें वाचलीं, पण त्या सर्वांत आमचीं पुराणेंच मला फार आवडतात. त्यांच्या वाचनानें करमणूक होऊन शिवाय मनाला शांतता प्राप्त होते व परमार्थाकडे चित्त लागतें. पुराणांत पुष्कळ शिकण्यासारखें आहे. त्यापैकीं कांहीं गोष्टी मी सांगतें.

---

* रघुवंश सर्ग ६ श्लोक २९ च्या पूर्वार्धांत 'अस्मिन्' ऐवजीं 'तस्यां' असा प्रसंगानुरूप येथें फरक केला आहे. अर्थ—" स्वभावतः भिन्न ठिकाणीं राहणाऱ्या लक्ष्मी व सरस्वती यांची जोड त्यांचे ठायीं एकत्र होती।"

पुराणें ह्मणजे आपले प्राचीन इतिहास होत. मुख्य अठरा आहेत. व उपपुराणें बरींच आहेत. प्रत्येक पुराणांत एका विशिष्ट देवतेची महती वर्णन केलेली आहे. मनुष्याच्या मनाची आवड निरनिराळया तऱ्हेची असल्यामुळें त्या त्या तऱ्हेच्या मनाला पटतील अशा देवता कल्पाव्या लागतात. बाकी, देव एकच आहे. सर्व पुराणांचा हेतु वेदान्त–विषय–प्रतिपादन हा आहे. पण वेदांतविषय युक्लिड्च्या पुस्तकांप्रमाणें नीरस असल्यामुळें साधारण जनसमूहास आवडत नाहीं, ह्मणून त्याच्याशीं इतिहास मिळविला व इतिहासांतील कोरडेपणा काव्य व कल्पनांनीं भरून काढला. अशा तऱ्हेनें पुराणें हीं सर्व जनसमूहाला पटतील अशीं तयार केलीं. तरीसुद्धां कांहीं व्यक्ति असंतुष्ट राहिल्याच आहेत. यावरून प्रत्येकास संतुष्ट करणें आपल्या सर्वज्ञानी ऋषींनाही साधलें नाहीं, मग आह्मां अल्पबुद्धि मानवांचा काय पाड ? असो.

इतिहास शिकल्यानें आपण कसें वागावें ह्मणजे आपलें कल्याण होईल हें समजतें. पुढच्यास ठेंच लागलेली पाहून मागचा शहाणा होतो; व पाय उचलून टाकतो. अशा रीतीनें आपण उन्नतीला जात आहोंत. पुराणें वाचल्यानें स्वार्थ, परमार्थ हीं दोन्हीं साधतात, पूर्वीचे लोक कसें वागत होते हे आपणांस समजतें व ईश्वरविषयक ज्ञान प्राप्त होऊन भक्ति जडते. काव्यवाचनानें बुद्धि तीक्ष्ण व प्रतिभासंपन्न होते. याप्रमाणें पुराणवाचनानें इहपरलोकसाधनाला मदत होते. व्यवहारकौशल्य शिकण्यास पुराणांसारखे ग्रंथ दुसरे नाहींत. पण आपण पुराणें कधीं वाचतों कां ?

पुराणांना अनुसरून जोपर्यंत आर्यलोक वागत होते तोपर्यंत ते जगांत श्रेष्ठ होते. ज्या वेळेपासून रूढींचें प्राबल्य सुरू झालें, तेव्हांपासून या भारतभूच्या ऱ्हासास सुरवात झाली. पुराणांविषयीं अज्ञान व अनादर हींच आपल्या देशाच्या अवनतीचीं कारणें आहेत.

उच्च दर्जाचे सद्गुणांबद्दल पुराणांत पुष्कळ व्यक्ति प्रसिद्ध आहेत. त्यांचें उदाहरण आपले डोळयांपुढून हालतांच आपणांस ते सद्गुण पारखे झाले. एकवचनी व एकपत्नीव्रताबद्दल श्रीरामचंद्र प्रसिद्ध आहेत. भीष्माचार्य प्रतिज्ञापालन व ब्रह्मचर्य या गुणांनीं शोभतात. दोघांचीही पितृभक्ति अवर्णनीय आहे. औदार्याबद्दल कर्ण अनुपम दिसतो. Engineering च्या ( कारागिरीच्या )

कामांत विश्वकर्मा निपुण होता. कारस्थानीपणांत कृष्णाची सर कुणाला याव-याची नाहीं. ईश्वरभक्ति व स्वमतांबद्दल अभिमान यांत प्रल्हादाची बरोबरी कोण करील? हनूमंताची भक्ति अवर्णनीय नाहीं काय? दमयंतीचें प्रेम किती स्त्रियांत सांपडेल? मातापितरांची सेवा श्रावणाप्रमाणें करणारे पुत्र ज्यांना आहेत ते धन्य होत! जगांतील गोष्टींपासून आपण कसें शिकावें हा धडा दत्तात्रेयांनीं घालून दिला. सारांश, पुराणांतील प्रत्येक गोष्टीपासून कांहींतरी तात्पर्य निघतें व तें शिकण्यासारखें आहे.

पुराणांत बालविवाहाची चाल कोठेंही दिसत नाहीं. ज्यांचें शरीर व मन यांची पूर्ण वाढ झालेली आहे अशा मुली स्वयंवरानें लग्न करीत असत. ह्मणूनच त्या वेळची संतति बलवान् व दीर्घायु निपजत असे. प्रीतिविवाहास विशेष महत्त्व होतें. आईचे गुण मुलांत उतरतात. सध्यां अशिक्षित व अपूर्ण वाढ झालेल्या मुली मातृपदवी पावत असल्यामुळें संतति निर्बळ व मनानें कमकुवत निपजते. विहीरींतच नाहीं तर पोहऱ्यांत कोठून येणार?

स्त्रियांनीं कसें वागावें याबद्दल पुराणांत पुष्कळ माहिती मिळते. पुरुषांचें प्रेम कायम राहील असें समजून स्त्रियांनीं अवज्ञेनें व निष्काळजीपणानें वागू नये. श्रीराम व नळराजा यांनीं आपल्या पतिव्रता पत्नींचाही प्रसंगीं त्याग केला आहे. यावरून पुरुषांचें प्रेम अनिश्चित दिसतें. तें फार संभाळून जतन केलें पाहिजे.

विद्यार्जनाकरितां गुरुगृहीं राहण्याची चाल पूर्वी असे. त्यामुळें विद्यार्थी स्वतंत्र व कर्तव्यदक्ष निपजत. विद्या शिकणें पूर्ण झाल्यावर घरीं येत व लग्न करीत. आतां मुलानें घराबाहेर जाणें ह्मणजे आईबापांस दुःखद होतें. विद्या पूर्ण होऊन मुलगा स्वतंत्रपणें मिळविणारा होण्यापूर्वी त्याचें लग्न होऊन एक दोन मुलेंही त्याला 'बाबा' ह्मणूं लागतात. ह्मणजे त्याची हांव संपली व गति खुंटली. अशानें महत्वाकांक्षा नाहींशी होऊन मुलगा बापापेक्षां सवाई होण्याऐवजीं पाऊण किंवा अर्धाच होतो. व तीच परंपरा चालते.

विद्यार्थी परावलंबी झाल्याकारणानें आकुंचित बुद्धीचे, अशक्त व कर्तव्य-हीन निपजतात. मनोदौर्बल्यानें सद्गुण टिकत नाहींत. व मनुष्य व्यसनासक्त व भित्रा होतो. पुराणांतील प्रत्येक व्यक्ति शूर असलेली आढळते. दृढनिश्चयाचें

बाळकडू प्रत्येकास मिळे. बळकट शरीराचा व निश्चयी मनाचा मनुष्य हवें तें करूं शकेल! पण आतां हीं दोन्हीही दिसत नाहींत. स्त्रियांना तर बोलून चालून अबला व भीरूच ठरविलें आहे. त्यांचे हातून तर कांहींच होणें नाहीं.

सर्व स्त्रिया पूर्वी सुशिक्षित असतसें वाटतें. कारण त्या राजकारणांत-सुद्धां आपआपला भाग घेत असत. नवऱ्याला योग्य मार्ग दर्शविणें, त्याला उत्तेजन देणें, स्वकर्तव्यास उद्युक्त करणें, संकटकालीं त्याचे बरोबर राहून त्यांतून पार पडण्यास युक्ति सुचविणें, व मदत करणें इत्यादि जबाबदारीचीं व चातुर्याचीं कामें शिक्षणावांचून कशीं होतील? कांहीं गुण, अत्यंत प्रज्वलित असा, अंगीं असल्याशिवाय इतिहासांत नांव रहात नाहीं, व अशा तऱ्हेनें नांव मिळविणें प्रत्येकास शक्य नाहीं ही गोष्ट खरी, पण ज्यावेळीं चांगला कित्ता आपले डोळ्यां-समोर असेल, त्याचवेळीं आपलें अक्षर सुधारेल. आपण आपलें ध्येय उच्च-दर्जाचें ठेवल्यावांचून मनुष्याची प्रगति होणार नाहीं.

प्रस्तुत कालीं स्त्रियांना लिहितां वाचतां येत नसल्यानें पुराणश्रवणानेंच त्यांस संतुष्ट रहावें लागतें. पुराणिक शिकलेले नसल्यानें त्यांना पुराणांतील रहस्य श्रोत्यांना सांगतां येत नाहीं. नुसता शब्दार्थ श्रवण करून बोध होत नाहीं. त्या अर्थाचें विवरण झालें पाहिजे. तें तसें होत नाहीं, ह्मणून बायका कापूस पिंजीत किंवा वाती करीत बसतात. पुराणश्रवणाचें काम बहुतकरून विधवा व ह्मातान्या बायकांनीं पतकरलें आहे. त्यांना पुढें संतति होणें नसल्यानें इहलो-कींचें कर्तव्य संपलेंच असतें व ह्मणून त्या असा परमार्थ साधतात व क्षुल्लक असा स्वार्थही ( वाती वगैरेंचा ) करितात. त्यांपासून त्यांना जर उपयोग होत असेल तर तो ईश्वराला त्यांच्या अज्ञानाची कींव येऊन त्याच्या कृपेनेंच होत असला पाहिजे. जगाला व देशाला त्यांच्यापासून कांहींच फायदा नाहीं. पुराणश्रवणाचें-विशेषतः वाचनाचें व मननाचें-काम तरुण व विवाहित स्त्रियांनींच केलें पाहिजे ह्मणजे भावी संततींत ते सद्गुण उतरून त्या कुलाचा, त्या देशाचा व पर्यायानें सर्व जगाचा फायदा होईल. नाटकें, कादंबऱ्या, गोष्टी वगैरे वाचण्यापेक्षां जर माझ्या भगिनींना पुराणग्रंथवाचनाचा नाद लागेल व पुराणांतील तत्त्वें जर त्या आपले संततीवर बिंबवितील तर देशाचें किती तरी कल्याण होईल! ज्ञानवान् ऋषींनीं आपलें सामर्थ्य पुराणांत सांठविलें आहे. त्यांच्या व परमेश्वराच्या कृपेनें

तुह्मांला ऊर्जित दशा प्राप्त होईलच होईल. तुमच्या पुराणांची हेळसांड करूं नका. त्या भाकडकथा नाहींत. त्यांमध्यें पूर्णत्वास पोंचलेलीं तत्त्वज्ञानें सांगितलीं आहेत. तीं तत्त्वें शोधून काढून त्यांचा अभ्यास करा व आपले मुलाबाळांना, इष्टमित्रांना शिकवा अशी तुह्मांला नम्रपणें प्रार्थना करून मी आपलें भाषण संपवितें."(टाळ्या)

रा. रा. शंकरराव यांना शि. सा. नमस्कार. त्यांना पुराणें फार आवडतात ह्मणें ! पण हें नवें भाषण त्यांना आवडेल काय ? कोणाला ठाऊक त्यांना काय आवडतें व काय नाहीं ! सांगितलेंच नाहीं तर माणसानें काय समजावें ?

आपला बंधु,

शंकर.

पत्र १५ वें

## श्री. सौ. श्रद्धाबाई यांचें व्याख्यान.

### भक्ति व ज्ञान.

अलेक्झांड्रिया. श्री. ता. ५-११-१५

चि. सौ. कृष्णाबाई यांस.

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. मी येथें सुखरूप आहें. श्री. सौ. सरस्वतीबाईचें पुराण संपतांच श्री. सौ. श्रद्धाबाई पुढें आल्या. त्या तयारच होत्यासें दिसतें. त्यांचें वय पन्नाशीजवळ असावें. अंगलट सडपातळ, साधारण उंच होती. त्यांनीं शुभ्र वस्त्र परिधान केलें होतें. चेहरा गंभीर, कपाळ उंच, व दृष्टि स्थिर होती. पायात खडावा होत्या. दागिने नव्हतेच ह्मटलें तरी चालेल. पाहतांच त्यांचेविषयीं आदर व पूज्यबुद्धि उत्पन्न व्हावी अशीच त्यांची चर्या होती. अंगावरील शालजोडी डाव्या हातांत घेऊन त्यांनीं सर्वत्रांस मस्तक वांकवून नमन केलें व ह्मणाल्याः—

" प्रणतार्तिहरं देवं सच्चिदानंदरूपिणम् ॥
नमामि भाषणारंभे सद्गुरुं ज्ञानभास्करम् ॥ १ ॥ *

* " शरणागताचें दुःख हरण करणारे, ज्ञानाचे तेजस्वी रविच कीं काय असे भासणारे, सच्चिदानंदरूपी प्रभु जे सद्गुरु त्यांस माझ्या भाषणारंभीं मी प्रणाम करितें."

अध्यक्ष व भगिनीजनहो ! जडजीवांचे तारक व ब्रह्मपददाते श्रीसद्गुरु-महाराजांच्या ॐकार स्वरूपाचें अनन्यभावें स्मरण करून मी भाषणास सुरवात करितें. कारण चारी वाणींचा उगम तेथूनच आहे. आतांपर्यंत आपण विविध विज्ञानपरिपूर्ण पुष्कळ भाषणें ऐकिलीं व तीं आपणांला फारच हितकर असून संसारयात्रा सुखकर करतील. पण या सर्व विज्ञानाला आधारभूत अशी एक विद्या आहे. तिला अध्यात्मविद्या म्हणतात.

**'मोक्षे धीर्ज्ञानमन्यत्र विज्ञानं शिल्पशास्त्रयोः ।'** [१] असें अमरकोश सांगतो. आत्म्याविषयीं ज्ञान करून देऊन मोक्ष देणारी जी विद्या ती अध्यात्म-विद्या होय. तिच्या अभ्यासाअभ्यासानें ज्ञान प्राप्त होतें. तें ज्ञान मिळविणें हें प्राणिमात्रांचें आद्य कर्तव्य ठरतें. आपण कोण, आपलें स्वरूप कोणतें हें समजल्यावांचून आपण केलेले व्यवहार बरोबर होतील कां ? आत्मविद्येचा पाया बळकट बांधल्यावर मग त्यावर वाटेल तशा इमारती बांधून त्या टिकाऊ करतां येतील. पण आतां जिकडेतिकडे उलट व्यवहार चालल्यानें फार नुकसान होत आहे. आत्मविद्येला मान ज्यावेळीं होता, त्यावेळीं हिंदुस्थान देश वैभवशिखरीं होता, पण आतां तिचा अनादर झाल्यानें आपला देश बुडत चालला आहे !

**चिंचेच्या पानावर देउळ रचिलें, आधिं कळस मग पाया रे !**
**पुजूं गेलें तों देउळ उडालें, परियेसि सद्गुरुराया रे ! ।**

नाना प्रकारच्या विद्या आपण आधीं शिकतों व ह्मातारपणीं पेन्शन् घेतल्यावर किंवा मुलें, सुना कर्त्या झाल्यावर वेदांतविषयाकडे वळतों. जरा त्या विषयांत गति होते न होते तोंच मृत्युरूपी झंझावातानें देहरूपी देऊळ उडून जातें. झालें ! **'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ।'** [२] शरीर धडधाकट असेल तर कांहीं साधतां येईल. करून करून भागल्यावर देवपूजेस लागून काय होणार ? कोणतीही विद्या कष्ट केल्यावर कालांतरानेंच येते. अध्यात्मविद्या शिकण्यास तर बराच वेळ लागतो. कारण विज्ञानाचीं पुटें मनावर बसलेलीं

---

१ " मोक्ष संपादनाच्या शास्त्रास ' ज्ञान ' ह्मणतात, व ' विज्ञान ' ह्मणजे शिल्प व इतर शास्त्रें होत."

२ कुमारसंभव सर्ग ५ श्लो. ३३ " खरोखर, शरीर हेंच धर्माचें मुख्य साधन होय."

असतात, तीं काढून ज्ञानाचीं चढवावीं लागतात. ह्मणून लहानपणापासूनच हें ज्ञान शिकविण्यास सुरवात केली पाहिजे.

आपण शिकतों कशाकरितां? किंबहुना कोणतेही व्यवहार कां करतों? सुखाकरितां. सुखाव्यतिरिक्त दुसरा हेतुच नाहीं. पण आपले व जगाचे अनुभव सांगतात कीं, मिळविण्याकरितां जितके कष्ट पडतात त्यापेक्षां सुखाचें उत्पन्न पुष्कळ कमी होतें व भेसळ निपजतें. अशानें आपला बुडित व्यापार चालला आहे. आपल्या प्रयत्नांची दिशा चुकते. खरें सुख ज्यांनीं अखंड उपभोगिलें आहे, त्या साधुसंतांनीं योग्य मार्ग दाखवून दिला आहे. त्या मार्गानें जाणारे सर्व सुखी झाले व होत आहेत.

मग सर्व याच मार्गानें कां जात नाहींत? कारण मनाचा चंचलपणा. तत्काळ सुख देणारें असेल–मग तें सुख अति अल्प कां असेना?–तेंच मनाला आवडतें. इतकें मन सुखाकरितां हपापलें आहे. अरेरे! बा! मना! जर तूं बाहेर सुख हुडकण्याऐवजीं तुजजवळच पाहशील तर तूं सुखरूपच आहेस. 'तुझें आहे तुजपाशीं, परि तूं जागा चुकलासी।' जरा स्वस्थ हो. विचार-तरंग जरा काढून टाकून निश्चल रहा, ह्मणजे सुखसूर्याचें प्रतिबिंब तुजमध्यें स्थिरावेल व नंतर प्रतिबिंबावरून बिंबाकडे पहा व मग तें तुला लवकरच सांपडेल. सुख तुझ्या इतकें जवळ असतांना काय रे तुझी ही दशा!

पण मन ऐकेल? छे! नांव कशाला! एक पळभर तरी शांत राहील तर तें मनच नव्हे! मन शांत झाल्याशिवाय सुखानुभव यावयाचा नाहीं. मग हें होणार कसें? श्रीकृष्णांनीं याला उपाय सांगितला आहे. ते ह्मणतात,

'असंशयं महाबाहो! मनो दुर्निग्रहं चलम्।
अभ्यासेन तु कौन्तेय! वैराग्येण च गृह्यते ॥ १ ॥' *

विषय भोगून मनाला तृप्ति कधींच होणार नाहीं. ययाति राजानें दहा हजार वर्षे राज्योपभोग घेतला पण तृप्ति झाली नाहीं. शेवटीं त्यानें वैराग्य धारण केलें.

---

* श्रीमद्भगवद्गीता अ. ६ श्लो. ३५ "हे महाबाहो अर्जुना! मन हें चंचल असून त्याला आवरणें अति कठिण आहे यांत संशय नाहीं; तथापि तेंहो हे पार्था! अभ्यासानें व वैराग्यानें स्वाधीन ठेवतां येतें."

आज्य इंधन घालून अग्नि कसा विझेल ? विषयांचा त्याग करूनच मन आवरलें पाहिजे. विषयांतून मन काढून अभ्यासाकडे लावावें.

एक अत्यंत दरिद्री मनुष्य एका योग्याकडे गेला व प्रार्थना करून ह्मणाला, ‘महाराज! मी माझ्या हीनदीन स्थितीस कंटाळलों आहें. कृपा करून मला एखादी सिद्धि द्या, कीं जेणेंकरून मी सुखी होईन.’ योग्यानें त्याला एक पिशाच देऊन सांगितलें, ‘हें पिशाच तूं सांगशील तें करील. पण त्याला रिकामें ठेवशील तर तें तुला खाऊन टाकील.’ मनुष्य ह्मणाला, ‘बरें, कामें काय ? पाहिजे तितकीं देतों.’ त्यानें पिशाचास सांगितलें, ‘मजकरितां एक सुंदर रमणीय बंगला तयार कर.’ पिशाच गेलें व एक मिनिटांत परत येऊन ह्मणालें, ‘हं. झाला. पुढें ?’ मनुष्याला आश्चर्य वाटलें व इतकीं जलद कामें होतात ह्मणून आनंद झाला. त्यानें सांगितलें, ‘सभोंवतीं बागबगीचा ?’ ‘हं, झाला.’ ‘बंगल्यांत टेबलखुर्च्या, पलंग वगैरे सुखाच्या सोयी ?’ ‘हं, तयार !’ ‘दासदासी ?’ ‘हं, झाल्या !’ ‘अपार संपत्ति ?’ ‘हं, ठेवली.’ ‘मनोरंजक पुस्तकें ?’ ‘हं, आणलीं.’ ‘निरनिराळे खेळ ?’ ‘हं, आहेत.’ ‘उत्तम खाद्यपेयें ?’ ‘हं, हीं घ्या. पुढें ?’ ‘सुंदर चित्रें ?’ ‘हं, हीं पहा. पुढें ? काम सांगा नाहींतर खातों !’ ‘गाडी, घोडे, रथ, मोटार ?’ ‘हं, तयार !’ अर्ध्या तासाचे आंत सर्व इच्छा पूर्ण झाल्या. पण पिशाचाला काम नसलें तर तें खाणार! काय काम सांगणार ? मोठ्या काळजींत पडला. पिशाचास ह्मणाला, ‘मला योगी महाराजांकडे घेऊन चल !’ पिशाचानें तत्काळ तेथें नेलें. तो ह्मणाला, ‘महाराज ! मला वांचवा. हें पिशाच मला आवरत नाहीं’ ‘कां ? तुझ्या इच्छा तृप्त झाल्या ?’ ‘होय, महाराज ! पण भोगायला वेळ नाहीं. हें भूत आ करून उभें आहे ! याला आतां काय काम सांगू ?’ योग्यानें कानांत युक्ति सांगितली. परत आला व पिशाचास ह्मणाला, माझे आंगणांत एक उंच खांब रोंव व त्यावरून चढ, उतर असें मी तुला दुसरें काम सांगेपर्यंत करीत रहा !’ पिशाच तसें करूं लागतांच याला फुरसत मिळून हा संपत्तीचा उपभोग घेऊं लागला व रात्रीं झोंपही चांगली लागली. सकाळीं उठून पाहतो तों पिशाच खांबाखालीं मरून पडलें होतें. चढउतारानें कंटाळून मेलें !

मनरूपीं पिशाचाला नवीन नवीन विषय देऊन तृप्ति होणारच नाहीं. तें

तुम्हांला जास्त छळील. त्याला प्राणायामरूपी खांबावर चढउतरण्यास लावा. म्हणजे तुम्ही सुखी व्हाल. प्राणायाम कसा करावा, हें सद्गुरु तुम्हांला सांगतील. मन तुमच्या ताब्यांत आलें, कीं सर्व विद्या सोप्या झाल्या. आध्यात्मविद्येला मनोनिग्रह प्रथम पाहिजे.

मनाचा चंचळपणा नाहींसा करून आत्मोन्नतीला दुसरा उपाय ईश्वर-भक्ति हा आहे. हाच सर्वांत सोपा आहे. परमेश्वराच्या सगुणरूपाची भक्ति प्रथम करावी. मग निर्गुणाचें ज्ञान होतें. भक्ति नवविधा आहे. पण स्मरणभक्ति सुलभ आहे. 'ठायींच बैसोनी करा एकचित्त। आवडी अनंत आळवावा॥' शांतपणें सुखासनावर बसून तुह्मांला सुचतील त्या शब्दांनीं परमेश्वराची प्रार्थना करा. सप्रेम अंतःकरणानें त्याला आळवा. त्याची क्षमा मागा. करुणा भाका. हितगुज सांगा. व नम्रपणें त्याचें पूजन व स्तुति करून आत्मोद्धाराची याचना करा. या वेळीं जर तुमचा कंठ सद्गदित झाला नाहीं, तुमचें अंग रोमांचित झालें नाहीं, नेत्रांतून प्रेमाश्रु वाहिले नाहींत, मन शांत, निरभिमान, व निर्विकार झालें नाहीं तर माझें नांव श्रद्धाच नव्हे! रोज सकाळीं उठल्याबरोबर व रात्रीं निजण्यापूर्वीं नियमानें ईश्वराची प्रार्थना करा. निरंतर नामस्मरण चालू दे. त्याच्या कथा, कीर्तनें ऐका. त्याच्या विभूतींचें दर्शन घेऊन वंदन करा. 'रामराम बोला वाणी, मन लावा राघवचरणीं।' पण काय हो? आह्मी जर ईश्वरभक्तीचे मार्गे लागलों तर आमचें काम कोण करील? आमचें काय होईल? काय होईल? कल्याण होईल! दुसरें काय होणार? आतां कामकाज, अन्नवस्त्रवगैरेंबद्दल तुह्मांला नको काळजी. भगवान् श्रीकृष्ण ह्मणतातः—

अनन्याश्चिंतयन्तो मां ये जनाः पर्युपासते॥
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥ १॥ *

याहून मोठी गॅरंटी (guarantee—हमी) तुह्मांला कोणती पाहिजे? या त्यांच्या वचनाप्रमाणें भगवंत वागले आहेत कीं नाहींत याबद्दल कोणत्याही साधुपरुषाला विचारा. तो साक्ष देईल. मग तुमची तयारी आहे काय?

---

* श्रीमद्भगवद्गीता, अ. ९ श्लो. २२ "जे लोक अनन्यभावें चिंतन करून मला भजतात, त्या नित्य योगयुक्त पुरुषांचा योगक्षेम मी चालवितों"

आजपासून त्या मार्गाला लागा. माझ्या मागून या, मी तुह्मांला तुमचें ध्येय दाखवीन. 'यो यच्छ्रद्धः स एव सः।'[1] 'श्रद्धावांल्लभते ज्ञानम् ॥'[2] अध्यात्मविद्येंत शाब्दिक व साक्षात्कारिक असे दोन भाग आहेत. त्यांपैकीं दुसराच श्रेष्ठ आहे. शाब्दिक ज्ञानानें तुमची कीर्ति होईल व पोट भरेल, शिष्य मिळतील. तुह्मांला प्रत्यक्ष तो आनंद अनुभवल्याशिवाय काय फायदा? साखरेचीं वर्णनें वाचून तोंड थोडेंच गोड होणार! साक्षात्कारापासून खरा आनंद प्राप्त होणार आहे. श्रवण, मनन व निदिध्यास या साक्षात्काराच्या पायऱ्या आहेत. ईश्वराच्या गुणानुवादाच्या श्रवणानें भक्ति जडते. वारंवार श्रवणानें मनन होतें. नेहमीं मनन करणें हाच निदिध्यास. निदिध्यासानंतर साक्षात्कार होऊन तुह्मी कृतार्थ व्हाल. मोरोपंत ह्मणतात:—

गलिताहंकृति जाणे बंधा मोक्षासि, अनुभवीं चढला ॥
तो पण्डित; इतर नव्हे, जरि पुष्कळ शास्त्र सर्वही पढला ॥१॥ [3]

अनुभवीं चढावयास पाहिजे. अनन्यभावें ईश्वरभक्ति केल्यानें अनुभव येईल.

स्त्रियांचें मन निसर्गत:च कोमल असल्यामुळें श्रद्धा व भक्ति यांचें बीज त्यांत चांगलें रुजतें. पुरुषांपेक्षां स्त्रियाच धर्मपरायण विशेष असतात. त्यांचे अंत:करणांत प्रेमाचा झरा निरंतर आहे. त्या प्रेमाचा ओघ त्यांनीं ईश्वराकडे लाविला तर त्यांना साक्षात्कार लवकर होईल. परमेश्वरा! स्त्रियांना तूं कृपेनें इतकी सामुग्री दिली आहेस. जमीन तयार आहे. त्यांत भक्तीचें बीजारोपण तूं करशील कां?

साधुसमागम घडेल तेव्हां भक्तीचा मार्ग सोपा होईल. प्रत्यक्ष सहवास होण्यासारखा नसेल तेथें त्यांचे ग्रंथ वाचावेत. जसजशी भक्ति वाढत जाईल तसतशी तुह्मांला नवी गोडी मिळत जाईल. आपण तरून दुसऱ्यास तारल्यावर आणि तुह्मांला करावयाचें उरलें काय? आत्मज्ञान प्राप्त करून घेणें हें पहिलें कर्तव्य आहे. तें कर्तव्य आपण चुकतां कामा नये.

---

१ श्रीमद्भगवद्गीता अ. १७ श्लो. ३ "ज्याची ज्यावर दृढश्रद्धा असते, तो तद्रूपच होतो."

२ श्रीमद्भगवद्गीता अ. ४ श्लो. ३९ "श्रद्धावान् पुरुषाला हें ज्ञान मिळतें."

३ मोरोपंत, मंत्रभागवत एकादशस्कंध ४००वी गीति.

शेवटीं माझ्या भगिनींच्या मनांत ईश्वरभक्तीची प्रेरणा कर अशी परमेश्वराची प्रार्थना करून व आपले आभार मानून मी भाषण संपवितें. पण

कैवल्याब्धेः सद्गुरोः पादपद्मे
तीर्थस्थाने सन्ततं मे शिरोऽस्तु ॥
पादोद्भूता दुर्लभाः पूतमुख्या
दासीमेनां रेणवः पावयन्तु ॥ १ ॥ *

असें ह्मटल्यावांचून रहावत नाहीं." (टाळ्या.) हें भाषण ऐकून मी तर गहिंवरून गेलों. तुह्मांस कसें वाटतें?

आपला बंधु,
शं. चिं. श्रीखंडे.

---

## पत्र १६ वें.

## सभेंत माझें भाषण.

### माझा अभिप्राय.



अलेक्झांड्रिया. श्री. ता. १५-११-१९१५

चि. श्री. सौ. कृष्णाबाई यांसः—

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. मी येथें सुखरूप आहें. माझ्या स्वप्नवर्णनापैकीं थोडा भाग शिल्लक आहे तो आतां संपवितोंः—

श्री. सौ. श्रद्धाबाईचे भाषणानंतर किंचित्काल सर्वत्र स्तब्धता होती. ईश्वरभक्ति करावी असें प्रत्येकास वाटलें. व आपआपल्या आवडत्या मूर्तीचें ध्यान प्रत्येकजण करूं लागला. थोड्याच वेळांत चित्त ध्यानांतून निघून बाहेर सभेंत फिरूं लागलें. त्या सभेंत मी विजातीय असल्यामुळें तो चित्तप्रवाह दृष्टिरूपानें मजकडे येऊं लागला. एवढ्या प्रचंड ओघास थांबविण्याचें किंवा

---

* "कैवल्यसागर अशा सद्गुरूंच्या पवित्र पदकमलीं माझें मस्तक असो. त्या चरणांपासून उत्पन्न झालेले अत्यंत पवित्र व दुर्लभ असे रजःकण मला—या दासीला—पावन करोत."

सहन करण्याचें सामर्थ्य मजमध्यें नव्हतें. मी थरथर कांपूं लागलों. इतक्यांत अध्यक्षांनीं, 'आपले चार शब्द ऐकावेत अशी सभेची इच्छा आहे. ती आपण कृपा करून पूर्ण कराल अशी आशा आहे.' असें मला ह्मटलें. माझी भीति पार पळाली. भाषणाचा सन्मान मला दिल्याबद्दल आनंद झाला. मी टेबला-जवळ आलों. सर्वत्रांचे डोळे मजकडे लागले होतेच; तेही मजबरोबर आले.

मी आदमासें तीस वर्षांचा, मध्यम उंचीचा व मध्यम अंगलटीचा होतों. वर्ण काळासांवळा ( माझ्यानें मला भरपूर काळा ह्मणवत नाहीं ) होता. पोषाख लष्करी, पण बाणा लष्करी नव्हता. कपाळ रुंद होतें. चेहऱ्यावरून आंत काय आहे तें समजण्यासारखें नव्हतें. दृष्टि शांत होती. अत्यंत आनंदानें फुललेल्या मुखानें मी ह्मणालों:—

"अध्यक्ष आणि आर्यवसुंधरादेवीचे सचेतन अलंकारच कीं काय अशा गृहिणीहो ! हा अत्यंत आश्चर्यकारक देखावा अवलोकन करून कोण थक्क होणार नाहीं ! व कोणाचें हृदय आनंदानें ओसंडत नसेल ? अगदीं चकित होऊन गेल्याकारणानें कोणती व्यक्ति स्वतंत्र वचनें वदूं शकेल ? असले अवर्णनीय काल ज्यांच्या जीवनचरित्रांत वारंवार येत असतील ते नर खरोखर धन्य होत ! निर-निराळ्या विषयांवर झालेलीं हीं वचनरत्नें हृदयकोंदणांत जशींच्या तशींच घट्ट जोडून ठेवण्यासारखीं आहेत. त्यांचें यथार्थ वर्णन करणें कोणालाही अशक्य आहे. त्यांत सुधारणा करण्याची किंवा त्यांची संख्या वाढविण्याची शक्ति या देहांत नाहीं.

( हा वेळ पर्यंत आनन्दातिरेकानें ओष्ठ * मिटणें अशक्य झाल्यानें पव-र्गांतील व्यंजनें नसलेल्या शब्दांनींच माझे विचार मला बोलण्यासारख्या कामाची जबाबदारी पुढें उभी राहिली. तेव्हां आनंद मागें फिरला व विचार पुढें सरकला. मग मी ह्मणालों:—) आपण मला या सभेंत भाषण करण्याचा जो मान दिला त्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहें. आपल्यापासून मी आज पुष्कळ गोष्टी

* अशा प्रकारची सहेतुक निरोष्ठवर्णयोजना संस्कृत वाङ्मयांत महाकविदण्डीच्या दशकुमारचरितांत एके ठिकाणीं ( ७ वा उच्छ्वास ) असून मराठीमध्यें महाराष्ट्रकविश्रेष्ठ मोरोपंत यांच्या अष्टोत्तरशत रामायणांपैकीं 'निरोष्ठरामायण' नामक एका ६५ आर्यांच्या रामायणांत तर सर्वोत्कृष्टपणें आढळून येते. —रा. चिं. श्री.

शिकलों आहे. व त्यांचा मी माझे आयुष्यक्रमांत उपयोग करीन. सर्व विषय अत्यंत उपयुक्त असल्यानें हीं व्याख्यानें नेहमीं कामीं पडण्यासारखीं झालीं आहेत. प्रत्येक विषय सांगोपांग कथन केला नाहीं व विवेचन पूर्ण झालें नाहीं तथापि त्या त्या विषयाची बरीच माहिती दिलेली आहे. व्याख्यान हें केव्हांही त्या विषयावरील पुस्तकाच्या तोडीचें होणार नाहीं, ही गोष्ट खरी आहे.

वास्तविक मी पाहुणा आहें. माझा नेमलेला विषय नाहीं; ह्मणून मी तुमचीं भाषणें पुरुषांना कशी वाटतील तें सांगतों. मला टीका करण्याचा हक्क नाहीं. तथापि विरुद्ध बाजूनेंही तोच पदार्थ कसा दिसतो हें पाहणें केव्हां केव्हां मनोरंजक असतें. माझें भाषण तुह्मांस रुचेल अशी आशा आहे.

प्रत्येक वक्त्यानें आपआपल्या विषयाच्या समर्थनाकरितां त्या त्या विषयाकडे दुर्लक्ष हेंच आमच्या देशाच्या अवनतीचें कारण दिलें आहे. आमचा देश निकृष्ट दशेस आला, ह्मणून प्रत्येक दोषाचें खापर त्याचे माथीं मारावें काय? स्त्रीशिक्षणाचा अभाव, शेतकऱ्याची दुःस्थिति, शरीरसामर्थ्याकडे दुर्लक्ष, मुलांच्या शिक्षणाची हेळसांड, बालविवाह, पुराणांवर अश्रद्धा वगैरे प्रत्येक किंवा सगळीं हींच कां अवनतीचीं कारणें! कां हे परिणाम आहेत? खरी अवनतीची मीमांसा यांनीं होत नाहीं.

एका घरांत पाणी मुरत असल्यामुळें ओल होती. मुलाबाळांना त्यायोगें थंडी बाधून ताप येई. शेजारच्या बाईनें सांगितलें कीं, एकवीरा देवीचा अंगारा लावून चार ब्राह्मण सुवासिनी जेवायला घाला ह्मणजे बरें वाटेल; घरच्या मालकिणीनें तसें केलें नाहीं. पुढें थोडे दिवसांनीं भिंतीच्या पायांत पाणी मुरून भिंत पडली. मग ती शेजारीण ह्मणाली, "बघा! मीं तुह्मांला सांगितलें नव्हतें अंगारा लावा व ब्राह्मणभोजन घाला ह्मणून? तसे केलें नाहींत ह्मणून भिंत पडली. ईश्वराची कृपा ह्मणून तुह्मी वांचलांत. आता तरी करा मीं सांगितलें तसें!" कारणमीमांसा कार्यावरून व इतिहासावरून काढावी लागते.

स्त्रियांना शिक्षण अवश्य आहे. लिहितां वाचतां तर आलेंच पाहिजे. मी सध्यां परदेशांत आहें. माझ्या पत्नीचीं पत्रें जर मला आलीं नसतीं व मी पाठविलेलीं पत्रें जर तिला वाचतां न येतील तर माझी काय अवस्था होईल? माझ्या मनाला आधार कोणता!

वैद्यकशास्त्र व नर्सिंग हीं सुद्धां स्त्रियांना आवश्यक आहेत. माझी बहीण शिकून मास्तरीण झाली आहे. तिचे पतिराज एकदां पोटदुखीनें आजारी असतां तिला काय वाटलें, तें तिनें पत्रांतून मला कळविलें, 'अशावेळीं मी मास्तरिणीचें काम शिकलें त्यापेक्षां डॉक्टरिणीचें शिकलें असतें तर बरें झालें असतें, असें वाटतें. ज्याप्रमाणें वाचतां येत नसलें ह्मणजे डोळे असून आंधळ्यासारखी स्थिति असते, तशीच माझी अवस्था होते. साधारण रोगांची परीक्षा करतां यावी त्यावर उपाय काय करावा, औषध काय द्यावें हें माहीत असावें. पित्त, अजीर्ण, ज्वर, आमांश, हगवण वगैरे आजारांचीं औषधें नेहमीं जवळ असावींत व त्यांचा योग्यवेळीं उपयोग करतां यावा, हें अगदीं अवश्य आहे असें मला वाटतें.' तुमच्यापैकींच एकीचे हे विचार आहेत.

स्त्रियांनीं इतर गोष्टी शिकल्या तर पुरुषांस वाईट वाटणार नाहीं. पण स्त्रियांनीं, पुरुष करतात मग आह्मीं कां करूं नये, अशा स्पर्धेनें शिकणें चांगलें नव्हे. विद्येचा सदुपयोग करण्याकरितां विद्या शिकावयाची. शिकलेले विचार आचरणांत आले पाहिजेत. तुमच्या शिक्षणानें जर पुरुषास मदत होत असेल तर शिका.

स्त्रियांची सभा ह्मणजे बहुतकरून स्वयंपाकघरांतील गोष्टी ऐकावयास मिळतीलसें मला वाटलें. पेढ्यांची भाजी, लोण्याचीं भजीं, चिंचोक्याची उसळ, लाडवांचा चिवडा, बत्ताशांची चटणी किंवा असलींच विचित्र व निरुपयोगी पक्वान्नें कुशलपणें कशीं करावींत हें समजेलसें वाटलें, पण माझा समज पार चुकला. त्याचप्रमाणें अमकी अशी चालते, तमकी हेंच करिते, अमक्याच्या सुनेनें असें केलें, तमकीचा नवरा बायकोला धमक्याच देतो, इत्यादि कथाही ऐकावयास मिळाल्या नाहींत. दागिन्यासाठीं हट्ट कसा करावा, नाटकास जाण्यासाठीं धुसफुस कशी करावी, दुसरीस टोमणे कसे मारावे, प्रसंगीं डोळ्यांतून पाणी कसें काढावें, नवें लुगडें कसें मिळवावें, नखरा कसा करावा, हेंही कोणीं सांगितलें नाहीं. मी अजीबात फसलों! मोठमोठ्या गहन विषयांवरील हीं भाषणें ऐकून हिंदुस्थानचा ऊर्जितकाळ जवळ आला आहेसें दिसतें. निदान नष्टचर्य तरी संपलें खास! खरोखर अशा सद्गुणी स्त्रियांचे सहवासांत जे पुरुष काल घालवीत असतील ते धन्य होत. त्यांची संसारयात्रा निःसंशय सुखमय झालीच पाहिजे!

आपण माझें भाषण शांतपणें श्रवण केल्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहें. परमेश्वरा! माझे सर्व भगिनींस शिक्षणसंपादनाची स्फूर्ति दे, एवढेंच तुजपाशीं मागणें आहे. शेवटीं,

एतादृशः प्रियदृशः प्रभवन्ति यत्र
धन्यो ह्यसौ क्षितितलेऽनुपमः प्रदेशः ॥
दृष्टं मयाद्भुतमिदं कृपयैव यस्य
तस्मै नमो भगवते पुरुषोत्तमाय ॥ १ ॥ *

असें ह्मणून ईश्वरचरणांस वंदन करून मी आपली रजा घेतों." (टाळ्या.)

यानंतर अध्यक्षांचें भाषण झालें. तें विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं. पुढील पत्रीं तें सांगून ही लेखनमाला पुरी करणार आहें. इतक्या पत्रांची मिळून भोजनास योग्य निदान एक पत्रावळ तरी तयार झाल्यास मी आनंद मानीन. सर्व पत्रें वाचून आपला निकाल सांगावा. इतरांचीं मतेंही ग्राह्य आहेत. पण पत्रावळ आपणांकरितांच आहे! कळावें, हे आशीर्वाद.

आपला बंधु,
शंकर चिंतामण श्रीखंडे.

---

## पत्र १७ वें

# अध्यक्ष श्री. सौ. लक्ष्मीबाई यांचें भाषण.

## सुंदर समारोप.

अलेक्झांड्रिया. श्री. ता. २२-११-१९१५

चि. सौ. कृष्णाबाई यांसः—

अनेक आशीर्वाद, उपरी विशेष. श्रीकृपेनें मी येथें सुखरूप आहें. सभेचें वर्तमान असें:—

नंतर टाळ्यांच्या गजरांत श्री. सौ. लक्ष्मीबाई या बोलावयास उठल्या. अध्यक्षांचे भाषणाविषयीं सर्व मंडळी उत्सुक दिसली. त्यांचें वय अजमासें ३५

---

* अर्थ — अशा तऱ्हेच्या (सद्गुणसंपन्न) उत्तम स्त्रिया जेथें आहेत तो प्रदेश भूतलावर खरोखर निरुपम व धन्य होय! ज्याच्या कृपेनेंच केवळ मला हें अद्भुत दृश्य पहावयास लाभलें त्या पुरुषश्रेष्ठ भगवंतास माझा प्रणाम असो!

जवळ असावें; पण चेहरा तेजस्वी, भारदस्त, व सुंदर होता. पोषाख श्री. सौ. सरस्वतीबाईप्रमाणेंच असून अंगावर गुलाबी रंगाची शालजोडी होती. पण त्या पेहरावांत परदेशपणा नव्हता. कपाळ भव्य असून दृष्टि शांत पण तीक्ष्ण होती. अत्यंत सभ्यपणा, किंचित् खेळकरपणा, गूढ विनय, व चंचळपणा इत्यादिकांचें मिश्रण त्यांचे हालचालींत दिसें. प्रत्येक काम मनापासून, उत्साहानें, कळकळीनें करण्याबद्दल त्यांची ख्याति होती. त्या ह्मणाल्याः—

" आमचे विद्वान् पाहुणे, व सभाजनहो ! आतांपर्यंत ऐकलेल्या भाषणांनीं तुह्मांप्रमाणेंच मलाही अत्यंत आनंद झाला आहे. हीं भाषणें फारच हृदयंगम व बोधप्रद आहेत असें मीं ह्मटलें असतें तर कदाचित् पक्षपाताचें दिसलें असतें. पण ही अडचण आमच्या सन्मान्य पाहुण्यांनीं आपलें मत सांगून दूर केली. सर्व वक्त्यांचीं भाषणें उत्तम झाल्यामुळें या सभेचें अध्यक्षस्थान मला मिळाल्याचा मला मोठा अभिमान वाटतो. मी सर्वच वक्त्यांचें याबद्दल अभिनंदन करतें. ( टाळ्या. ) हिंदुस्थानांतील स्त्रियांत उत्तरोत्तर झपाट्यानें प्रगति होत जाणार यांत संशय नाहीं.

बायका दुसऱ्यांना टोमणे मारतात असें ध्वनित करून आमच्या चतुर पाहुण्यांनीं स्त्रिया स्वयंपाकघरांतील गोष्टीच बोलतात व इतरांच्या उखाळ्यापाखाळ्या काढतात अशा कुशलपणें टोमणा मारला आहे ! पूर्वी असें कदाचित् होत असेल. पण आतां तो काळ गेला. बायका स्वतःला सुधारण्याविषयीं आतां पुष्कळ प्रयत्न करीत आहेत व लवकरच कदाचित् त्या पुरुषांच्याही पुढें जातील. दृढनिश्चय हा हिंदुस्थानांतील स्त्रियांचा विशेष आहे. तसें नसतें तर बदललेल्या परिस्थितीबरोबर जसें पुरुषांनीं आपले स्वधर्मविचार टाकून दिले, तसेंच बायकांनींही केलें असतें; व मग आर्यधर्माचा ऱ्हास झाला असता. पण बायका स्वधर्मास चिकटून राहिल्यामुळेंच आज आपणांस सनातन धर्माची व आपले आचारविचारांची ओळख राहिली आहे. हाच दृढनिश्चयाचा जोरदार प्रवाह जर स्त्रिया स्वशिक्षणाकडे लावतील तर अत्यंत आश्चर्यकारक कामें करतील !

आज झालेल्या भाषणांचा समारोम मी आतां करणार आहें. श्री. सौ. रसनाबाईनीं वाणीचें महत्त्व उत्तमप्रकारें सांगितलें आहे. व तें लिपींत

आणि फोनोग्राफ्मध्यें सांठविण्यास योग्य आहे ! दुसऱ्याशीं कसें वागावें याबद्दल अनुभव श्री. सौ. अन्नपूर्णाबाईंच्यापेक्षां ज्यास्त कोणांस असणें शक्य नाहीं ! ह्मणून त्यांचे विचार फार महत्त्वाचे आहेत. व्यवहारचातुर्य व शिस्त या बाबतींत श्री. सौ. वेत्रिकाबाईंचा हातखंडा आहे. यांच्या भाषणाप्रमाणेंच स्त्रियांनीं वागणें इष्ट आहे. मिसेस् नवीबाई यांनीं हिंदुस्थानांतील पद्धतीस पाश्चिमात्य पेहराव कसा घालावा हें सांगितलें. पण हा तिला सर्वांगसुंदर शोभेल असें मला वाटत नाहीं. कांहीं भाग घेण्यासारखा आहे. येथील स्त्रियांत पुष्कळ सुधारणा झाल्याशिवाय असा पोषाख केल्यास तें विचित्र व हास्यास्पद होईल. श्री. सौ. लवंगीबाई यांनीं काटकसर कशी करावी तें सोदाहरण दाखविलें. प्रथम पैसा कसा मिळवावा हें सांगून नतर काटकसर कशी करावी हें सांगितलें असतें तर आमच्या श्री. सौ. सारजाबाईंना जास्त पटलें असतें व त्यांनीं शेतकऱ्याची स्थिति सुधारण्याचे प्रयत्न केले असते. तथापि, पैसा योग्य काटकसरीनें खर्चून बचावणें ह्मणजेच तितका पैसा मिळविणें आहे व अशा तऱ्हेनें पैसा मिळविण्याची हांव धरावी. शरीरसामर्थ्याचा हरप्रसंगीं उपयोग असल्यानें त्याचें रक्षण आपण सर्वप्रकारें केलें पाहिजे. या बाबतींत श्री. सौ. चांडिकाबाई या ‘ बोले, तैसा चाले ’ अशा असल्यानें त्यांचे मतांविरुद्ध वागण्याचें धाडस करून आपलें नुकसान कोणी करून घेणार नाहीं, अशी मला आशा आहे. श्री. सौ. यशोदाबाईंचे उद्गार मुलें असलेल्यांनीं आचरणांत व नसलेल्या पण इच्छिणाऱ्यांनींही ध्यानांत वागविण्यासारखे आहेत. मुलांच्या शिक्षणावर कुलाच्या उन्नतीची व कीर्तीची इमारत बांधावयाची असते. श्री. सौ. त्रिजटाबाईंनीं स्वच्छपणासंबंधानें सांगितलेले नियम सुधारून व आठवून आचरणांत आणले पाहिजेत ! स्वच्छपणावांचून जीवनयात्रा सुखकर होणें शक्य नाहीं. इतर संपत्ति शरीरसंपत्तीवर अवलंबून आहे. व पहिलीपेक्षा दुसरी श्रेष्ठ आहे असें श्री. सौ. भिमाबाईंनीं सांगितलें तें लक्षांत ठेवावें व श्री. सौ. अरुंधतीबाईंनीं सुचविल्याप्रमाणें युक्तीचा शक्य तितका उपयोग करून शरीरसंपत्तीच्या खर्चांत काटकसर करावी ह्मणजे त्या संपत्तीचा पुष्कळ दिवस उपभोग घेतां येईल. श्री. सौ. सरस्वतीबाईंनीं आमच्या पुराणांचें शास्त्रीय रीतीनें विवेचन केलें आहे. तें आपण श्रुतिपुटांत जपून ठेवावें. वारंवार पुराणें वाचल्यानें आपलें आचरण सुधारेल. व श्री. सौ. श्रद्धाबाईंनीं सांगितल्याप्रमाणें चित्तांत ईश्वरभक्तीचा उदय होईल. ईश्वरदर्शन घेऊन पुनीत

होणें व त्याच्या सच्चिदानंदस्वरूपांत लीन होणें हेंच आपलें कर्तव्य आहे. या करितां श्रद्धेचें जतन केलें पाहिजे.

आमच्या डॉक्टर पाहुण्यांनीं वैद्यकशास्त्र व नर्सिंग शिकणें स्त्रियांस आवश्यक आहे असें सांगून आपलें घोडें पुढें ढकललें आहे! हरकत नाहीं. आपण त्या घोड्यावर बसण्यास शिकून त्याचा योग्य उपयोग करून घेऊं या! स्त्रीरोगचिकित्सा, सुईणकाम, अर्भकव्याधिनिदान, रोग्याची शुश्रूषा व साधारण रोगांवरील औषधें व संकटग्रस्तास अनुरूप मदत करतां येणें स्त्रियांस अवश्य आहे यांत संशय नाहीं. हीं सर्व भाषणें कितीजरी उत्तम असलीं तरी सर्वच गोष्टी प्रत्येकास आवडतील असें नाहीं.

उदाहरणार्थ, मला न पटणारीं विधानेंच मी सांगतें. प्रथम, पुरुष करतात मग आह्मी कां करूं नये, हा युक्तिवाद ठीक नाहीं. पुरुष व स्त्री मिळून एक संपूर्ण मनुष्य होतो. प्रत्येक एक एकटा अपूर्ण जीव आहे. जीवाचे धर्म, उत्पन्न होणें, खाणें व पचविणें, नको असेल त्याचा त्याग करणें, वाढणें व क्रिया करणें, प्रजोत्पादन करणें व परंपरा चालविणें आणि क्षय पावणें किंवा मरणें हे आहेत. प्राणिशास्त्रवेत्ते तुह्मांला सांगतील कीं अगदीं सूक्ष्म जीव फक्त एक मांसग्रंथीसारखे असतात. ते मात्र स्वतंत्रपणें हे वर सांगितलेले धर्म पाळूं शकतात. जशी जशी बीजकोटींत उत्क्रान्ति होत गेली तसतसे स्त्री व पुरुष हे भेद निर्माण झाले. बाकीचे सर्व धर्म पाळतां आले तरी प्रजोत्पादन करून परंपरा राखणें हा धर्म परस्परावलंबी असल्यानें कोणाही एकट्या स्त्रीस किंवा पुरुषास स्वतंत्र जीव ह्मणतां येणार नाहीं. एकाच जीवाचे हे सुधारलेले व विशेष कार्यक्षम दोन भाग आहेत. ज्याप्रमाणें आपणास डावा व उजवा असे दोन हात आहेत, पण एकाच देहाला चिकटले आहेत त्याचप्रमाणें. याकरितां एकमेकांनीं एकमेकांचा हेवा किंवा स्पर्धा करण्याचें कारण नाहीं. स्त्रीला पुरुष जर आपली अर्धांगी ह्मणतो तर तिला अशिक्षित ठेवून आपण सुशिक्षित होणें ह्मणजे त्या दंपत्याची अर्धांगवायु झालेल्या मनुष्या-प्रमाणें शोचनीय व निरुपयोगी स्थिति नाहीं काय? पुरुष स्वतंत्र व कर्तृत्ववान् होण्यास तो चतुर्भुज असला पाहिजे. प्रकृतीशिवाय स्वतंत्रपणें व्यवहार करूं शकणारा जो परमपुरुष, त्याचे अवतार जे श्रीविष्णु किंवा श्रीकृष्ण, हे कां चतुर्भुज

आहेत तें यावरून तुमच्या ध्यानांत येईल. गजाननमहाराज सुद्धां चतुर्भुजच आहेत. ते तसे नसेत तर त्यांना कार्यपरंपरा निर्विघ्न राखतां आली नसती. दोनतीन वक्त्यांनीं बालविवाहाच्या चालीविरुद्ध आपलें मत प्रतिपादिलें आहे. पण बालविवाहच आपणांस हितकारक आहेत. आपल्या देशांतील वधूवरांच्या मनांत विवाहविधीबद्दल जो पूज्यभाव आढळतो, त्या विवाहबंधनाबद्दल प्रौढ किंवा प्रीतिविवाहप्रचुर पाश्चात्य वधूवरांचे मनांत त्या भावाचें पूज्य आढळतें. दोघेही शिकलेलीं व स्वतंत्र विचाराचीं माणसें! नवरा किंवा बायको म्हणजे आपल्या आवडीप्रमाणें निवडलेला बाजारांतील पदार्थ; त्याची काय पर्वा? आवडेनासा झाला, दिला टाकून, घ्या दुसरा. त्यांत काय? आणि जन्मभर एकालाच चिकटून राहण्याची पराधीनता कां? आतां हिंदुस्थानांत या. एक पंचवीस वर्षे वयाचा, उत्तम विद्यार्जन केलेला, स्वतंत्रपणें चार मनुष्यांचें कुटुंब चालवील अशा हिंमतीचा व सशक्त अशा तरुणानें आठ वर्षे वयाच्या मुलीशीं लग्न केलें. तिला आपल्या घरीं नेऊन शिक्षण देण्यास सुरवात केली. आपल्या मनाप्रमाणें तिला शिकवून आपले विचार तिच्या कोंवळ्या मनांत पूर्णपणें ठसविले. आपल्या इच्छेप्रमाणें तिच्या मनाची वाढ केली. मुलगीही हौसेनें व उत्साहानें शिकूं लागली. प्रत्यक्ष नवरा शिकवूं लागल्यावर कोणती बायको शिकणार नाहीं? याप्रमाणें बारा वर्षे अभ्यास करून तिनें नवऱ्याकडून 'गृहिणी सचिव: सखी मिथ: प्रियशिष्या कुशलानुवर्तिनी'* असें सर्टिफिकेट् मिळविलें. नंतर त्यानें तिजसह संसारसुखाचा उपभोग घेण्याला सुरवात केली. शिक्षणानें दोघांचीं मनें एक झाल्यामुळें त्यांनीं अखंडसुखाचा अनुभव घेतला. परस्परांची पूर्ण वाढ झालेली असल्यामुळें संतति जोरदार निपजली. मुलांना घरींच शिक्षण मिळूं लागलें. तोच क्रम त्यांनीं सुरू ठेवला. भगिनींनो! हें चित्र पहा आणि तें पाश्चिमात्य स्वतंत्रशिक्षणाचेंही चित्र पहा! तुम्हांला कोणतें आवडतें तें पसंत करा. बालविवाहाचा असा सदुपयोग करावयाचें सोडून ही चालच वाईट जर

---

* रघुवंश सर्ग ८ श्लोक ६७ पूर्वार्ध. यांत 'ललिते कलाविधौ' याऐवजीं 'कुशलानुवर्तिनी' असा येथें फरक केला आहे.

अर्थ—पतीची योग्य सल्लागार, एकान्तांतील लाडिवाळ सखी, कुशल व प्रिय शिष्या आणि सर्वथैव अनुसरणारी अशी उत्तम गृहिणी (तूं आहेस!)

ह्मणूं लागाल तर नाचायला येईना अंगण वांकडें किंवा स्वयंपाक चांगला करतां आला नाहीं तर ह्मणें लाकडें ओलींच होतीं, या सारखेंच नाहीं कां होत? तुमच्या पूर्वजांनीं बालविवाह ही तुह्मांला अमूल्य देणगी दिली आहे. तिचा जर तुह्मी फायदा करून घेतला नाहींत तर तो दोष त्यांचा नाहीं. आठ वर्षांच्या मुलीचें बारा वर्षांच्या मुलाशीं लग्न करण्यास तुह्मांला कोणीं सांगितलें? मुलीच्या वयाची अट बरोबर आहे, कारण नवऱ्यास आपल्या मनांतील संस्कार बायकोच्या मनावर उमटविण्याचे असतात. त्याकरितां मुलीचें वय अपक्वच पाहिजे. पण मुलग्याच्या वयाची अट शास्त्रांत नाहीं! मग तुह्मी स्वत: आड-मार्गानें जाऊन रस्ता वाईट दाखविला असें कां ह्मणतां? स्त्रीनें पुरुषाच्या मनाप्रमाणेंच वागलें पाहिजे. त्यांतच तिचें हित आहे. रुसून बसून नवें लुगडें किंवा दागिना कसा मिळवावा हें कोणत्याही स्त्रीस शिकवावयास लागत नाहीं. पण मग तुह्मीं शिक्षणरूपी दागिना कां मिळवत नाहीं? सोन्याचे दागिने तुह्मांला जड वाटतील, अडचण करतील; पण शिक्षणालंकार तुह्मांला मदत करील, आनंद देईल. वापरण्यानें दुसरे दागिने झिजतात, पण हा दागिना वाढेल. वापरण्यानें सोन्याची किंमत कमी होते पण शिक्षणाची वाढते. मग असा फायदेशीर दागिना तुह्मीं कां घेत नाहीं, ह्मणतें मी! असो. वेळ बराच झाला. आपल्या सहवासानें माझा पुष्कळ फायदा झाला आहे. याबद्दल मी सर्व वक्त्यांचे आभार मानतें. अशाच सभा वारंवार भरून स्त्रीजनसमूहांत शिक्षणाची व ज्ञानाची भर पडो अशी ईश्वरचरणीं प्रार्थना करून या सभेचें काम आतां सपलें असें आपणांस कळवून मी आपली रजा घेतें." [ टाळ्या. ]

नंतर श्री. सौ. रसनाबाई ह्मणाल्या, "अध्यक्ष, आमचे सध्यां परदेशवासी पाहुणे, व इतर वक्त्यांचे मी सर्व सभाजनांतर्फे आभार मानतें. आपले पतिराज आपली घरीं वाट पहात असतील. चला तर. आजचें सभावर्तमान त्यांना कळवून आपण त्यांचें घटकाभर मनोरंजन करूं या, व आमच्या सुधारणेकरितां त्यांची सहानुभूति मिळवूंया. आर्यभूमीचा जयजयकार असो!" ( मोठा जय-शब्द होतो. ) या शब्दानेंच मी जागा झालों. कळावें, हे आशीर्वाद.

आपला बंधु,

शंकर.

## २. श्रीविष्णुसहस्रनामस्तोत्रांतील कांहीं रम्य कल्पना.

( लेखक:—**डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे**, एम्. सी. पी. एस्. )

[ या स्तोत्रांत आढळलेल्या अभिनव कल्पनांसंबंधीं प्रथम उल्लेख ती. कै० डॉ० शंकर चिंतामण श्रीखंडे यांनीं ता. २७ मार्च १९१६ रोजीं अलेक्झांड्रियाहून लिहिलेल्या आपल्या एका पत्रांत केला असून, त्यावरूनच पुनः हा लेख कोल्हापुरच्या न्यू स्कूल त्रैमासिकामध्यें त्यांनीं लिहिला. मुळच्या पत्रांतही कांहीं उपयुक्त व रमणीय कल्पना असल्यानें, त्यांतीलही बहुतेक उपलब्ध भाग येथें टीपेंत* वाचकांस सादर केला आहे. —**रा. चिं. श्री.** ]

श्रीविष्णुसहस्रनामस्तोत्र हें महाभारतांतील अनुशासनपर्वांत भीष्म–युधिष्ठिर-संवादांतून निघालें आहे. पंचरत्नी गीतेंतील तें एक रत्न मानिलें आहे. भीष्माचार्यांसारखा ज्ञानवृद्ध व अनुभवी वक्ता व युधिष्ठिरासारखा शुद्धबुद्धीचा व श्रद्धावान् श्रोता असा अपूर्व योग त्यावेळीं जमल्यामुळें स्तोत्रसुद्धां पुष्कळ गुणांनीं अपूर्वच झालें आहे. विद्वान् पुरुष साधी गोष्ट सांगतांनाही उच्च तत्त्वें व उपदेश त्यांत गोंवतात हेंच त्यांच्या विद्वत्तेस साजणारें श्रेष्ठ भूषण आहे. छंदःशास्त्रकर्ता

---

* **श्रीविष्णुसहस्रनामांतील कांहीं वचनें.**

अलेक्झांड्रिया ता. २७।३।१९१६

माझ्या एका मित्राचे, विष्णुसहस्रनामांतील कांहीं श्लोकखंडांवरील विचार पुढे नमूद केले आहेत. माझे मित्र ह्मणाले:—

" अहो श्रीखंडे ! विष्णुसहस्रनाम हा ग्रंथ कांहीं फावल्यावेळीं वेळ फुकट दवडण्यापेक्षां देवाचें नांव तरी घेत बसावें, ह्मणून नाहीं केला. तसें समजणें ह्मणजे त्याचा दुरुपयोग करण्यासारखें होईल. अहो ! या ग्रंथांत अमोलिक नीतितत्त्वें व व्यावहारिक सिद्धांत खचून भरले आहेत. समुद्रांत रत्नें पुष्कळ आहेत. तीं प्रयत्नानें काढलीं पाहिजेत. देवांनीं १४ रत्नें नाहीं कां काढलीं ! त्याच समुद्राचा जर आपण फक्त आंघोळीकरितां उपयोग करूं लागलों तर आह्मांस काय ह्मणावें ? विचार करून पहा ह्मणजे मी ह्मणतों त्याची खात्री पटेल. मनुष्यानें विचार करण्याची संवय लावून घेतली पाहिजे.

[ यापुढील मजकूर पृष्ठ ८४ ते ९० अखेर टीपेंतच पुरा केला आहे. ]

'म' गणाचें लक्षण सांगतांना कुठलीं तरी तीन गुरु अक्षरें न सांगतां ' धीः श्रीः स्त्रीम् ' असें सांगून पुरुषानें आधीं धीः ह्मणजे विद्या संपादनानें तेजस्वी झालेली बुद्धि संपादून, मग श्रीः ह्मणजे संपत्ति मिळवावी व नंतर स्त्री संपादावी, असें पर्यायानें सुचवितो. पुढें 'य' गणाचे लक्षणांत ' वरासाय ' ह्मणजे ती स्त्रीसुद्धां वरा वरण्यायोग्य, अनुरूप व पसंत केलेली असावी असें श्लेषानें सुचवितो. ' सहज बोलणें हित उपदेश ' हीच तर विद्वान् व साधुपुरुषांच्या व्यवहारांतील खुबी आहे त्याचप्रमाणें भीष्माचार्यांनींही श्रीविष्णूचीं कोरडीं नांवें न सांगतां, त्या नामसमुच्चयांमधून व्यावहारिक सिद्धांत व अडाखे मधून मधून बसवून त्या हजार नांवांच्या मालेंत एक प्रकारचा नक्षीदार सुंदरपणा उत्पन्न केला आहे. थोरांचें मोठेपण हेंच ! असें कौशल्य असामान्य व्यक्तींच्या कृतींतच आढळणार ! या कौशल्याचे जे नमुने मला आढळले ते मी आतां वाचकांसमोर मांडीत आहें. आपण तें स्तोत्र समोर ठेवून वाचित वाचित पुढील भाग वाचावा अशी नम्र विनंति आहे. कारण मग तुह्मांसही आणखी जास्त सुंदर असे भाग आढळतील.

असो. आतां स्तोत्रांत प्रवेश करूं या. येथें नामांच्या जोड्या किंवा त्यांचा समुच्चय कांहीं विशेष अर्थ मनांत धरून योजिलेला दिसतो. उदाहरणार्थ:—

---

प्रत्येक पदार्थांत अज्ञात असे अनंत गुण भरलेले असतात. ते शोधून काढून त्यांचा सदुपयोग करून घेण्याकरितांच ईश्वरानें मनुष्यास बुद्धि दिली आहे. बुद्धीचा उपयोग न करणारा मनुष्य व जनावर यांत भेद काय ? ' अहो, मला सर्व समजलें. यांत काय आहे ? हें असेंच असावयाचें. यांत जास्त कांहीं नाहीं !' इत्यादि विचारमाला अज्ञान वाढविणारी आहे. प्रत्येक वस्तु निरनिराळ्या दृष्टीनें पाहण्याची संवय लावून ध्यावी जिज्ञासा जागृत ठेवून, नवीन कल्पना व विचार यांचा संग्रह करावा. नवीन शोधांचा उपयोग हीच सुधारणा.

आतां विष्णुसहस्रनामाकडे पहा ! **अमृतांशूद्भवो भानुरिति बीजम्** । अमरत्वाच्या अंशापासून ज्याचा उगम आहे व जो भानूप्रमाणें तेजस्वी आहे तोच विष्णुसहस्रनाम जाणतो. मनुष्य ईश्वरी अंशभूत आहे. पण त्यानें भानु बनलें पाहिजे, हा विष्णुसहस्रनामाचा उद्देश आहे अमृतांशूद्भव प्रत्येक व्यक्ति भानु होऊं शकते हें बीज आहे. **देवकीनंदनः स्रष्टेति शक्तिः** । मनुष्य उत्तमकुलोत्पन्न असून स्रष्टा ह्मणजे कर्तृत्ववान् असला पाहिजे, तरच तो सामर्थ्यवान् होतो. शिवाय त्यानें आपल्या

'**योगो योगविदां नेता प्रधानपुरुषेश्वरः**' स्वतः कर्मकुशल व असत्याच लोकांचा पुढारी हा मुख्य प्रधानपदवीस पोहोंचून पुरुषेश्वर होतो. इंग्लिश लोकांपैकीं कोणासही आपण राजा व्हावें असें वाटत नसेल, पण प्रधान होण्याची महत्वाकांक्षा पुष्कळांना असते. प्रधान हाच खरा पुरुषेश्वर, राजा आडनांवाचा आहे. हें लोकशाहीचें आधुनिक रहस्य यांत दर्शविलें आहे.

'**नारसिंहवपुः श्रीमान्**' मनुष्याची युक्ति व सिंहाचें साहस व शक्ति असलेला श्रीमान् होतो. साहसे श्रीः प्रतिवसति ।

'**अग्राह्यः शाश्वतः**' जें जिंकतां येत नाहीं तें शाश्वत टिकाऊ असतें.

'**लोहिताक्षः प्रतर्दनः**' लाल डोळ्याचा माणूस कडक व तुसडा असतो. मनुष्याच्या स्वरूपावरून त्याचा स्वभाव ओळखण्याचें जें एक फिजिऑग्नॉमी (Physiognomy) म्हणून शास्त्र आहे, त्यापैकीं कांहीं लक्षणें या स्तोत्रांत मधून मधून आहेत. तीं पुढें येतीलच. उदाहरणार्थः—

'**वृषकर्मा वृषाकृतिः**' बैलासारखा दिसणारा बैलोबाच असणार व तो बैलाचेच कामीं योग्य !

'**रुद्रो बहुशिराः**' ज्याच्या अंगावरील शिरांचें जाळें ठळक दिसतें तो रुद्राप्रमाणें भयंकर कर्मकर्ता असतो.

---

आईला, म्हणजे पर्यायानें स्वदेशमातेला सुखी केलें पाहिजे, व तीच परंपरा चालविली पाहिजे, हीच विष्णुसहस्रनामाची शक्ति आहे. **त्रिसामा सामगः सामेति हृदयम् ।** आपलीं सर्व कर्में वेदविहित असावींत. वेद हे ईश्वरप्रणीत असल्यानें मनुष्याच्या इह-पर कल्याणाचा मार्ग ते दाखवितात. आपण निष्ठापूर्वक त्यांचें गायन करावें व सर्व भूतमात्रांशीं सामानें-सामोपचारानें-- वागावें हें विष्णुसहस्रनामाचें हृदय. **शंखभृन्नंदकी चक्रीति कीलकम् ।** मनुष्य नुसता गुणवान् व ज्ञानसंपन्न असून भागत नाहीं. त्याचेजवळ स्वसंरक्षणार्थी आयुधेंही पाहिजेत. दुष्टांना भीति वाटेल अशीं साधनें त्यानें जवळ केलीं पाहिजेत. हीच यशाची व प्रतिष्ठेची किल्ली आहे. **शार्ङ्गधन्वा गदाधर इत्यस्त्रम् ।** दूर किंवा जवळ असणाऱ्या शत्रूस त्यानें प्रहार केला पाहिजे. तशाच तयारीनें राहिलें पाहिजे. **रथांगपाणिरक्षोभ्य इति कवचम् ।** चक्राप्रमाणें सभोंवार अभेद्यपणें बंदोबस्त करून ग्हावें. कोणत्याही एका ठिकाणीं सर्व बळ एक करतां आलें पाहिजे. व तेथून लागेल तेथें नेतांही आलें पाहिजे. इतकें असूनही चाकाचा कणा जसा न हालणारा अक्षोभ्य म्हणजे निर्विकार राहतो, तसें असावें. अक्षोभ्य नसेल तर प्रसंगावधान राहणार

'**महोत्साहो महाबलः**' ज्याचा उत्साह मोठा त्याचेंच बल मोठें होय. कारण उत्साहरहित बल कार्यक्षम असत नाहीं. शिवाय उत्साह असेल तरच बलाचा उपयोग करतां येईल.

'**श्रीनिवासः सतां गतिः**' श्रीमान् मनुष्य सत्पुरुषांचा आश्रयदाता होऊं शकतो.

'**सुप्रसादः प्रसन्नात्मा**' ज्याचा आत्मा संतुष्ट झाला आहे, तोच उत्तम बक्षीस देईल.

'**सिद्धार्थः सिद्धसंकल्पः**' ज्याचे सर्व बेत तडीस गेले आहेत त्याला चारी अर्थ प्राप्त होतील.

'**अप्रमत्तः प्रतिष्ठितः**' जो कोणतेंही मादक द्रव्य सेवीत नाहीं, तो प्रतिष्ठा पावतो. इतिहासांत पहारेकऱ्यांना दारू, गांजा, अफू वगैरे मादक पदार्थ चारून त्यांच्या पहाऱ्यांतील मनुष्यें किंवा इतर पदार्थ व अजिंक्य किल्लेसुद्धां काबीज केल्याचीं उदाहरणें आहेत.

---

नाहीं. या सर्वांचा उपयोग कवचाप्रमाणें स्वसंरक्षणार्थ करण्याचा आहे. दुसऱ्याला लुबाडून आपली पिशवी भरण्याकारितां नाहीं! तथापि, **उद्भवः क्षोभणो देव इति परमो मंत्रः**। मनुष्यानें नेहमीं तयार असावें. त्याला राग पाहिजे. आपणांस कोणी दुखविल्यास शिक्षा देव तयाला करील म्हणोनि उगीच बसूं नये. त्यानें स्वतः देव म्हणजे तेजस्वी झालें पाहिजे. ज्या मनुष्याला राग नाहीं, किंवा जो दुष्कृत्यांचा प्रतिकार करीत नाहीं, तो मनुष्य कसला ? बाहुलीच ती !

'**अमर्षशून्येन जनस्य जंतुना**
**किं जातहार्देन च विद्विषादरः ॥**' *

---

* भारविः— किरातार्जुनीय. प्रथमसर्ग श्लोक ३३ उत्तरार्ध. पूर्वार्ध असाः—

अवन्ध्यकोपस्य विहन्तुरापदां भवन्ति वश्याः स्वयमेव देहिनः ।

अर्थः — ज्याचा क्रोध निष्फळ होत नाहीं व त्यायोगें जो आपली विपत्ति नाहींशी करतो, त्याला लोक आपण होऊन वश होतात. परंतु ज्याला क्रोध मुळीं नाहींच, असा मनुष्य स्नेही झाला तरी त्याचा कोणास आदर नसतो किंवा शत्रु झाला तरी त्याची कोणास भीतिही नसते.

**' लक्ष्मीवान् समितिंजयः '** जो संपत्तिमान् आहे तोच लढाई जिंकील. द्रव्यानें पाहिजे तो पदार्थ साध्य करून घेतां येत असल्यानें ज्याच्याजवळ जास्त पैसा असेल त्यालाच जय मिळणार असें समजावें. घरगुती लढाया व कोर्टांतील तंटेबखेडे वगैरेंमध्यें सुद्धां पैशाचा प्रभाव ठळकपणें दिसतो. पैशानें खऱ्याचें खोटें व स्वातंत्र्याची गुलामगिरी किंबहुना सर्व इष्ट हेतु साधतां येतात, मग लढाई जिंकणें अशक्य नाहीं. पैसा पाहिजे.

**' वेगवानमिताशनः '** ज्याचें खाणें अचाट त्याचें कर्मही अचाटच. मोजकें खाणारा वेगवान् कधींही असणार नाहीं. सैन्याला धान्याचा पुरवठा मुबलक नसेल तर तें काय लढणार ! पानपतची लढाई हरण्यास धान्याची टंचाई हेंही एक कारण आहेच. सारांश, वेगाचीं, धाडसाचीं कामें करण्यास पाहिजे तें खाऊन फस्त करणारा इसम पाहिजे.

**' महाभोगी महाधनः '** निरनिराळे भोग भोगावयाचे असल्यास पैसा मुबलक हवा.

**' मनोहारी जितक्रोधः '** जो दुसऱ्याचें मन हरण करूं शकेल तो त्याचा रागही घालवूं शकेल.

**' महोदधिशयोऽतकः '** महान् समुद्रांत नेहमीं राहणारा प्रत्यक्ष यमच !

---

किडा सुद्धां प्रसंगविशेषीं रागानें शक्त्यनुसार धावतो. राग नसलेला पुरुष कचऱ्याप्रमाणें आहे. ह्मणून ' उद्भवः क्षोभणो देवः ' हाच परम मंत्र आहे. या तत्त्वांवर रचलेली विष्णुसहस्रनामाची इमारत एखाद्या भव्य किल्ल्याप्रमाणें अभेद्य, स्वसंरक्षणसमर्थ, दुष्टांना भीतिप्रद, व अशक्तांना आश्रयभूत असून मनोहर आहे. त्यांतील कांहीं रमणीय कल्पना-प्रदेश मी तुह्मांला दाखवितों. चला मजबरोबर.

**' नेता प्रधानपुरुषेश्वरः '**— लोकांना योग्य मार्ग दाखवून त्या मार्गानें नेणारा मनुष्य, त्यांचा पुढारी होतो व तसा राहतो. शरीरसामर्थ्य व शहाणपण नसेल तर संपत्ति टिकणार नाहीं. मग मिळविण्याचें तर दूरच राहिलें !

**' मेधावी विक्रमः क्रमः '**— मनुष्य बुद्धिवान् असून तो पराक्रमीही असला पाहिजे. तेव्हांच तो अनुकरणीय होतो. अशाच पुरुषांचा क्रम ह्मणजे संप्रदाय देशाचें अस्तित्व राखतो व त्याला ऊर्जितकाल आणतो.

**' वेदवित्कविः '**— वेद जाणणारा मनुष्यच चांगला कवि होऊं शकेल, इतरांस शक्य नाहीं. पूर्वी पाहिलेलें व शिकलेलें ज्याच्या चांगलें ध्यानांत राहतें तो ' वेदवित् '

हें वर्णन आधुनिक टॉर्पेडोला लागूं पडतें.

'**पुष्कराक्षो महामनाः**' कमलाप्रमाणें प्रफुल्लित नेत्रांचा मनुष्य उदार स्वभावाचा असतो. याच्या उलट–

'**वृषभाक्षो वृषप्रियः**' बैलासारखे डोळे असलेला गुराखीच असणार.

'**सत्कीर्तिश्छिन्नसंशयः**' ज्याच्याविषयींचे संशय नाहींसे होतात त्यालाच उत्तम कीर्ति मिळते.

'**दुर्जयो दुरतिक्रमः**' जो जिंकण्यास कठीण त्याचा अतिक्रम–अपमान–कोणी करीत नाहीं.

'**सुतंतुस्तंतुवर्धनः**' जो उत्तम सूत काढतो तोच सुताची निपज वाढवितो. येथें महात्मा गांधींचें उदाहरण लागूं पडतें. व त्यांना '**शुभांगो लोकसारंगः**' हींही विशेषणें शोभतील.

'**सर्वज्ञः सर्वतोमुखः**' जो चहूंकडे लक्षपूर्वक पहात असतो तो सर्वज्ञ होतो. त्याला पुष्कळ माहिती होते.

'**शत्रुजिच्छत्रुतापनः**' जो शत्रूंना सळो कीं पळो करून सोडतो तोच त्यांना जिंकतो. The best way of defence is Counter-attack. मरा-

---

ह्मणावा पावसाळ्यांत परसांत उगवणाऱ्या पंच्याप्रमाणें पुष्कळ कवि दरवर्षी जन्मतात, व पावसाळा संपल्यावर मरूनही जातात. पण 'वेदवित' कवि अजरामर होतो! आजपर्यंतचे सर्व उत्तम कवि असलेच होते, आहेत, व पुढेंही होतील!

'**श्रीनिवासः सतां गतिः**'— चांगल्या मनुष्यांना संपत्ति माळ घालते. व ते दुसऱ्या चांगल्या लोकांना संपन्न करण्याकडे तिचा विनियोग करतात. आपण संपन्न राहून इतरांना संपन्न होण्यास मदत करणें व चांगल्या लोकांना आश्रय देणें हा मानव धर्म आहे.

'**अप्रमत्तः प्रतिष्ठितः**'— जो मनुष्य आपले कामांत चूक होऊं देत नाहीं, किंवा आपले कर्तव्य करीत असतां कैफ येण्यासारखीं किंवा मादक द्रव्यें सेवीत नाहीं, तो प्रतिष्ठा पावतो. पाश्चिमात्यांस हें तत्त्व आतां कोठें समजूं लागलें आहे.

'**वेगवानमिताशनः**' — वेग ह्मणजे नेहमींच्या पद्धतीहून निराळी व जलद क्रिया करण्याची पद्धत स्वीकारणें. चपळपणा किंवा चंचळपणा ह्मणजे वेग नव्हे गुरुत्वमध्य एका ठिकाणाहून दुसरीकडे त्वरित नेणें हाच वेग. मोजकें अन्न खाणारा वेगवान् व धाडसी असणार नाहीं. मुबलक अन्नाचा पुरवठा असल्याशिवाय शिपाई कसे लढतील

त्यांनीं हीच गनीमी काव्यानें लढण्याची पद्धत जोपर्यंत पाळली होती तोपर्यंत त्यांची भरभराट होती. शत्रूला त्रास देणें ह्मणजेच त्याला जिंकणें होय.

'**भयकृद्भयनाशनः**' जो भय दाखवितो तोच त्याचा परिहार कसा करावा हें जाणतो. जो कुलूप तयार करतो तोच त्याची किल्लीही जाणतो.

'**प्रियकृत् प्रीतिवर्धनः**' जो आवडतें कृत्य करतो तो प्रेम वाढवितो. प्रीतिपासून प्रीति वाढते.

'**लोकाधिष्ठानमद्‌भुतः**' ज्याचे ठिकाणीं अद्‌भुत सामर्थ्य असतें तो लोकांच्या आदरास पात्र होतो. चमत्कारावांचून नमस्कार नाहीं.

'**विद्वत्तमो वीतभयः**' विद्वान् मनुष्य निर्भय असतो. भीति नेहमीं अज्ञानजन्य असते. ज्ञान झाल्यावर भीति रहात नाहीं.

'**ऊर्ध्वगः सत्पथाचारः**' सन्मार्गानें जाणाऱ्याची सदोदित भरभराट होते व तो उंच पदवीस पोहोंचतो.

'**क्षितीशः पापनाशनः**' दुष्टांचें निर्दलन करणारा, राजा होण्यास योग्य होय.

---

व यश कसें मिळेल! वेगवान् लोक अमिताशनच असणार. ज्यांच्याकडून साहसकर्में करविण्याचीं असतात, त्यांना यथेच्छपणें पौष्टिक अन्नावर ताव मारूं देणें इष्ट आहे त्याबरोबर व्यायामही हवाच.

'**ज्ञानगम्यः पुरातनः**'— पुरातन वस्तु ज्ञानानेंच जाणतां येतात. ज्ञानावांचून पुराणवस्तुस्थिति समजणार कशी? वस्तूचे ठायीं विशिष्ट गुण असल्याशिवाय ती टिकाऊ होत नाहीं, व तिला पुरातनत्व प्राप्त होण्यास तिनें कीर्तिसंपन्न असलें पाहिजे. अशा वेळीं तिचें वर्म ज्ञानांतच असतें. ती ज्ञानरूपानें पुरातन होते व ज्ञानानेंच जाणतां येते

'**महोदधिशयोऽन्तकः**' — महान् समुद्रांत शयन करणारा व अंतक ह्मणजे इतरांस मृत्युकारक हे एकच. उदाहरणार्थ, मध्यांची टॉर्पेडो महान् समुद्रांत राहून तेथें संचारार्थ निघणाऱ्या मोटमोठ्या जहाजांस क्षणार्धांत ती रसातळीं पोंचविते. ती 'अंतक'च नाहीं काय?

'**वृषभाक्षो वृषप्रियः**'— बैलासारख्या डोळ्याचा मनुष्य बैल हांकतांनाच आढळेल. ह्मणजे त्यापेक्षां जास्त अकलेचें काम तो करूं शकणार नाहीं. या वचनांत मनुष्याच्या चेहऱ्यावरून त्याचा स्वभाव व बुद्धिमत्ता ओळखण्याच्या शास्त्राचें बीज आहे.

मला इतकींच शब्दरत्नें सांपडलीं. सुज्ञ वाचकांस पुष्कळच सांपडतील. हें स्तोत्र अशा रत्नांचा सागरच आहे. कांहीं रत्नें तर ह्मणी होण्याच्या योग्यतेचीं आहेत. उदाहरणार्थ, ' **अप्रमत्तः प्रतिष्ठितः,** ' '**लक्ष्मीवान् समितिंजयः,**' ' **प्रियकृत् प्रीतिवर्धनः** ' वगैरे.

आतां एकच एक परमेश्वराला हजार नांवांनीं संबोधण्यापासून काय फायदा, अशी शंका कदाचित् येईल तर त्याला हेंच उत्तर कीं, अंतःकरणांत प्रेमाचा उगम झाल्यावर हा प्रश्नच होत नाहीं. लाडक्या मुलाचें पाळण्यांतलें नांव जरी एकच असलें, तरी प्रेमळ माता त्याला खेळवितांना किती नांवांनीं बोलविते, तें दृश्य जर तुह्मीं पाहिलें असेल तर ही शंका तुमच्या मनास शिवणारही नाहीं. प्रेमळ भक्तही आपल्या आराध्यदेवतेस असेंच पुष्कळ नांवांनीं आळवितो व तो ज्यावेळीं भक्तींत तन्मय होतो, त्यावेळीं त्याला हीं हजार नांवेंही अपुरींच वाटतात. अनंतगुणसंपन्न ईश्वराचें वर्णन हजारच काय पण कोट्यवधि नांवांनींही होणें अशक्य ! तथापि, बहुजनसमाजाच्या आटोक्यांत येईल असलें हें भक्तिस्तोत्र आहे व त्यांचेकरितांच तें गुंफलें आहे.

शेवटीं, या वाङ्मयपूजेनें तो परमेश्वर संतुष्ट होऊन वाचकांस सुबुद्धि व ऐश्वर्य देवो !

---

' **सत्कीर्तिश्छिन्नसंशयः** '— मनुष्याच्या आचरणाविषयीं व हेतूविषयीं लोकांच्या मनांत उत्पन्न होणारे कुतर्क व संशय नाहींसे झाल्याशिवाय त्याची कीर्ति होणार नाहीं.

' **शत्रुजिच्छत्रुतापनः** '— जो शत्रूंना पीडा देतो तोच त्यांना जिंकतो. शत्रूंना ' त्राहि त्राहि ' करून सोडल्याशिवाय ते वठणीला येणार कसे ? शिवाय तुह्मी त्यांचे मागें लागल्याशिवाय ते गप्प बसणार नाहींत शत्रूंना तुह्मी सतावून सोडा, व प्रथम हल्ला तुमचा पाहिजे

' **भयकृद् भयनाशनः** ' - जो भय उत्पन्न करतो तोच त्याचा नाश करूं शकतो जो कुलूप तयार करतो तोच किल्लीही बनवितो.

' **प्रियकृत् प्रीतिवर्धनः** ' प्रिय केल्यानें प्रीति वाढते. प्रेमानेंच प्रेमाची जोपासना करावी. परस्परांच्या आवडीनुरूप वागल्यानें प्रेम दृढ होतें.

' **लोकाधिष्ठानमद्भुतः** ' कांहीं चमत्कार दाखविल्याशिवाय लोक नादीं लागत नाहींत आपण अद्भुत असावें-व्हावें-ह्मणजे लोक आपणांकडे येतात ...."

## ३. चिवड्याचें सर्टिफिकेट्.

[ लेखकः—कै. डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे, एम्. सी. पी. एस्. ]

माझे बंधु चि. भाऊसाहेब हुजुरबाजार यांनीं १९१५ च्या नोवेंबर महिन्यांत कोल्हापुराहून मजकडे (-मी अलेक्झांड्रिया येथें असतां-) एक चिवड्याचें पार्सल् पाठविलें. वाटेंत पार्सल्चे बरेच हाल होऊन तें फुटलें, तरी मला मिळालें. त्याबद्दल मी त्यांना पुढील सर्टिफिकेट् दिलें आहे.

श्री.

Bombay Presidency General
Hospital. Alexandria
San Stefano 15th Nov. 1915.

श्रीयुत राजश्री शंकरराव आबाजी हुजुरबाजार यांसः—

अलेक्झांड्रियांतील, अथवा मिसर देशांतील किंबहुना सर्व जगांतील लोकांचे वतीनें मी आपणांस कळवितों कीं, आपण तयार करून पाठविलेला चिवडा मला, माझ्या मित्रमंडळीस व इतरेजनांस अतिशय आवडला. अत्यंत सूक्ष्म व तीव्र दृष्टीनें परीक्षण करतां, त्या चिवड्यांत, शरीरास किंवा मनास अपायकारक असें कोणतेंही द्रव्य आढळलें नाहीं. उलटपक्षीं, कांहीं पदार्थ पौष्टिक, तर कांहीं क्षुद्बोधक, कांहीं उत्तेजक, कांहीं बलवर्धक व कांहीं सारक व देदीप्यमान दिसले. हा चिवडा जिव्हेस रुचिकर व मनास आल्हादकारक असून आयुष्य वाढविणारा असावा. त्याचा मनोहर वास आल्यानें, त्याला पाहतांच प्रत्येकाचे तोंडास पाणी सुटें. पण असा माल आपणांस तयार करतां येणार नाहीं, व त्यामुळें आपला व्यापार आतां बसेल, या भीतीनें व्यापाऱ्यांच्या तोंडचें मात्र पाणी पळालें! चिवडा जरी तुपांत केलेला होता, तरी त्याचे ठिकाणीं स्नेहवर्धनाचा गुण आढळला. भिन्न रुचींच्या व जातींच्या पदार्थांचें ऐक्य करून आपण मोठी बहार केलीत. हिंदुस्थानांतील लोकनायकांनासुद्धां हें कार्य साधलें नाहीं!

आपल्या चिवड्याच्या दुंदुभीचा ध्वनि जगभर दुमदुमत राहील. प्रेमाच्या उबेनें जरी तो उनउनीत होता, तरी त्यानें माझा प्रियजनविरहाग्नि शांत केला! सगळे दाणे आपण घेऊन त्यानें कर्त्यास बेदाणा बनविलें. हादग्याचे अंबारीसहित हत्ती, आरत्या हातांत घेतलेल्या अष्टसिद्धि* आणि मंगळागौरी, बुधबृहस्पती या समवेत थाटानें आल्यानें, दिग्विजयाचें काम यानें दूरवर विचार करून हातीं घेतलेंसें वाटतें. आपण जरी त्याला पृथ्वीप्रमाणें सभोंवतीं वर्तुळ व दोन टोंकांस चापट अशा डब्यांत बंद केलें होतें, तरी तो डबा फोडून, मला भेटण्यास उत्सुकतेनें बाहेर आला होता. समुद्रावरून प्रवास केला तरी हिंदुस्थानांतला पदार्थ बिघडत नाहीं, व भ्रष्ट होऊन नाश पावत नाहीं, असें त्यानें स्वोदाहरणानें सिद्ध केलें आहे. दिसतां दिसतां अंतर्धान पावून, त्यानें मला व माझे मित्रवर्गास तोंडांत बोटें घालावयास लावलें. सगळा खाल्ला तरी ढेंकर आला ह्मणजे आपला गुण तो दाखवितच होता. यावरून 'सुंभ जळला तरी पीळ जळत नाहीं' हेंच खरें! वारंवार पोटांत गुरगुरून 'गुरुवांचून मोक्ष नाहीं रे नाहीं!' हेंच तो मोठ्यानें प्रतिपादीत होता. सुधारलेल्या लोकाच्या विविधरुचिप्रिय जिव्हेलाही त्यानें चटक लावली. खातांना, माझ्या कित्येक युरोपियन् मित्रांचे डोळ्यांतून आनंदाश्रु आले, व परमेश्वरानें आह्मांस हिंदुस्थानांत कां जन्मास घातलें नाहीं, ह्मणून ते 'हाय! हाय!' करूं लागले. थोडा तिखट (Strict?) होता तरीसर्वत्रास त्यानें आपली गोडी लावली. पहातांच त्याला आपलासा करावा असें प्रत्येकास वाटे, व हां हां ह्मणतां सर्वत्रांचे तोंडीं तो झाला, अशी त्याचे अंगीं कांहीं विलक्षण जादू होती. खरोखर, आपल्या चिवड्याचें मी वर्णन करूं गेल्यास, त्या वर्णनाचाच चिवडा होईलसें मला वाटतें. मला तें केवळ अशक्य आहे, व माझ्या मित्रवृंदाचेंही तसेंच मत आहे. हा चिवडा 'न भूतो न भविष्यति'—कोटींतील आहे, एवढेंच आह्मी त्याबद्दल सर्टिफिकेट् देऊं शकतों.

S. C. Shrikhande.

* पार्सलच्या पॅकिंगमध्यें जे कागद होते, ते हादगा, बुधबृहस्पती इत्यादि जुन्या चित्रांचे असल्यामुळें त्यांस उद्देशून हा उल्लेख आहे! —रा. चिं. श्री.

# ४. * स्वागतांचे कांहीं विशेष प्रकार.



[ लेखकः—कै. डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे. एम्. सी. पी. एस्. ]

अलेक्झांड्रिया. श्रीसद्गुरुमायप्रसन्न. ता. ५-११-१५

चि. रामभाऊ यासः —

अनेक आशीर्वाद, उपरि विशेष. बाळ! तुझें ता. २० चें पत्र पोंचलें. वाचून आनंद झाला. सृष्टिशोभेंतील रमणीयता मी हिंदुस्थानांत कादंबऱ्यांतूनच फक्त वाचली होती, अनुभव नव्हता, व कोणाच्या भाषणांतही ऐकिली नाहीं. पण येथें आल्यावर मी त्या आनंदाचा उपभोग घेऊं लागलों. मी जी गोष्ट २८ वर्षांनंतर शिकलों, ती तूं १६ व्या वर्षींच जाणतोस हें तुझ्या पत्रांतील वर्णनानें सिद्ध होतें. मी हें कसें शिकलों तो इतिहास तुला सांगतों. (माझ्या जन्मदिवशीं ह्मणजे ५ नोव्हेंबर रोजीं मी गेल्यावर्षीं काय काय नवीन शिकलों हें पहाण्याचा, व एक उन्नतिकारक नवीन व्रत धारण करण्याचा उपक्रम केला आहे. व्रताचें काय झालें तें चि. भाऊसाहेब यांचे पत्रांत लिहिलें आहे. तुला नवीन काय शिकलों तें लिहितों.)

हिंदुस्थानांत असतांना, कोणा स्नेह्याची गांठ पडली तर नमस्कार करून स्वागत करणें व साहेबाला फक्त Good morning Sir!' ह्मणणें यांशिवाय दुसरी स्वागताची रीत माहीत नव्हती. पण येथें आल्यापासून पुष्कळ तऱ्हा दिसूं लागल्या. तेव्हां प्रत्येकीचा विचार करून चांगली कोणती याचा विचार करूं लागलों. त्या तऱ्हा पुढीलप्रमाणें:—

१. दाक्षिणेंतील 'नमस्कार' किंवा 'रामराम. कसें काय? बरें आहे ना?' या पद्धतीनें भूतमात्राचे ठिकाणीं नम्रता किंवा ईश्वरनामस्मरण हें घडतें. 'नम्र झाला भूतां, तेणें कोंडिलें अनंता', किंवा 'मुखीं नाम, हातीं मोक्ष,' हें तत्त्व या पद्धतींत प्रतिपादिलें असेल. 'बरें आहे ना?' या प्रश्नानें चांगल्या परिस्थितीची

* हा व पुढील कांहीं लेख पत्ररूपानें मला लिहिले आहेत. —रा. चिं. श्री.

कल्पना साधारणपणें होते. बरें ह्मणजे वाईट नव्हे, पण चांगलेंही नव्हे. मध्यम. चांगलें मिळविण्याची महत्त्वाकांक्षा यानें जागृत व्हावी. शेवटच्या 'ना'नें काळजीपूर्वक वागण्याची सूचना केली जाते.

२. 'Good morning, Sir. How are you?' किंवा 'How do you do?' पहिल्या भागानें (Good morning, Sir!) भेटणाऱ्याचा सन्मान व सभोंवतीं परिस्थिति अनुकूल व चांगली आहे, असें दर्शित होतें. दुसऱ्यानें तुह्मी तिचा आनंदानें उपभोग घेतां ना? तिचा योग्य फायदा घेतां ना? तुमची कर्तृत्वशक्ति जागृत आहे ना? इत्यादि कल्पना आपण भेटणाऱ्याच्या मनांत जागृत करतों.

३. 'Comment[1] Allez[2] vous[3] Monsieur[4]?' (कमांतले व्हू मेसु?) असें फ्रेंच लोक विचारतात. याचा अर्थ 'कसें[1] चालतां[2] तुह्मी[3] महाराज[4]?' चालणें ह्मणजे क्रिया करणें. या स्वागतशब्दांतून कर्तृत्वशक्ति, जोर, निरोगीपणा, परिस्थितिज्ञान, सन्मान व कर्तव्यजागृति, यांविषयीं कल्पना कशा उत्पन्न होतात याचा तूंच विचार कर.

४. 'इश्नय्यक्?' ('परिस्थिति तुला अनुकूल आहे?) असें अरबी मनुष्य विचारतो. त्याला 'अल्हम्दु लिल्लाह्' (ईश्वर सर्व समर्थ आहे. सर्वत्र भरला आहे. व मजकडे पहातो आहे!) असें दुसरा अरब उत्तर देतो. या प्रश्नोत्तरांत काय जादू आहे याचाही तूं विचार कर.

५. 'वंदे मातरम्' असें नवीन बंगाली ह्मणतो. सर्वत्रांची एकच आई जी भूमी, तिला मी नमन करतों. तूं व मी भाऊभाऊ आहोंत. आमच्या आईला विसरूं नको असें बंगाली ह्मणतो.

६. 'सलाम अलेकुम्' ह्मणून हिंदुस्थानवासी मुसलमान ह्मणतो. आपलें कल्याण असो, अशी इच्छा तो दर्शवितो.

७. 'बंदगी, बाबूजी!' ह्मणून पंजाबी ह्मणतो. आपण मोठे मनुष्य आहांत; व मी आपला दास आहें हा भाव तो दर्शवितो.

८. 'जय माताजी!' असें रजपूत ह्मणतो. आपल्या आर्यमातेचा जयजयकार असो-नव्हे-आहे असें तो सांगतो. माझ्या मनांत माझे जन्म-

भूमीबद्दल पुज्यबुद्धि आहे; तूंही माझा भाऊ आहेस, तिचा जय होत आहे. तूं उत्साह धर व आनंदी हो ! आपण दोघेही तिचा मान व प्रतिष्ठा वाढेल, तिला यश मिळेल व मिळालेलें वाढेल असें वागूं व आपण जन्मभूचा जयजयकार करूं. एकीनें आपलें सामर्थ्य वाढवूं या, असें क्षत्रियोचित स्वागत तो करतो.

९. 'जय, गोपाळ !' मारवाडी ह्मणतो. यांत ईश्वरप्रेम आहेच, पण गाईची योग्य जोपासना करणारा यशस्वी होतो हेंही दर्शविलें आहे. दूध तर पौष्टिक आहेच, तूप आयुष्यवर्धक समजतात, शेणमुतांचें उत्तम खत होतें. पंचगव्य तर ब्राह्मण मिटक्या मारीत भुरकतात ! निपजणारे खोंड शेतकीला उपयोगीं पडतात. इत्यादि अनेक फायदे आहेत.

या नऊ प्रकारांपैकीं तुला उत्तम कोणता वाटतो तें कळीव. जर पाहिला असेल तर दुसरा प्रश्नच उद्भवत नाहीं. जर नसेल तर मराठींत असा स्वागता-चा कोणता प्रकार पाडावा, कीं आपले शब्द ऐकतांच ऐकणाऱ्याच्या मनांत, आपणाविषयीं प्रेम व सहानुभूति उत्पन्न व्हावी, परिस्थितीची त्याला कल्पना यावी, उत्साह व कर्तव्य जागृति त्याचे ठिकाणीं व्हावी, त्याचा योग्य सन्मान व्हावा, व त्याचें चित्त प्रसन्न व्हावें. एक किंवा अनेक शब्दांनीं पण एकच वाक्यानें हें कार्य तूं कसें करशील पाहूं या !

या Greetings च्या-'स्वागतांच्या'-नऊ प्रकारांत परिस्थितीची कल्पना आणणारे पुष्कळच आहेत. विशेषत: मला पुष्कळजण 'Good morning' ह्मणत. मी ह्मणें 'अरे, मी तर सकाळीं उठल्यापासून दुसरें कांहीं सुंदर व चांगलें पाहिलें नाहीं. (फक्त माझें तोंड आरशांत पाहिलें!) आणि प्रत्येकजण 'Good morning' ह्मणतो, हें काय? या प्रात:काळांत खरोखरच कांहीं सौंदर्य आहे व तें मला सांपडलें नाहीं? कां हे सारे माझी थट्टा करताहेत!' विचार करूं लागलों. एक दिवस सकाळीं उठून नळावर तोंड धुण्यास गेलों. बाहेर जरा थंडीच होती, व अंगांत आळस होता, ह्मणून मला बरें वाटत नव्हतें. इत-क्यांत एक सार्जंट तेथें आला व स्मितहास्यपूर्वक मला 'Good morning, Doc-tor !' ह्मणाला. 'Good morning' मी ह्मणालों. 'Very fine, & refresh-ing breeze this morning ?' तो ह्मणाला. मी सहज 'Yes' ह्मणालों. पण लगेच वाटलें कीं, माझा अनुभव तसा नसतां मी 'होय' कां ह्मटलें ? यानें जर

आतां विचारलें कीं, ' Why do you say ' yes ' ? What fine & refreshing element you find in this breeze ! Are you enjoying it ? ' तर मी काय सागू ? मी त्या सार्जेटच्या तोंडाकडे पाहिलें. तो हंसतच होता. माझ्या अंगांत विजेचा संचार झाल्याप्रमाणें झालें. मी हंसूं लागलों. तों काय चमत्कार !!! सभोंवतीची प्रत्येक वस्तु मला सुंदर दिसूं लागली.

कळावें, हे आशीर्वाद. तुझे

दादा.

## ५. कांहीं मानव-स्वभाव.

( लेखकः—डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे, एम्. सी. पी. एस्. )

अलेक्झांड्रिया. श्री. ता. १५-११-१९१५

चि. रामभाऊ यासः- अनेक आशीर्वाद उपरि विशेष. आजरोजीं कार्तिक शुद्ध नवमी असल्यानें आपल्या दिनमानपद्धतीनें माझा वाढदिवस ठरतो. आजसुद्धां या वर्षांतील नवीन अनुभव मी तुला सांगणार आहें. मागच्या पत्रीं स्वागताचे निरनिराळे प्रकार सांगितले. या पत्रांत आपणांस परके लोक भेटले असतां कसें वागतात तें लिहितों. तुला यांपैकीं कोणती पद्धत आवडते तें सांग.

१. हिंदी मनुष्य आपणाकडे येत असतां अव्यवस्थितपणें किंवा फार ताठ्यानें चालत येतो. अगदीं हलक्या दर्जाचा मनुष्य, मध्यम दर्जाच्या मनुष्याचें स्वागत बहुतकरून करीत नाहीं, व ऑफिसरला वारंवार त्याला कंटाळा येईपर्यंत सलाम करतो. कोणतेंही काम निष्काळजीपणानें करण्याची त्याची हातोटी अवर्णनीय आहे. शब्दाचा धाक त्याला मुळींच वाटत नाहीं. फटकेसुद्धां त्याला करमणुकसे वाटतात. मध्यम दर्जाचा मनुष्य निरभिमानी दुसऱ्यांस सन्मान देणारा, व व्यवस्थित आढळतो. ऑफिसर, अहंमन्य, इतरांस तुच्छ लेखणारा, साहेबांस भिणारा, व स्वदेशीयांविषयीं बेपर्वा आढळतो. याहून निराळे जे आढळतील ते अपवाद आहेत.

२. फ्रेंच लोक चपळ, खेळकर, उत्साही, हंसतमुख व मित्रप्रिय आहेत. कनिष्ठ, मध्यम, ऑफिसर सगळे असेच आढळतात. परस्परांशीं प्रेमानें वागतीलच. पण इतरांशींसुद्धां मनमिळाऊपणें व निरभिमानपणें वागतात. त्यांची प्रत्येक शब्दाबरोबर हावभाव करण्याची हातोटी विलक्षण आहे. हात, पाय, तोंड, डोळे, भुंवया, डोकें किंवा सर्व शरीर, यांपैकीं कांहीं भाग प्रत्येक शब्दाबरोबर एका विवक्षित रीतीनें हाललाच पाहिजे, व सर्वांत तीच तऱ्हा आढळते. यामुळें जर या हावभावांचा अर्थ समजला, तर फ्रेंच भाषा येण्याचें कारण नाहीं. स्त्रियांत तर हे हावभाव फारच आढळतात. आणि चमत्कार हा कीं, प्रत्येक फ्रेंच मनुष्य या बाबतींत अगदीं यंत्रांतून काढल्यासारखा आढळतो. आवाज व स्वरूप निराळें; बाकी, हालचाल सिनेमांतील चित्रांप्रमाणेंच !

३. अस्ट्रालियन् व न्यू झीलंडरसुद्धां मनमिळाऊ आढळतो. पण आडदांड व मस्त असतो. त्याचे ठिकाणीं ताठा नाहीं, पण स्वाभिमान पुष्कळ असतो. राक्षसी कृत्यांबद्दल त्याला विशेष आवड. अचाट खाणें, उड्या मारणें, पोहणें, मारामारी करणें, व धाडसाचीं कामें करणें त्याला पसंत पडतें. हिंदी व इंग्लिश मनुष्यांशीं तो सारखाच वागतो. प्रत्येक विषयाची त्याला साधारण माहिती असते, व नवीन शिकण्यास तो लाजत नाहीं. आपलें मत स्पष्टपणें सांगण्यास तो भीत नाहीं. ऑफिसर झाला ह्मणून मी त्याचेपुढें वांकणार नाहीं; योग्य असतील ते हुकूम पाळीन, असें तो ह्मणतो.

४. येथील (इजिप्त)रहिवासी अरब कनिष्ठ दर्जाचा अगदीं घाणेरडा, शुद्ध जनावराप्रमाणें, चोरटा, बेफिकीर व दारूबाज असतो. खाणें व जीवंत राहणें, यांपेक्षां दुसरें कांहीं करीत नाहीं. अक्कलेचा भाग फारच कमी. पण मध्यम दर्जाचा शिकलेला मनुष्य, सभ्य, नीटनेटका, झटून व इमानानें काम करणारा, व गरीब स्वभावाचा आढळतो. शक्य ती मदत दुसऱ्यास करण्यास तो तयार असतो. बहुतकरून व्यसनासक्त नसतो. श्रीमंत मनुष्य चैनी असतो, पण पोपाखांत नाहीं पैसा खर्चित. बोलतांना साधा व प्रसन्न झाल्यावर मोठें बक्षिस देणारा, उदार दिलाचा असतो. मजवर असें बक्षिस घेण्याचा प्रसंग अझून आला नाहीं.

५. इंग्लिश मनुष्य अत्यंत स्वार्थपरायण, स्वदेशाभिमानी, आपल्या जातीशिवाय इतरांस तुच्छ लेखणारा, दुसऱ्याशीं न मिसळणारा, खेळाडू, आपलें काम बरोबर करणारा, स्वच्छ व धूर्त असतो. प्रत्येक काम वेळच्या-वेळीं करण्याबद्दल तो तत्पर असतो. हे लोक परस्परांशीं फार प्रेमानें व सलो-ख्यानें वागतात. वर सांगितलेले गुण जर इतरांत आढळले तर त्यांच्याशींही संभावितपणें वागतात. तसें नसल्यास द्वेष करतात, पण उघड दाखवीत नाहींत, कृतीनें जाणवितात.

६. ग्रीक लोक या ( इजिप्त ) देशांतील बहुतकरून व्यापारी आहेत. ते सर्वत्रांशीं प्रेमानें बोलतात, व हिंदी मनुष्यास विशेष आदरानें बोलावतात, स्वतःच्या खिशास चाट न लागतां कांहीं होण्यासारखें असेल, तर दुसऱ्याकरितां करतात व स्वतःच्या दुकानास गिऱ्हाईक जास्त मिळवितात. त्यांचे अंतःकर-णांत खरें प्रेम व आदरबुद्धि असेल किंवा नसेल, पण वागण्यांत प्रेम व आदरबुद्धि दाखविल्याशिवाय राहात नाहींत.

७. मी स्वतः निरोगी असल्यामुळें स्मितमुखानेंच मला भेटणाऱ्यांचें स्वागत करतों. प्रत्येकाशीं त्याला आवडतील असल्या विषयांवर चार शब्द बोलतों. कुणाला न झोंबेल असा विनोद करतों, व दुसऱ्यानें केलेल्या थट्टेनें पुष्कळ व मनापासून असें हंसतों. पुढें येणाऱ्या वस्तूंतील सुंदर व आनंददायक भाग तेवढाच घेतों. माझ्या दुःखाचें रडगाणें गात नाहीं. कोणी दुःखी दिसल्यास, त्याला उत्साह व आल्हाद देतों. सर्वत्रांशीं गोड बोलतों. स्वतः आनंदी राहून सभोंवतीं आनंदाचें वातावरण उत्पन्न करतों. कोणाची फाजील स्तुति करीत नाहीं, व उगीच खोटा मोठेपणा कोणांस देत नाहीं. स्वतःस शहाणा समजत नाहीं, व नवीन सांपडेल तें शिकतों. रोजचें काम रोज संपवितों, व नियमित वेळेवर प्रत्येक काम करण्यास शिकत आहें. शक्य तितका स्वच्छ-पणा ठेवतों. नैसर्गिक नियमांविरुद्ध वागत नाहीं. कोणाशीं पैशाचा व्यव-हार करीत नाहीं. पैसे कोणास उसने देत नाहीं व कोणाचे घेत नाहीं. चैन करीत नाहीं, व कोणी वृथा स्तुति केल्यास चढून जात नाहीं. सहसा फसत नाहीं व दुसऱ्यास फसवीत नाहीं. व्यसनापासून दूर रहातों. शक्य तितकी सहानुभूति व प्रेम मिळवितों. रोज ईश्वराचे आभार मानतों, स्तुति करतों, व निरंतर स्मरण ठेवण्याचे प्रयत्नांत आहें.

या सात व तुला कांहीं नवीन, वागण्याचा प्रकार माहीत असल्यास त्या सर्वांचें सार काढून एक सर्वोत्तम असा नमुना तयार कर पाहूं. कळावें, हे आशीर्वाद.

तुझे

दादा.

## ६. माझा एक अनुभव !

( विनोदी लेख. )

( लेखकः—कै. डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे, एम्. सी. पी. एस्. )

अलेक्झांड्रिया. श्री. ता. १७-१२-१९१५

चि. रामभाऊ यासः—

अनेक आशीर्वाद उपरी विशेष. मी येथें सुखरूप आहें. या खेपेस सुमारें सात महिन्यांपूर्वी मला मिळालेला एका न्हाव्याचे दुकानांतील अनुभव तुला कळवीत आहें, तो असाः—

मे १९१५ च्या पहिल्या आठवड्यांत मी येथून दोन मैलांवर असलेल्या बकोस ( Bacos ) नांवाच्या अलेक्झँड्रियापैकींच एका भागांतील एका केस कापणाऱ्याच्या दुकानीं गेलों. मार्चमध्यें मी आजारी असतांना माझ्या डोक्यावर बर्फाची पिशवी ठेवण्याकरितां माझी शेंडी व केस कातरून टाकले होते. आजारांतून उठल्यावर मी कामावर रुजू झालों. लष्करी कायद्याप्रमाणें रोज दाढी करणें अवश्य आहे. येथें न्हाव्याकडून रोज दाढी करविल्यास दर खेपेस २॥ आणे प्रमाणें महिना ५ रुपये खर्च होतील. रुपये ४ खर्चून एक उत्तम वस्तरा घेतल्यास रोज स्वतःची दाढी करतां येते. वस्तरा निदान दोन वर्षे चालतो. मी काटकसरीचा पुरस्कर्ता असल्यामुळें, ही संधी दवडली नाहीं. रोज दाढी करण्याचें बस्तान बसलें. पण डोकीवरील केस वाढतच होते व आहेत त्याची वाट काय ? न्हाव्याकडूनच कातरून घेतल्याशिवाय इलाज नाहीं. कातरणावळ ५ आणे पासून ३ रुपयेपर्यंत पडते. मी ५ आण्यांचीच पसंत केली व महिन्यांतून एकदां केस कातरून घेत असतों. त्या नैमित्तिकांतीलच हा एक प्रसंग आहे.

एका दुकानावर, मध्यभागीं साबण लावण्याच्या ब्रशूचें, एकीकडे कात्रीचें व दुसरीकडे वस्तऱ्याचें चित्र असलेल्या पाटीवरील 'केस कापण्याचें दुकान' अशा अर्थाचीं अक्षरें पाहून व आंत सभोंवार आरशे व त्यासमोरच्या खुर्च्यांवर बसून दाढी करवीत व केस कातरून घेत बसलेल्या कांहीं लोकांना पाहून मी तेथें थांबलों. दुकानाचा मालक दारांत उभा राहून रस्त्यानें जाणाऱ्यायेणाऱ्यांच्या दाढी व केसांकडे पाहून त्यांना हजामत करून घेण्याचा उपदेश करी. मला त्यानें बोलावताच मी आत गेलों. त्यानें मला एका मोकळ्या खुर्चीवर बसविलें. तो स्वतः फ्रेंच होता. त्याला जन्मभाषेशिवाय इतालीयन्, ग्रीक, अरबी येत होतें व इंग्लिश व जर्मन थोडें थोडें येत असे. मला इंग्लिश येतेंसें पाहून तो तुटक्या इंग्लिशमध्यें माझ्याशीं बोलूं लागला. मी केस कापून घेण्यास आलों आहे, व ५ आण्यांपेक्षा जास्त दराचें केस कापणें मला नको, असें समजतांच त्यानें मला थांबण्यास सागून, त्याच्या नोकरास कांहीं हुकूम दिला व आपण पुन्हां दरवाजांत गेला. मालक फक्त Pasha लोकाची ( अमीर उमरावांची ) दाढी करीत असे व ते ४ शिलिंग देत किंवा महिना, वार्षिक कांहीं रक्कम देत. त्याचा भाऊ युरोपियन् ऑफिसरची हजामत करी व त्याचा दर १ शिलिंग होता. दुसरा एक ग्रीक नोकर इतर सटरफटर युरोपियनांची व एक काळासांवळा अरब तसल्याच दुसऱ्याची चाकरी करी. तो ग्रीक किंवा अरब यापैकीं कोणी माझ्या वांटणीस येणार हें ठरलें. तिघांपुढेंही गिऱ्हाईक होतेंच. त्यामुळें मी खुर्ची मोकळी होण्याची वाट पहात बसलों. बाजूला चारपांच खुर्च्यांवर हळुहळु लोक येऊन बसत होते. प्रत्येक न्हावी आपले गिऱ्हाइकाचा दर्जा ओळखून त्याला बोलावी. माझ्या बाजूस एक सार्जंट बसला होता, पण इंग्लिश लोक Introduction ( ओळख ) करून दिल्यावांचून दुसऱ्यांशीं बोलत नाहींत. मी दुकानांत इकडे तिकडे पाहूं लागलों. ग्रीक न्हावी तिरळा होता, ह्मणून त्यानें मला बोलावल्यास कदाचित् दाढी करताना माझे कान कापीलसें मला भय वाटलें. मालकाचा भाऊ चांगला होता, पण माझे वाट्यास आला नसता. कारण मी शिलिंगवालें गिऱ्हाइक नव्हतों. तिसरा अरब न्हावी इसिकच्या गुलामाप्रमाणें दिसत होता, व महिषासुरमर्दिनीच्या चित्रांतील महिषासुराप्रमाणें त्याचे केस पिंजारलेले होते. तोहि मला आवडेना. उठून दुसऱ्या दुकानांत जावें तर वाईट दिसेलसें वाटलें.

शेवटीं काय होईल तें होवो ह्मणून बसलों. ५ मिनिटांत समोंवर्तीचें परीक्षण संपलें व मला कंटाळवाणें वाटूं लागलें. जवळच एक पुस्तक पडलें होतें व तें वाचण्याकरितां ह्मणून मी घेतलें. तो एका अमेरिकन् लाइफ् इन्शुअरन्स कंपनीचा क्याटलाग मी लक्षपूर्वक व आस्थेनें वाचूं लागलों. त्यांतील प्रीमियमनें मिळणाऱ्या रकमेस भागणें, त्याला वर्षांनीं गुणणें, निरनिराळ्या जातींच्या दरांची वजाबाकी करणें इत्यादि तोंडचे हिशेब करण्यांत मी कशींतरी १० मिनिटें काढलीं. इतक्यांत ग्रीक न्हाव्यापुढचें गिऱ्हाईक उठून त्यानें सार्जेटास बोलाविलें. मी माझ्या कारागिराकडे पाहूं लागलों. त्याचेंही संपतच आलें होतें. एक मिनिटांत त्यानें मला बोलावलें. मी त्याचे जवळ जाऊन त्याला प्रोत्साहन देण्याकरितां व त्यानें चांगलें काम करावें ह्मणून त्याला ह्मणालों ' You seem to be a clever man. ' (तूं हुषार दिसतोस.) तो ह्मणाला ' me very good क्काईस कतीर ' ( अरबी भाषेंत ' फार उत्तम' ) ' You must give me a nice cut and a smooth shave. ' ( तूं सफाईनें काम कर. ) मी ह्मटलें. 'Alright, me very good, never mind.' ( ठीक आहे. त्याची काळजी नको. ) तो ह्मणाला.

स्तुतीनें मनुष्यास उत्तेजन येतें पण ती पुष्कळांस पचत नाहीं. ते फुगून जातात. व भलतेंच करतात. स्तुति ही पावस्याच्या उसळीसारखी आहे. खातांना बरी लागते पण खाणाराचें पोट फुगविते. तसेंच स्तुतीसेवनानें होतें. ह्मणून सोसेल व पचेल इतकीच स्तुति कोणासही द्यावी. मी हुषार ह्मटल्याबरोबर माझा न्हावी फुगला व आपलें कौशल्य मला दाखविण्याचें वारें त्याचे अंगांत शिरलें ! प्रथम त्यानें केस कातरण्यास सुरवात केली. फणीनें डोकीवरील केस उचलून कात्रीनें तो कापीत असे. केस आखुड कापण्याकरितां त्यानें फणी माझ्या कातडींत खुपसण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण त्याला यश आलें नाहीं.

सुमारें पंधरा मिनिटें तो केस कातरीत होता. प्रथम कात्रीच्या मंजुळ आवाजानें मला बरें वाटलें. व समोरच्या आरशांत माझें रूप पाहून मी हांसतही होतों. पण असेंच किती वेळ चालणार ? शेवटीं बूटपॉलिश् करणारा एक मुलगा तेथें आला व त्याला मी माझे बुटास पॉलिश् करण्यास सांगितलें. केस कातरणें व बूटपॉलिश् एकदमच संपलीं ह्मणून बरें. नाहींतर दाढी सुरू असतां जर कां बूटपॉलिशरनें माझ्या पायांशीं ओढाताण केली असती, तर

माझ्या तोंडावर मोठमोठे घाय लागले असते. पण त्यांतून मी वांचलों. केस कातरून झाल्यावर त्यानें कसें आहे ह्मणून विचारलें. मी सांगितलें, ‘ बरें आहे. चालेल. आतां दाढी. ’

त्यानें दाढीस साबण लाविला व थोडासा माझ्या नाकातोंडांत गेला व डोळ्यांतही उडाला. पण मी नेटानें बसलों. गळ्याभोंवतीं त्यानें टॉवेल लाविला होता ह्मणून अंगावर साबण उडाला नाहीं. प्रथम त्यानें गळ्यावरील केस काढण्यास आरंभ केला. त्याचें हस्तकौशल्य पाहून मला भीति वाटूं लागली. मी लाइफ् इन्शुअर केला नसल्यानें ती द्विगुणित झाली. त्याच्याकडे पाहण्याचें मला धैर्य होईना. मी वर पहात होतों ह्मणून बरें. नाहींतर तो दिसतांच मी बेशुद्धच झालों असतों. छेः ! न्हाव्याच्या हातांत आपली मान देऊन उपयोगाचें नाहीं !

मग तो दाढीकडे वळला. माझे कान व गाल ओढून त्यानें तेथील कातडी ताणून केस काढण्यास सुरवात केली. मास्तरांनींसुद्धां शाळेंत माझे कान इतक्या जोरानें ओढले नसतील ! ते तुटले कसे नाहींत याचें मला आश्चर्य वाटतें तेथले केस काढल्यावर त्यानें मला गालावर हात फिरविण्यास सांगितलें. तेथील भाग फारच गुळगुळीत झाला होता. त्यामुळें मला आनंद झाला. व पूर्वीचें दुःख मी विसरलों ! टाकीचे घाव सोसल्याशिवाय देवकळा पावत नाहीं.

नंतर त्यानें हनुवटीवरील केस काढण्यास आरंभ केला. मुलें वेडावून दाखवितात तसे ओंठ करण्यास त्यानें दाखविलें. नंतर मुली गजग्यानीं ‘ पांचखाच ’ खेळतांना मुक्याप्रमाणें ओंठ आवळतात तसें करण्यास सुचविलें. तें झाल्यावर तोंड चंबूप्रमाणें करण्यास सांगितलें. प्रत्येक वेळीं मी आरशांत पहात होतोंच. माझ्या स्वरूपांत इतके जातिभेद असतील अशी मला कल्पनाही नव्हती ! मला मजा वाटली; पण ती फारच थोडा वेळ टिकली. कारण त्यानें माझे नाकाचा शेंडा धरून मिशांचे बाजूचे केस काढण्याचें सुरू केलें. त्यावेळीं मला समजलें कीं, हजामती करण्याशिवाय त्याचेकडे घरांतील राकेलच्या चिमण्या पुसण्याचें व त्यांत तेल भरण्याचेंही काम होतें. तसें नसतें तर

त्याचे बोटांस राकेलची घाण कां येती ? असो. हेंही मी सहन केलें. माझी दाढी फारच मऊ व गुळगुळीत झाली असल्यामुळें या हालअपेष्टांचें मला कांहीं वाटलें नाहीं. अहाहा ! सीतेच्या अंगाला कोणी ऋषिपत्नीनें दंडकारण्यांत लावलेली उटी जशी चिरकाल ताजी लावल्याप्रमाणेंच दिसे, तशी माझी दाढी नुक्तीच केल्याप्रमाणें नेहेमीं राहील काय ? पण, माझा न्हावी ऋषि कोठें होता ? महिषासुराची कृति कायम कशी राहील ? उद्यां नाहीं तर परवां मला दाढी केलीच पाहिजे. मी किंचित्काल व्यग्र झालों !

माझा न्हावी नंतर माझ्या भुंवया रेखल्याप्रमाणें कमानदार करूं लागला. त्या वेळीं त्याचें तोंड माझे तोंडासमोर आल्यामुळें मला घुसमटल्यासारखें होऊं लागलें. त्याचे श्वासाबरोबर कांदा, लसूण, मद्य, मांस, तंबाकू इत्यादि पदार्थांची मिश्र दुर्गंधि माझे नाकापुढें इतकी पसरली कीं मला उलटी होणार कीं काय असें वाटूं लागलें. Poisonous gas—विषारी वायूपासून संरक्षणाकरितां केलेले Respirators रेस्पिरेटर्स मी कां आणले नाहींत ? प्राणायाम करावयास शिकलों असतों तरी अशा वेळीं पांच मिनिटें कुंभक करून स्वतःचा बचाव केला असता ! पण आतां काय करणार ? आमच्या पूर्वजांनीं कांदा, लसूण, मद्य मांस निषिद्ध कां केलीं तें मला आतां समजलें. छेः ! इतरांनीं जरी कांदे खाल्ले तरी न्हाव्यांनीं मुळिंच खातां उपयोगाचें नाहीं असा कायदा झालाच पाहिजे.

हजारों शह लागले तरी जसा बुद्धिबळांतील राजा मरत नाहीं त्याप्रमाणें या सर्व संकटांतून बचावून मी पुन्हां स्वस्थानीं आलों. नंतर त्यानें साबणानें माझें डोकें, तोंड, स्वच्छ धुतलें व मी टॉवेलनें पुसून पुन्हां खुर्चीवर बसलों. त्यानें माझे केस विंचरून व त्यांना सुगंधी मेण लावून माझे डोक्यावर एक मध्यवर्ती भांग काढला. मी आरशांत पाहिलें तों स्त्रीप्रमाणें दिसूं लागलों. असा हिंदुस्थानास परत गेल्यावर लोक मला ओळखणार नाहींत म्हणून मी त्यास किंचित् डावीकडे कलता असा भांग काढण्यास सांगितलें. त्यानें लगेच तसा काढला. नंतर गालास व मानेस पॉवडर लावून मला झालें म्हणून सुचविलें. मी उठूं लागतांच त्यानें "बक्षिस" म्हणून हात पुढें केला. मी

मनांत ह्मणालों 'मूर्खा! तूं माझे इतके हाल केलेस आणि पुन्हां बक्षिस मागतोस!' तथापि माझ्या रागाचेंही मी संयमन केलें. व त्याचे हातावर निकेलूचें एक लहान नाणें टाकून व मालकास केस कापणावळ देऊन मी माझे मुक्कामास शिरसलामत परत आलों.

कळावें, हे आशीर्वाद. तुझे

दादा.

## ७. माझ्या कंपाउंडरची कहाणी.



[ लेखकः—कै. डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे. एम्. सी. पी. एस्. ]

अलेक्झांड्रिया. फेब्रुआरी १९१६.

माझा कंपाउंडर गरीब, सालस, प्रामाणिक, मेहनती, निर्व्यसनी व होतकरू तरुण होता. येथें आल्यावर नऊ महिनेपर्यंत त्यानें माझी चांगली बरदास्त ठेविली होती. पण कांहीं तरी चूक काढून नोकर लोकांस वारंवार झाडल्याशिवाय ते आपलें काम बरोबर करीत नाहींत अशी माझी समजूत—नव्हे ठाम मत—असल्यामुळें बरेच वेळां कांहीं कुसपट काढून मी त्याची कान-उघाडणी करीत असें. एके दिवशीं माझ्या सकाळच्या कोकोंत साखर थोडी कमी झाली होती. खानावळींतील जेवणास मी फारच कंटाळलों होतों, व माझ्या कंपाउंडरनें स्वयंपाक करून आपण जेवावें ह्मणजे अन्न चांगलें मिळून खर्चही कमी येईल असें मला वाटत असे. त्याप्रमाणें व्यवस्था करण्यास सांगण्यास ही संधि बरी चांगली आहे असें समजून मी बोलण्यास सुरवात केली. मी ह्मणालों:—

"हें पहा! कंपाउंडर, यांत साखर किती कमी घातली आहे? तुह्मी फारच निष्काळजीपणें काम करतां. कोको करतांना तुमचें लक्ष ठिकाणावर नव्हतेंसें दिसतें. असला कोको तुह्मांला तरी पिवेल कां? खानावळींत जेवून माझा जीव आधींच रंजीस आला आहे व घरीं यावें तर हा प्रकार! हें मला मुळींच पसंत नाहीं. तुह्मांला स्वयंपाकाची माहिती आहे, मग हें असें कां

करतां ? तें कांहीं नाहीं, आजपासून तुह्मी दोन वेळां मजकरितां स्वयंपाक करण्यास सुरवात करा. माझा कुकर आहे, व स्टोव्हही आहे. काय लागेल ती सामुग्री येथें सर्व मिळते. ती आणा व आरंभ करा त्यावांचून तुमची सुधारणा होणार नाहीं. केल्याशिवाय काम येईल कसें ? आज दुपारीं जेवण तुह्मीं करून मला वाढलें पाहिजे. ”

कंपाउंडर माझें भाषण मान खालीं घालून ऐकत होता त्याचें अंतःकरणांत विचारांचें काहूर माजल्यासारखें त्याचें चेहऱ्यावरून दिसत होतें. परस्परविरोधी विचारांनीं बिचाऱ्याची फारच धांदल उडविली होती. तो बोलेना, ह्मणून “कां ? बोलत कां नाहीं ? मी काय ह्मणतों तें समजलें ना ?” मी विचारलें. “होय, साहेब !” तो ह्मणाला, “पण मला काय वाटतें तें आपणांस कळवावें अशी माझी इच्छा आहे. यानंतर मी आपणांस माझें ह्मणणें ऐकण्याचा त्रास कधींहि देणार नाहीं. आपली परवानगी असल्यास सांगतों.”

हें त्याचें बोलणें व आविर्भाव कांहीं विचित्र वाटल्यामुळें व याचें मनांत काय आहे तें तरी पाहूं या अशा हेतूनें मी त्यास परवानगी दिली. त्यावर तो ह्मणालाः—

“ साहेब ! आपला व माझा जवळ जवळ दोन वर्षांचा परिचय आहे. या काळांत मी आपले सर्व हुकूम पाळीत आलों आहें व आपली कधींही अवज्ञा केली नाहीं. माझ्या मनाची खरी स्थिति काय आहे तें आपणास कळवावें हा माझा हेतु आहे, व आपण माझें भाषण शांतपणें ऐकून घ्याल अशी आशा धरून प्रथमपासून सर्व हकीकत मी सांगतों. विस्ताराबद्दल मी आपली माफी मागतों. ”

“ हं, सांगा. ” मी ह्मणालों.

तो ह्मणालाः—“ मी जानेवारी १९१४ चे आरंभीं आपलेकडे दरमहा १५ रुपयांवर नोकरीस राहिलों. आपण त्यावेळीं कोल्हापूर येथें नवीनच डिस्पेन्सरी काढली होती. जसजसें प्रॅक्टिस वाढत जाईल तसतसा तुमचा पगारही वाढत जाईल ह्मणून आपण मला अभिवचन दिलें. मी व माझी बायको मिळून एका भाड्याचे घरांत राहून मी आपलें काम करीत होतों. पहिल्या

महिन्यांत रु. ५० पेक्षां जास्त प्राप्ति आपणांस झाली नाहीं, व तितका सर्व पैसा आपले प्रपंचास खर्च झाल्यामुळें, माझा पगार दुसऱ्या महिन्यांत देऊं ह्मणून आपण मला सांगितलें. माझी खर्चाची ओढाताण असल्याचें आपणांस कळविल्यावर आपण मला १० रुपये देऊन सांगितलें कीं, ' हें पहा, कंपाउंडर. माझ्या भरभराटीवर तुमची भरभराट अवलंबून आहे. तुह्मी पेशंट मजकडे आणले पाहिजेत जिकडे तिकडे माझें नांव प्रसिद्ध केलें पाहिजे. त्याशिवाय तुमची स्थिति सुधारणार कशी ? ' मला तें खरें वाटून मी त्याप्रमाणें प्रयत्न सुरू केले.

" दुसऱ्या महिन्यास आपलें प्रॅक्टिस १२५ रुपये झालें. माझा पगार मला मिळाला. नंतर आपण शाहूपुरींत आपल्या दवाखान्याची एक शाखा काढली. सकाळीं कोल्हापुरांत व संध्याकाळीं शाहूपुरींत याप्रमाणें मी काम करण्याचें ठरलें. पगार तोच होता. आपलें प्रॅक्टिस झपाट्यानें वाढत चाललें, पण तिसऱ्या महिन्यास वसूल १५० रुपये झाला, व लोकांकडे बाकी ७।८ शें रुपये राहिली. मग आपण मधल्या वेळांत बिलें तयार करून तीं वसूल करण्याचें काम सांगितलें. मी तेंही करूं लागलों.

" शाहूपुरींत भाजी स्वस्त मिळते, येतांना कधीं कधीं घेऊन येत चला, ह्मणून बाईसाहेबांनीं सांगितल्यावरून ४।५ वेळां आणतांच रोज तेथील भाजीच पसंत पडूं लागली. मग रोज, एक दिवस भाजी व दुसरे दिवशीं भाजी व लोणी, याप्रमाणें आणण्याचा नित्यक्रम सुरू झाला. हळुहळु आपले घरीं लागणारें सर्व धान्य, लांकूडफांटा, मीठमसाला वगैरे सामान आणणें मजकडेच आलें. व त्याबरोबरच पैशाचा हिशेब ठेवणेंही भाग पडलें. मी डिस्पेन्सरीपासून दूर रहात असल्यामुळें दवाखान्यांतील व विशेषेंकरून या खाजगी कामास अडचण पडूं लागली, ह्मणून आपण मला दोन खणांची खोली आपले घरांत दिली. त्या खोलींत आह्मी नवराबायको रहात असूं. या जागेच्या भाड्याबद्दल दरमहा रु. १ माझे पगारांत कमी होत असे. मी घरांतच राहूं लागल्यानें सर्व कामें चांगलीं होऊं लागलीं, व हरप्रसंगीं माझा उपयोग होऊं लागला. आपले धान्यसामुग्रीबरोबर माझेंही सामान माझ्याच खर्चानें कां होईना, पण मला आणतां येऊं लागलें. मला घरची ह्मणून निराळी काळजी वाटेनाशी झाली. माझ्या बायकोलाही गृहकृत्यांतील शिक्षणाची सोय झाली.

" गावांत कोठेंही दूध चांगलें मिळत नाहीं, सबब आपण एक म्हैस' घेतली. तिची सकाळ संध्याकाळ धार काढण्याचें काम मजसारखें दुसऱ्या कोणास साधेना, म्हणून तें मीच करूं लागलों. माझ्या बायकोनें म्हशीला चारा-पाणी करण्याचें पतकरलें. तिला गवत, कडबा, धान्य, पेंड, काय लागेल तें बाजारांतून आणण्याचें मीच करावयाचें ठरलें. ही व्यवस्थाही उत्तम चालूं लागली.

" आठपंधरा दिवसांनीं दुकानांतून खण, लुगडीं घरीं दाखविण्याकरितां आणणें, व पसंत नसलेलीं परत करून लागल्यास दुसरे नमुने आणणें, लहान मुलांचे कपडे बेतण्याकरितां कापड व शिंप्यास घरीं आणणें, बांगड्या भरणारा कासार व लुगड्यांवर खडी काढणारे यांस बोलावणें, धोब्याकरितां कपडे काढून त्यांचा हिशेब ठेवणें, भांड्यांस कल्हई लावून आणणें, आपले घरीं मित्रमंडळी जमली असता त्यांचे चहाची व्यवस्था ठेवणें, मुलांस फिरावयास नेणें व खेळविणें, (—हें काम माझी बायकोच करीत असे—) सोनार दागिने तयार करीत असतां त्याचेवर गुप्त व बारीक नजरेनें पहारा करणें, मोलकरीण आजारी असतां गिरणीस धान्य नेऊन दळून आणणें, वगैरे कामें मजकडेच येत व तीं मीं आपलेंच घर समजून करीत असें.

" आपलें प्रॅक्टिस वाढत चाललें व सहा महिन्याचे शेवटीं रोख वसूल रु. ३०० होऊं लागला. माझा पगार आज वाढेल, उद्या वाढेल या आशेनें मी सहा महिने काढले, व आपलें नांव सर्व कोल्हापूरभर करून उत्तम प्रॅक्टिस जमविलें. तें इतकें कीं, आणि तीन महिन्यांत दरमहा रु. ६०० पडूं लागले. एकदां मी प्रमोशनबद्दल विनंति केली तेव्हां आपण म्हणाला, ' मी तुम्हाला प्रमोशन देणार आहें, पण तुमचें काम अझून माझ्या मनासारखें होत नाहीं. यापेक्षां जास्त मेहेनत तुम्हीं घेतली पाहिजे. अजून कितींतरी बिलें वसूल व्हावयाचीं पडलीं आहेत. लोकांकडे येणें असलेला पैसा तुम्ही उत्पन्न म्हणून समजतां काय ? छे:, तुम्हीं चुकतां. जो पैसा आपले हातीं आला, तोच खरा. वसुलीचें काम तुम्हांस याहून झपाट्यानें केलें पाहिजे. कामास तयारी नाहीं आणि प्रमोशन मागतां याचें मला आश्चर्य वाटतें ! तुम्हीं दोघां नवराबायकोंनीं ८।१० रुपयांत संसार भागवून महिना ४।६ रु. तरी शिल्लक टाकले पाहिजेत.

सध्यां तुमचेपाशीं काय शिल्लक आहे सांगा. कांहीं नाहीं. बायकोचे अंगावर दागिना तरी? तोहि नाहीं. अशा उधळेपणानें जर तुह्मीं वागूं लागलां तर प्रमोशनचा पैसाहि पाण्यांतच जाणार. मी तुह्मांला तूर्त प्रमोशन देत नाहीं. तुह्मी त्याला पात्र आहांत, असें माझ्या नजरेस आल्यानंतर तुह्मीं न मागतांच मी तें तुह्मांला देईन.' झालें! मी गप्प झालों.

"एक दिवस मोलकरणीनें डिस्पेन्सरींतील केर काढला नाहीं, याबद्दल मी तिला रागें भरूं लागलों. तिनें मला उर्मटपणानें उत्तरें दिलीं, याबद्दल मी आपणांकडे तक्रार केली असतां आपण ह्मणालां — 'कंपाउंडर, डिस्पेन्सरींतील स्वच्छतेबद्दल तुह्मी जबाबदार अहांत. प्रत्येक काम आपण स्वतः केल्याशिवाय चागलें होत नाहीं. मोलकरीण झाडतांना एखादा ग्लास किंवा औषधाची बाटली फोडील, मग कोणाचें नुकसान होईल? तिला औषधांसंबंधीं काय समजतें? असल्या मूर्ख लोकांना आपण डिस्पेन्सरींत येऊं देऊं नये. ही व्यवस्था तुह्मींच केली पाहिजे. असें असून तिचे विरुद्ध तक्रार तुह्मी मजपुढें आणतां याला काय ह्मणावें?' त्यानंतर डिस्पेन्सरींतील झाडलोट रोज मी करूं लागलों.

"नंतर दोन महिन्यांनीं शहरांत प्लेगचा प्रादुर्भाव होऊं लागला. आपण झोंपडी बांधविली. तिचें काम बरोबर चाललें आहे कीं नाहीं हें मीच पहात होतों. ती तयार झाल्यावर, मी काय करणार ह्मणून आपण मला विचारलें, 'तुमच्याजवळ स्वतंत्र झोंपडी बांधण्यास पैसे आहेत काय?' मजजवळ पैसे कुठले असणार? मी ह्मणालों 'नाहींत, साहेब!' 'तर मग तुह्मी येथें गावांतच रहा, इनॉक्युलेशन करून घ्या ह्मणजे झालें. येथें राहिल्यानें तुह्मांला डिस्पेन्सरींत काम करण्यास सोपें जाईल.' मी सहकुटुंब इनॉक्युलेशन करून घेऊन घरींच राहिलों.

"मग दिवाळी आली. दिवाळींत तरी मला प्रमोशन मिळेलसें वाटलें, पण तसेंही माझ्या कमनशीबानें झालें नाहीं. आपलें प्रॅक्टिस पुष्कळ वाढल्यामुळें बिल्कलेक्टिंगला दुसरीं कामें संभाळून मला वेळ मिळेना. व रोगी लोकांचीं घरें इकडे तिकडे अफाट प्रदेशांत पसरलेलीं असल्यामुळें, पायीं चालून काम फार थोडें होई व वेळ पुष्कळ लागे. ह्मणून आपण २५ रुपये मला

देऊन सांगितलें कीं ' याची एक सायकल घ्या. ' एवढ्या रकमेंत सायकल कशी मिळेल ह्मणून मी विचारिलें. ' पंचवीस रुपयांत सायकल मिळणार नाहीं, हें मला ठाऊक आहे, पण जास्त लागतील ते पैसे हप्त्यानें तुह्मीं फेडा. दरमहा रु ५ प्रमाणें दिल्यास एक वर्षांत सायकल तुमचीच होईल. ' मला सायकल काय करावयाची ? आपल्या रोग्यांकडून पैसे वसूल करण्याकरितां तिची जरूर होती. आपणच जर मला एक सायकल घेऊन दिली असती तर मी आपले आभार मानून झटून कामास लागलों असतों. लढाईमुळें महागाई वाढून माझे पगारांतून माझा घरखर्च जेमतेम भागत असल्यामुळें मला आपण सुचविल्या-प्रमाणें सायकल घेणें शक्य वाटेना, ह्मणून मी आपली रक्कम परत केली.

" प्लेग कमी झाल्यावर आपण परत घरीं येण्याचें ठरविलें. आपण मंजूर केलेल्या पैशास घर सारविण्यास कोणी इसम तयार होईना, ह्मणून मीच तें आपलें घर समजून सारवून काढलें व चुनाही लाविला. पण त्याबद्दल माझे कोणी आभारही मानले नाहींत, कीं माझ्या श्रमाचें चीज केलें नाहीं. पैशांनीं नसलें तरी निदान गोड शब्दांनीं मला बक्षिस मिळावयास पाहिजे होतें. पण पडेल तें काम करणें हें माझें कर्तव्य ठरलें !

" वर्षाअखेर डिसेंबरमध्यें आपलें प्रॅक्टिस दरमहा १२०० रुपये पडूं लागलें. ड्रेसिंग, ऑपरेशनची रोग्याचे घरीं केलेली तयारी वगैरेंबद्दल पेशंट लोक मला कधीं कधीं स्वतंत्रपणें, आपखुषीनें बक्षिस देत असत ती रक्कम माझे पगारांतून आपण कांपून घेत नव्हतां याबद्दल मी आपला फार आभारी आहें.

" नंतर आपणांस या लढाईच्या आणीबाणीच्या प्रसंगीं, सार्वभौम-सरकारचे उपयोगीं पडण्याची इच्छा झाली. आपली नेमणूक होऊन जाण्याचे नक्की झाल्यावर मला आपण बरोबर येण्यास सांगितलें. आपण ह्मणालां, ' हें पहा, कंपाउंडर. सरकारी खर्चानें निरनिराळे देश पहाण्याची ही उत्तम संधि मी तुह्मांस आणून दिली आहे. जन्मभर नोकरी केलीत तरी असले सुधारणेच्या शिखरास पोचलेले देश पहाण्यास लागणारा पैसा तुमचे जवळ सांठ-णार नाहीं. निरनिराळे देश फिरल्यानें मनुष्य चतुर होतो. पुष्कळ गोष्टी तुह्मी सहज शिकाल. तुमची सुधारणा होण्यास ही उत्तम संधि आहे. व

इतकें होण्यास एक पैचाही खर्च नाहीं. उलट तुह्मी पुष्कळ पैसा सांठवाल. कपडेलत्ते व जेवण सरकारांतून मिळेल. मग तुह्मांस दुसरा खर्च काय आहे ? मी तुह्मांस २० रुपये पगार देईन. अशी सोन्यासारखी संधि पुन्हां येणार नाहीं. हिचा फायदा घेणें तुमचेवर अवलंबून आहे. मग तुह्मी मजबरोबर येतां ना ? इकडील तुह्मांस काळजी नको. तुमची बायको आमचे घरींच राहील. किंवा वाटल्यास तुमचे आप्तेष्टांचे घरीं ठेवा. पण तुह्मांस आप्त तरी कोण आहे ? मी योजलेली व्यवस्था उत्तम आहे. तुह्मी मजबरोबर चला. यांत तुमचें कल्याण आहे.' मला हें खरें वाटून मी 'हो.' ह्मणालों

"मी परदेश पाहूं शकेन ह्मणून मला आनंद झाला. आगबोटींत बसल्यावर समुद्राची शोभा पाहून मला बरें वाटलें. येथें आल्यावर कामाची बरीच दगदग सुटल्यामुळें व या देशांतील भपक्यामुळें मी फार खुष झालों. आपण खानावळींत जेवणास जाऊं लागलां, व मी दुसऱ्या लष्करी लोकांत जेवत असें. माझे जेवणाचे हाल होत आहेत असें मलासुद्धां वाटलें नाहीं. पण पुढें ही स्थिति बदलली. मला फार कंटाळवाणें वाटूं लागलें. या देशाची भाषा येत नाहीं, कोणी मित्र नाहीं, प्रत्येक जिन्नस महाग, लष्करी कायद्यापुढें हिंडण्याफिरण्याची बंदी, वाचावयास पुस्तकें नाहींत, व आपल्या खासगी नोकरी-शिवाय दुसरें काम नाहीं, मग वेळ जावा कसा ? आपण तरी प्रेमानें चार शब्द माझेशीं बोलाल ह्मणावें तर तेंही नाहीं ! आपण माझेबद्दल असंतुष्टसे दिसतां.

"येथें आल्यापासून मी आपले कपडे साफ ठेवणें खोलींतील केर काढून सामानसुमान व्यवस्थित मांडणें, आपणांस हात, तोंड धुण्याकरितां पाणी, साबण, टावेल वगैरे तयार ठेवणें, पट्टा व बूट साफ करून त्याला पॉलिश करणें, सकाळीं व संध्याकाळीं कोको तयार करणें, रोज दाढी करणेच्या वस्तऱ्यास धार लावणें, पैशाचा हिशेब ठेवणें, धोब्याकडे कपडे नेणें व धुतल्यावर आणणें, आपणा-करितां बाजारांतून बिस्किटें व फळफळावर वगैरे आणणें, धोतर व हातरुमाल रोज धुणें, बिछाना झाडून घालणें, व आपण दमून भागून आल्यावर आपले कपडे उतरणें व अंग रगडणें, कांहीं ताप डोकें उद्भवल्यास सर्व शुश्रूषा करणें, कांहीं सरकारी कामाच्या नकला वगैरे करणें असल्यास त्या करणें, पाकिटांवर पत्ते लिहिणें, कांहीं कपडे फाटल्यास किंवा बटणें तुटल्यास तीं शिवणें, वगैरे

हरएक काम आपण सांगाल तें बिनतक्रार करीत आलों आहें, पण आपण एक शब्दानेंसुद्धां कधीं खूष असल्याचें दर्शविलें नाहीं, व मला उत्तेजन दिलें नाहीं. उलट आपणांस माझा कंटाळा आल्यासारखा दिसतो.

" माझे बायकोचे जेवणाबद्दल माझे पगारांतून आठ रुपये कापले जातात. मग मला येथें राहून काय फायदा आहे ? आपली वागणूक व्यापारी दृष्टीनें बरोबर असेल, पण मनुष्य ह्मणजे कांहीं यंत्र नव्हे ! त्याला मन व विचारशक्ति आहे. माझ्या कामाचे जर आपणांस कांहींच वाटत नाहीं, तर मी काम करणार कसा, व मला उत्साह कसा राहील ? पैशाकडूनही फायदा नाहीं व कामाचें चीज नाहीं. आतां मला आपण स्वयंपाक करण्यास सांगतां. मी स्वयंपाक कधीं केला नाहीं. व मी गरीब असलों तरी कंपाउंडर आहें, स्वयंपाकी नाहीं. करितां, आपली आज्ञा मला नाइलाजास्तव मोडावी लागते. माझी स्थिति अशीच राहणार असेल, तर आपली नोकरी करणें मला शक्य नाहीं. मग हाच आपणांस माझा नमस्कार ! मी आज संध्याकाळीं आपला निरोप घेण्यास येईन, त्या वेळीं आपण आपलें मत मला कळवावें. या वेळीं मी विचार करण्याच्या स्थितींत नाहीं. माझें हृदय दुःखानें भरून आलें आहे. इतक्या इमानेंइतबारें नोकरी करून, त्याबद्दल मालकाला जाणीवसुद्धां नसावी हें माझें मोठें दुर्भाग्य होय ! मला आतां बोलवत नाहीं. मजवर दया असू द्या ! "

इतकें बोलून तो निघून गेला. रोग्यांनीं पुष्कळ वेळां सांगितलेले कंटाळवाणे इतिहास ऐकण्याची मला संवय असल्यामुळें, मी त्याचें बोलणें ऐकून घेतलें. खरोखरच हें विचार करण्यासारखें नाहीं काय ?

---

## ८. समुद्राचे कांठावर—

( लेखकः—कै. डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे, एम्. सी. पी. एस्. )

अलेक्झांड्रिया. श्री. ता. ६-१२-१९१५

चि. रामभाऊ यासः — अनेक आशीर्वाद, उपरी विशेष, मी येथें सुखरूप आहें.

एक दिवस बरेंच काम पडल्यामुळें मला दमल्यासारखें वाटलें; व नित्या-प्रमाणें सायंकाळीं मी समुद्राचे किनाऱ्यावर जाऊन बसलों. त्यावेळीं सूर्यास्ताचा समय असल्यामुळें सूर्य अत्यंत शांत पण लालबुंद दिसत असून समुद्रांत बुडतो आहेसा भासत होता. सर्व दिशा रक्तवर्ण होऊन त्याच्याविषयीं सहानुभूति दर्शवीत होत्या. चहूंकडे एकप्रकारचा उदासपणा पसरला होता. स्वत: समुद्र लाटांच्या रूपानें हुंदके देत आहेसा दिसला ! वाऱ्यानें आपला वेग आवरून मंदपणानें वाहण्यास सुरवात केली होती. जणूं काय, सूर्य बुडाला तर आपण कोणता मार्ग स्वीकारावा असा तो विचारच करीत आहे. पृथ्वी मात्र तटस्थ वृत्ति स्वीकारून राहिली होती.

मी तट-स्थच असल्यामुळें प्रथम पृथ्वीकडे पाहूं लागलों. सूर्याचा अध:पात पाहून तिलाही दु:ख होत असावें. तिचेवरील हालचाल व व्यापार मंदावला होता. सूर्यापासून आतां आपणास प्रकाश मिळणार नाहीं असें दिसतांच तिनें स्व-राज्यांत प्रकाशाचे कारखाने काढले. हजारों-लाखों लहान-मोठ्या कारखान्यांतून सुद्धां सूर्यापासून येत होता तितका प्रकाश उत्पन्न होईना. तेव्हां पुष्कळ लोक बेरोजगार झाले. तरी तिनें त्या सर्वांकरितां जेवण्याखाण्याची व्यवस्था करण्यास सुरवात केली होती. धीर धरा, निस्तेज होऊं नका, शक्य तितका मी तुमच्याकरितां प्रयत्न करीत आहें, असें जाहीरनामे लावून आकाशस्थ प्रकाशनिधींकडे, प्रजेच्या कल्याणार्थ शक्य ती मदत पाठविण्याची मागणीही केली होती. अशा अडचणीच्या वेळीं होतां होईल तों कोणी आपलें घर सोडून बाहेर जाऊं नये व गेले असतील त्यांनीं परत फिरावें अशीही सूचना केली होती. पण या पोक्त सूचनेकडे दुर्लक्ष करून कित्येकजण तारुण्यमदाच्या धुंदींत आपण होऊनच बाहेर पडले होते. परमेश्वर यांना क्षमा करून सुखरूप ठेवो अशी मी प्रार्थना केली.

मग मी समुद्राकडे पाहिलें. पृथ्वीप्रमाणेंच तोही उदासीन दिसत होता. सूर्याच्या पतनामुळें आपलें फार नुकसान होणार ह्मणून दु:खातिरेकानें त्याचें हृदय भरून आल्याप्रमाणें दिसत होतें. त्याचें स्वरूप आपलें साधें, बाळबोध व सपाटच होतें. पृथ्वीच्या पाठीवरील उंच उंच मनोरे व इमारती निरनिराळ्या

वृक्षांचे बाग, व्यवस्थित रचना, वगैरे चित्रविचित्र सुधारणा त्याचे पाठीवर नव्हती. तो अनंत कालापासून जसा आहे, तसाच आहेसें दिसलें. प्रकाश आपणास मिळणार नाहीं ह्मणून तो हळहळत होता; पण प्रकाश तयार करण्याचे कारखाने त्यानें काढले नाहींत. अनंत जीवांना आधारभूत असून त्यानें त्यांच्याकरितां कांहीं तजवीज केली नाहीं. 'आलिया भोगासि असावे सादर' असा उपदेश करून स्वस्थ बसला ! लहान लहान लाटांच्या सभा भरवून व दुखवट्याचे ठराव पास करून त्यानें सहानुभूति दर्शविली. कांहीं ठिकाणीं थोडी चळवळही केली पण स्वहित कांहींच साधलें नाहीं. पृथ्वीपेक्षां सुधारणेचे बाबतींत बिचारा फारच मागें होता. प्रकाशाकरितां सर्वस्वीं सूर्यावर अवलंबून. सूर्य गेला कीं हिंदुस्थानांतील विधवेप्रमाणें बिचारा दुसऱ्यांच्या तोंडाकडे पहात करुणाजनक स्थितींत काल कंठणार ! कोणी वाली नाहीं, कीं कोणी पाठिराखा, मदत करणारा, प्रेमळ मित्र नाहीं ! किंबहुना समुद्र हिंदुस्थानासारखाच आहे. प्राण गेला तरी दुसऱ्यांचें अनुकरण करणार नाहीं. स्वमर्यादा सोडून बाहेर जाणार नाहीं. परिस्थितीप्रमाणें पालटणार नाहीं किंवा नवीन सुधारणा करणार नाहीं. कितीही लोक पाठीवर चढले तरी त्यांना क्षमाच करील. पाहिजे त्यानें त्याचे राज्यांत इतस्ततः फिरावें. कांहीं माथेफिरू जलचर एखादे वेळीं हल्ला करतील, पण त्यांना हुसकून लावण्यास किती वेळ ? स्वतंत्रतेची दगदग त्याला नको. आपणापेक्षां नीच कोणीही नसावें हीच त्याची महत्वाकांक्षा ! यदृच्छेनें मिळेल त्यांत संतुष्ट असणारा असा दुसरा कोणीही नसेल ! प्रगतीचें वारेंही तो आपणास लागूं देत नसे !

नंतर वारा येऊन माझीं वस्त्रें हालवून आपलें अस्तित्व प्रकट करूं लागला. हा मात्र मोठा बिलंदर दिसला घटकाभर समुद्रास आपला मित्र करून त्याचें अंत:करण हालवी, तर लगेच पृथ्वीकडे येऊन तिच्यावरील वृक्षास डोलवी. क्षणभरानें कोठें नाहींसाच होई. एक एक वेळीं अंगांत आल्याप्रमाणें नाचूं-फिरूं लागे, व कुत्र्यासारखा प्रत्येकाचे अंगावर जाई ! तर दुसरेवेळीं हळु हळु गीत गात प्राणिमात्रांना रंजवी! हा आतां काय करील याचा कोणास नेम लागत नसे. एकाचें दुसऱ्यास, त्याचें भलत्यास, असें देऊन, तो दानशूर व दरवडे-खोर ह्मणून प्रसिद्ध होता ! स्वार्थ नसल्यामुळें विदेह स्थितींत असल्याप्रमाणें

त्याचें आचरण दिसे. चंचलपणा हा त्याचा विशेष होता. आळस त्याला आवडत नसे. भेटणाऱ्यांच्या मनांत तो प्रसन्नता व उत्साह उत्पन्न करी. त्याच्यावर कोणाचें प्रेमही नव्हतें, व कोणी त्याचा द्वेषही करीत नसे. नेहमीं खेळकर व मजेंत काल घालविणारा तो एक होता.

सूर्य यावेळीं अगदीं बुडत होता. अहाहा! बा सूर्या! यावेळीं तुला कोणीच आधार कां देत नाहींत! पृथ्वीनें तर तुझी पर्वाच सोडली. यावेळीं तूं कसा शांत व गोड दिसतो आहेस. सकाळीं मी तुला पाहिलें त्यावेळीं तूं आपले मृदु प्रतिभासंपन्न कर मजपुढें केलेस, जगांतील चमत्कार मला दाखविलेस ह्मणून तुला आपला मित्र करावेंसें मला वाटलें. शीतनिवारण, अंधकारनिर्मूलन, इत्यादि प्रकारांनीं तूं माझ्या उपयोगींही पडलास. पण हळूं हळूं तूं आपला विस्तार वाढवून ' भटाला दिली ओसरी आणि तो पाय पसरी ' असें केलेंस. जशी तुझी भरभराट होत गेली, तसतसा तूं जास्त प्रखर झालास. दुपारीं तर तिन्ही लोक व्यापून टाकलेस. तुझ्या उग्रपणाची कमाल झाली! कोणाची तुजकडे डोळे उघडून पहाण्याची छाती नव्हती. तूं करशील ती पूर्वदिशा असा तुझा दरारा चहूंकडे बसला होता! पण तुझ्या वाढीलाही सीमा आहेच. ' चक्रनेमिक्रमा 'प्रमाणें तूंही आतां खालीं पडतो आहेस. समुद्राचें पाणी शोषून तूं आपलें घर भरलेंस, तरी आतां पडत्या काळीं समुद्रच तुझें विश्रांतिस्थान दिसतें! बाबा! आतां कृतकर्माबद्दल जरी तुला वाईट वाटत असलें, व जरी तूं सकाळच्या प्रमाणेंच पुन्हां सुंदर व मृदु झाला आहेस तरी आतां तुझें पतन कसें चुकणार? तुझ्या भरभराटीच्या दिवसांत जर तूं इतरांशीं प्रेमानें वागला असतास, तर तुझ्यावर आतां हा प्रसंग आलाही नसता, व आला असता तरी सर्वांनीं तुला आधार दिला असता, मदत केली असती. तुझें तूंच नुकसान करून घेतलेंस. असो, आतां उद्यां तरी तूं सुधारण्याचा प्रयत्न कर!

आणि, हे ढग जे तूं जमा केलेस, ते तरी आतां तुजबरोबर कोठें येत आहेत? ते पृथ्वीवर आणि समुद्रावरच रहाणार! इतका लोभ धरून निर्दयपणें समुद्रापासून लुटलेलें पाणी आतां तुजजवळ कोठें आहे? हा पहा. सर्वांशीं गोडीनें वागणारा व यथेच्छ अमृत सिंचन करणारा चंद्र तुजपेक्षांही लोकांस

जास्त आवडतो. तसेंच, हे कोट्यवधि तारे आतां एक प्रजासत्ताक राज्य स्थापून चंद्राला प्रेसिडेंट नेमतीलही ! पहा. ही लहानशी, मासे मारणाऱ्या कोळयाची नौकासुद्धां तुला आतां आच्छादून लोकांचे दृष्टीआड करूं शकते. एकंदरींत वैभव क्षणभंगुर आहे यांत संशय नाहीं. जितक्या वेगानें तूं वैभव शिखरावर चढलास, त्यापेक्षां जास्त वेगानें तूं आतां पडतो आहेस. ईश्वर करो आणि तुझा ... ... ! इतक्यात माझ्या एका मित्रानें माझ्या खांद्यावर हात टाकला. मी चमकून मागें पाहिलें व त्याला माझेजवळ बसवून इकडच्या तिकडच्या सपाटून गप्पा मारण्यास सुरवात केली.

कळावें, हे आशीर्वाद. तुझे

दादा.



# वाङ्मय-श्री-खण्ड



## पद्य-विभाग

### ( प्राकृत )

### ईशस्मरण

[ जाति- श्रीरङ्ग ]

ईश्वरा ! असशि तूं कसा ? हें न मानसा आकळें माझ्या ।
मी गात यथामति अगम्य तव लीला ज्या ॥ ध्रु० ॥

आकाशीं तारकाराशि अमृतमय शशी, दिव्य तो भानू ।
चिच्छक्ति तुझी ती केंवि विभो ! मी वानूं ? ॥ १ ॥

मंदिरीं भुवनसुंदरी, हर्षनिर्झरी, इंदिरा राहे ।
आनंदकंद ! तव वैभव कवणा लाहे ? ॥ २ ॥

सद्गुणी, मधुरभाषिणी, सुधावर्षिणी, सूनृता वाणी ।
ती जणों राहते तुझ्याच ठायीं रमणी ॥ ३ ॥

शिव सांब, सुखद हेरंब, भक्तिचे स्तंभ, देवता त्याही ।
हे अनंतशक्ते ! अनंत रूपें तव हीं ॥ ४ ॥

श्रीधरा ! चमत्कृतिपरा सृष्टि, विभुवरा ! भुलवि कविहृदयें ।
ती वाचस्पतिसिहि वर्णन करितां ना ये ! ॥ ५ ॥

गोविंद गावया छंद, सच्चिदानंद सद्गुरो ! मजला ।
द्या, हीच विनंती 'राम' कराया सजला ॥ ६ ॥

—रामचंद्र चिंतामण श्रीखंडे.

कविः—कै० डॉ० **शंकर चिंतामण श्रीखंडे,** एम्. सी. पी. एस्.
यांच्या कविता.

## १. श्रीकृष्णाचा पाळणा.

जाति—उपचंद्रकांत

[ 'गौळण सांगति गाऱ्हाणीं ' या चालीवर. ]

पाळणीं निजवुनि यदुराणा । यशोदा हलवी, करि गाना ॥ ध्रु० ॥
गोकुळवासि गोपनारी । प्रभाते सारवुनी द्वारीं ॥
काढिति रंगवल्लि कुसरी । चित्रें चित्रविचित्रपरी ॥
ध्यानीं आळविति कंसारी । तुजविण शीणचि संसारीं ॥
यास्तव धांव, पाव, नरहरी ! । धांवा करिति नित्य यापरी ॥
आरंभिति मग दधिमंथना । यशोदा हलवी, करि गाना ॥ पाळणीं० ॥१॥

पहांटे उठे नंदराणी । यशोदा माय सुगुणखाणी ॥
घालुनि अलंकार लेणीं । दासी घालि तिची वेणी ॥
तोंवरी उठे चक्रपाणी । भरविलें त्यासि दूधलोणी ॥
माखुनि नाहविला त्यांणीं । निजाविला पाळणिं आणोनी ॥
परि तो रडतां राहीना । यशोदा हलवी, करि गाना ॥ पाळणीं० ॥२॥

"निज निज बाळा ! वेल्हाळा ! । दारीं बागुल रे ! आला ॥
दशभुज पंचवदन भोळा । गळ्यामधिं रुळति रुंडमाळा ॥
तिसऱ्या नेत्रिं महा ज्वाळा । विषानें कंठ दिसे काळा ॥
भयप्रद वाटे कळिकाळा । देउं तुज त्यासि काय ? बाळा ! "
नायके हट्टि देवराणा ! । यशोदा हलवी, करि गाना ॥ पाळणीं० ॥३॥

गात मग सप्तम अवतार । " दशरथ राय, पुत्र चार ॥
रामलक्ष्मण भरत वीर । शत्रुघ्न; सकळ वंद्य चतुर ॥
उतरावया भूमिभार । मानवलोकीं अवतार ॥
खेळुनि बहुत वर्षे चार । कौतुक दाखविलें फार " ॥
आवडे स्वचरित देवमना । यशोदा हलवी, करि गाना ॥ पाळणीं० ॥४॥

"पांचवे वर्षीं ब्रह्मर्षी । विश्वामित्र तपोराशी ॥
येउनी वदे नृपापाशीं । 'दे' ह्मणे, 'रामलक्ष्मणांसी ॥
करिति हे यज्ञरक्षणासी । कासया चिंतार्णविं बुडशी? ॥
जन्मले विष्णुचेच अंशी । ह्मणुं नको 'नाहिं!' देइं मजसी' ॥
गेला घेउनि दोघांना!" । यशोदा हलवी, करि गाना ॥ पाळणीं० ॥५॥

"मार्गीं ताटिकेसि वधिली । मखाचीं विघ्नें परिहरिलीं ॥
मग मिथिलेसि वाट धरिली । पदरजें शिळाहि उद्धरिली! ॥
स्वयंवरीं सीता परिणियली । रावणवदनिं धुळी भरली! ॥
आले अयोध्येसि; झालीं । जनमुखें, कमळें जशिं फुललीं!" ॥
प्रेमें ऐके निजवर्णना । यशोदा हलवी, करि गाना ॥ पाळणीं० ॥६॥

"राज्याभिषेक रामाला । निश्चय केला करण्याला ॥
परि कैकयी द्वयवराला । मागे राज्य निजसुताला ॥
सीतारामलक्ष्मणांला । पाठविलें वनवासाला! ॥
सर्वजन शोकार्णविं बुडला! । दशरथ निजधामा गेला! ॥
भरतहि सेवि महाविपिना!" । यशोदा हलवी, करि गाना ॥ पाळणीं०॥७॥

"निघाले राम वनीं शिरले । पंचवटीला मग आले ॥
रावणें सीतेला हरिलें!" । ऐकतां गर्जुनि हरि बोले ॥
"लक्ष्मणा! आण चाप वहिलें! । वानर बोलावीं अपुले! ।
नेउनि दळभार सुवेळे। मारिन रावणादि सगळे! ॥
लंका देइन बिभीषणा!" । यशोदा हलवी, करि गाना ॥ पाळणीं० ॥८॥

यशोदा पाहुनि ही मात । झाली मनांत भयभीत! ॥
पुन्हां जों पाहि पाळण्यांत । तों श्रीकृष्ण असे रडत ॥
उचलुनि त्यासि अंकिं घेत । स्तनपान करी विधि-तात! ॥
'शंकर' ज्यासि सदा ध्यात । अह्मां तो पावो श्रीकांत ॥
आणा हरिलीला ध्याना । यशोदा हलवी, करि गाना ॥
पाळणीं निजवुनि यदुराणा । यशोदा हलवी, करि गाना ॥ ९ ॥



## २. गौळण.



[ ' तुह्मि थोरल्या रे ! थोरल्या पाटलाचे लेक !
तुह्मां मध्यें रे ! गरीब हाय मी एक ! ॥ —या चालीवर. ]

आल्यात पहा बऱ्याचशा गौळणी । जणुं सांगाया यशोदेसि गाऱ्हाणीं
परि वाटे कीं पाहुनि रथाङ्गपाणी । मन रमवावें गाउनि याचीं गाणीं
बाइ ! संभाळ गे ! बाळ तुझा गुणखाणी । यासम दुसरा नाहिं देखिला कोणी

यशोदाः-तुह्मि खोट्या गे ! भांड सगळ्या नारी । मम कान्हा हा निर्गुण निर्मळ वारी !
टाकुनि अपुलीं कामें धामें सारीं । कां जमलां गे ! उगाच माझ्या दारीं ? १

गौळणः-मी सांगुं कशी ? लाज वाटते मजला । हा कृष्ण अह्मां भ्रष्ट कराया सजला
अवचित गांठी गौळणि भोळ्या बाला । मृदु मधुवचनें बोलुनि भुलवी अबला
बहु धीटपणें चुंबन घ्याया शिकला । या कला अशा तया साधल्या सकला !
हा नयनपथें हृदयमंदिरीं शिरला । मग हलेचिना विश्व व्यापुनि उरला

यशोदाः—तुह्मि खोट्या गे ! भांड सगळ्या नारी । योगेश्वर हा ब्रह्मचारिमुरारी !
टाकुनि अपुलीं कामें धामें सारीं । कां जमलां गे ! उगीच माझ्या दारीं ? २

गौळणः—संचित माझें लोणि चोरिलें यानें । प्रारब्ध दह्याचें मंथन मोडित जाणें
हें दूध तरी कसें नासलें नेणें ! । कां हौसेचा घटहि तुपाचा नेणें !
या संसारीं रोज नवें रडगाणें ! । छळणूक किती ! जगणें लाजिरवाणें !
किति बाई ! हें असें अधाशीं खाणें । घरिं खाऊं दे यास पोटभर दाणे

यशोदाः-तुह्मि खोट्या गे ! भांडच सगळ्या नारी । लक्ष्मीपति हा करिल कशाला चोरी ?
टाकुनि अपुलीं कामें धामें सारीं । कां जमलां गे ! उगाच माझ्या दारीं ? ३

गौळणः—हें सोड ! अतां बघ याचा परिपाठ । रस्त्यावरि हा पसरी काटे राठ
यमुने जातां फोडि जळाचे माठ । करितो चेष्टा फिरविली न जों पाठ
करि वत्सांना मुक्त सोडुनी गांठ । करि आगळिकी रोज एकशें साठ !
नित्य क्रम हा चाले प्रहरहि आठ । भरल्या खोड्या अंगीं कांठोकांठ

यशोदाः—तुह्मि खोट्या गे ! भांडच सगळ्या नारी । सच्चिद्घन हा ज्ञानमय सदाचारी !
टाकुनि अपुलीं कामें धामें सारीं । कां जमलां गे ! उगाच माझ्या दारीं ? ४

गौळण:-किति सांगु ? तुला सगळें लटकें गमतें। तुज वाटतसें आपुलेंच उत्तम तें!
गोपाळांचें आणिक याचें जमतें। मग काय कथा करितो भलतें भलतें!
तें मुरलीचें गान कानिं गे! घुमतें। हें गगन कसें नादानें दुमदुमतें!
नाहिं सुचत मुळीं काम चित्त हें भ्रमतें। गे! त्रासाचें अन्य काय यासम तें?
यशोदा:-तुह्मि खोट्या गे! भांडच सगळ्या नारी। नि:संगाचि हा त्रिविधतापपरिहारी!
टाकुनि अपुलीं कामें धामें सारीं। कां जमलां गे! उगाच माझ्या दारीं? ५
गौळण:-कालच यानें सोडिलि माझी गाय। ती आवरतां थकलें! दमले पाय!
त्या चोराला धरिलें परि तें वाय। चावला मला हे बघ त्याचे घाय!
हरि सांपडला, सांपडलासा होय। परि गवसेना! ठकसेनांचा राय!
वाइ! धन्य तुझी.सर्वच उलटा न्याय!। आम्हिच लटक्या,कृष्ण साधु हा काय?
यशोदा:-तुह्मि खोट्या गे! भांडच सगळ्या नारी। करुणोदधि हा गोवर्धनगिरिधारी!
टाकुनि अपुलीं कामें धामें सारीं। कां जमलां गे! उगाच माझ्या दारीं? ६
गौळण:-ही काय अशी रीत पक्षपाताची?। यामुळेंच हा रोज अम्हांला जाची
खोड्या शिकवी इतरांना तैशाची। अमुचीं पोरें बिघडुन गेलीं साचीं!
धरिली ज्यांनीं संगत या चोराची। राहिली तयां शुद्ध न संसाराची!
सुंदर, चतुरा राधा माझी भाची। वेडी झाली त्याचें कारण हाची!
यशोदा:-तुह्मि खोट्या गे! भांड सगळ्या नारी। सद्गुरूच हा अज्ञानतम निवारी!
टाकुनि अपुलीं कामें धामें सारीं। कां जमलां गे! उगाच माझ्या दारीं? ७
गौळण:-टाऊक अम्हां! कशास दवडा वारा?। ही फूस तुझी म्हणुन नाचतो सैरा
हा सापडुं दे अम्हां करीं एकबारा[१]। मग एकाचे कृष्ण करूं अम्हि बारा!
कोंडुनि ठेवूं बळकट बांधुनि तारा। या पुंडाला कोणि न द्यावा थारा!
हा लाडानें तुझ्या नासला सारा। आम्हीच करूं शिक्षा या परभारा!
यशोदा:-हे गोपींनो! क्षणभर थांबा! बोला। रागाउं नका! अढी मनींची खोला!
नेणतेपणें हा अपराधी झाला!। तुम्हि थोरपणें क्षमा करावी याला!
अचपळ मोठा नावरेचि हा मजला। घालितें अतां तुमच्या पदरीं त्याला
या बाळाच्या विचित्र देखुनि लीला। 'रामा'सह[२] हा 'शंकर' तटस्थ ठेला! ८

---

१ एकवेळां. २ सदर 'गौळण' सन १९१७ मध्यें रचली. पांचवें व सहावें कडवें मी रचून दिल्यामुळें हा नामनिर्देश बंधुवर्यांनी केला आहे. —रा. चिं. श्री.

## ३. रुक्मिणीपत्रिका.

(चाल–'उद्धवा! शांतवन०')

सुविनीत रुक्मिणी बाला। पत्रिका लिही यदुपाला ॥ ध्रु० ॥
भीमकनृप विदर्भदेशीं। रुक्मिणी कन्यका त्यासी ॥
योग्य होय ती लग्नासी। रुक्मिया म्हणे पितयासी ॥
'द्यावी हे शिशुपाळासी। कुलगोत्र नसे कृष्णासी!' ॥
रुक्मिणी मनीं घाबरली!।
श्रीकृष्ण–मूर्ति आठविली।
पत्रिका निजकरें लिहिली।
कीर्तिमुखद्विज पाठविला ॥ सुविनीत० ॥ १ ॥

त्रैलोक्यसुंदरा! तुमचे। गुण ऐकुनि मन्मन नाचें ॥
काय भाग्य या कानांचें। लागला छन्द मम वाचे ॥
करित जों स्मरण वदनाचें। त्रिविधताप हरती साचे ॥
द्वारकापुरीं जें वसलें।
तें ध्यान हृदयिं या ठसलें।
निर्लज्ज चित्त हें कसलें?।
भुललें तव गुणरूपांला ॥ सुविनीत० ॥ २ ॥

हे मुकुन्द! अपुली महती। कुल, शील, रूप, वय, कांती ॥
विद्या, सद्गुण, संपत्ती। बल, धृति, क्षमा, द्युति, शांती ॥
पाहुनियां कुलशीलवती। जरि न वरी तुजला युवती ॥
जन्म तिचा व्यर्थचि गेला।
श्रीकृष्ण दूर जरि केला।
हृदयीं मम संतत ठेला।
मनमोहन मुरलीवाला ॥ सुविनीत० ॥ ३ ॥

अर्पिला देह सद्भावें। मज नाथा! स्वीकारावें ॥
वाटें यश तुमचें गावें। सेवुनियां चरण रहावें ॥
श्रीहरीस योग्य जें व्हावें। शिशुपाळ जंबुकें न्यावें ॥
अपकीर्ती कवणा ऐसी।
होईल सहन तरि कैसी!।
यास्तव घ्या पदरीं मजसी!।
रक्षावें त्रिजगत्पाला ॥ सुविनीत० ॥ ४ ॥

नानाविध दानें करितां । व्रतनियमधर्म आचरितां ॥
गुरु देव, विप्र ते भजतां । श्रीकृष्ण सर्वदा स्मरतां ॥
जरि तुष्टलासि भगवन्ता ! । तरि हेंचि मागणें आतां ॥
श्रीकृष्ण मला नवरा हो ! ।
तत्प्रीति नित्यनव राहो ! ।
शिशुपालादिक वारा हो ! ।
ईश्वरा ! शरण मी तुजला ॥ सुविनीत० ॥ ५ ॥
लग्न उद्यां प्रातःकाळीं । या विदर्भासि ते वेळीं ॥
ठेवावे सैनिक जवळीं । या गुप्तपणें वनमाळी ॥
होईल युद्ध कल्लोळीं । हे राजे सर्व पिटाळीं ॥
चैद्य, मागधा संहरणें ।
मज राक्षसविधिनें वरणें ।
क्षत्रिया योग्य तें करणें ! ।
विनवितें हेंचि द्या मजला ! ॥ सुविनीत० ॥ ६ ॥
अन्तःपुरिं तुजसि वरावें । तरि आड बंधुनीं यावें ॥
मग त्यांसि काय मारावें ? । सुचवितें युक्ति ऐकावें ! ॥
बाहेर देविला जावें । पूजना वधूला न्यावें ॥
पूर्वीची रीती ऐसी ।
या यास्तव त्या ठायासी ।
तेथेंच वरावें मजसी ।
हा उपाय उत्तम सुचला ॥ सुविनीत० ॥ ७ ॥
पदरज तें भवभय नाशी । दुर्लभ जें इंद्रविधीशी ॥
शिव हृदयीं ध्याते तुजसी । भक्ताचा अंकित होसी ॥
मी तरी, इच्छितें दासी । व्हावया तुझी हृषिकेशी ! ॥
जरि हें न घडे यदुराया ! ।
शतजन्महि जाळिन काया ! ।
परि तुझीच होइन जाया ! ।
निश्चय हा माझा ठरला ! ॥
श्रीरुक्मिणिनें जो लिहिला । पत्रिकार्थ 'शंकर' वदला ॥ सुविनीत० ॥८॥

# ४. श्रीभवानी-कमलेश्वराची आरति.

जय देव जय देव ! जय स्मरहर ! विमला !
श्रीकमलेश्वर शंभो ! गिरिशा ! तारिं मला ॥ जय देव जय देव ॥ ध्रु० ॥
वाराया जगताचा भवसागर ताप ।
गर तापा सोसुनि तूं होशी हरपाप ॥
नटशी अनेक रूपें तूं निर्गुण रूप ।
त्रिपुरातें माराया घेशीं गुरुचाप ॥ जय देव० ॥ १ ॥
त्रिशूल, डमरू, पिनाक, यांहीं शोभावा ।
गणपतिकुमारलीला पाहुनि लोभावा ॥
धांवुनि मुक्ती देतो अवलोकुनि भावा ।
ऐसा पिनाकधारी हा निशिदिनिं गावा ॥ जय देव० ॥ २ ॥
सुरपूजितचरणा ! शरणागतभयहरणा ! ।
करुणार्णव अरुणद्युति सुरऋषिगणभरणा ॥
भक्ता रक्षायातें त्रिपुरसहृकृतरणा ।
दुष्टातें दंडाया घेशी अवतरणा ॥ जय देव० ॥ ३ ॥
सिद्धयक्षगंधर्वादिकसेवितपादा ।
यूतीं हरशी, लागशि भिल्लिणिच्या नादा ॥
ब्रह्माविष्णू यांच्या तोडुनियां वादा ।
श्रेष्ठ करिशि विष्णुसि, करिं धातृशिरच्छेदा ॥ जय देव० ॥ ४ ॥
कोरस्थ त्रिगुणात्मक भक्तवरद गिरिशा ।
नेऊनि अभयपदातें तोडिशि भवपाशा ॥
कामादिक हे षड्रिपु यांच्या करिं नाशा ।
'ओखंडे' कुलस्वामिन् पुरवीं मम आशा ॥ जय देव० ॥ ५ ॥
भक्तार्तिविनाशक त्या शंभुयशा अमला ।
शेषहि सहस्रवक्त्रें गातां बहु श्रमला ॥
शितिकंठ नाममात्रें भवसागर तरला ।
भजनीं बहुसुख ह्मणुनी 'शंकर' पदिं रमला ॥ जय देव० ॥ ६ ॥

# ५. संशय-मणि-माला.



(गीति)

[ चि. सौ. वेणूताईचें पत्र बरेच दिवसांत न आल्यामुळें पुढील आर्या तिला लिहिल्या. ]

पत्र लिहाया बसतां, आल्या वन्सें, वडील कीं जाऊ ॥
त्यांना सोडुनि तेथें, पत्र लिहाया कसें गडे ! जाऊं ? ॥ १ ॥
अथवा येते झाले, स्वामींचे मित्रवर घरा; त्यांचें ॥
स्वागत करण्या सजलें, मनवित्तकलत्र जाण, दात्याचें ! ॥ २ ॥
कीं दुर्गादेवीनें[1] ओलांडुनि सर्व सांडली शाई ! ॥
त्या चतुर कन्यकेचें, कौतुक करणार नाहिं कां आई ? ॥ ३ ॥
कीं साहित्य सरें, मग पत्र लिहावें कशावरि कशानें ? ॥
हें न घडे लक्ष्मी[2]-घरिं, केशव[3] मग कशि लया दुर दशा ने ? ॥ ४ ॥
अथवा तेथें झाला, पोस्टमनांचा अभूतसा संप[4] ! ॥
पत्रानंद-भुकेल्या, दूरस्थित जनमनासि दे कंप ! ॥ ५ ॥
कीं लग्नसमारंभीं, आवाशिपासून मावशी दंग ॥
फेंकी वधूवरांवरि, तो पत्रावरिहि सांडला रंग ! ॥ ६ ॥
कीं पत्र पूर्ण झालें, परि न मिळे तिकिट म्हणुनि करिं कांकूं ॥
सौभाग्यशील नारी, सोडि न घर जरि नसे ठळक कुंकूं ! ॥ ७ ॥
कीं कल्पना, अलंकृति-रसमाधुर्यें तुडुंब जें फुगलें ॥
चालें मंद, गजानन डुलत जसा धरुनि मोदककणुगलें ॥ ८ ॥
कीं मार्गी त्या लाभे, सद्ग्रंथाचा अखंड सहवास ! ॥
सत्संगीं मन रंगे, विसरे निज हेतु, कार्य, हव्यास ॥ ९ ॥
कीं येतां वाट चुके, भलतिकडे जाय, तरि मिळेल मला ॥
हळुंहळुं येत असावें, फिरुनि मजकडेच जीव जरि दमला ! ॥ १० ॥

मुंबई, मे १९२१

---

१ कविभगिनी सौ. वेणूताई यांची लहान कन्या कु. दुर्गा. २ लक्ष्मी-सासरचें नांव. ३ केशव-पतिनाम. ४ नुक्ताच मुंबईत असा संप झाला होता. तसाच तेथें ( कोल्हापुरांत ) झाला आहे. कीं काय असा संशय.

# ६. चि. सौदामिनीला पाळणा.



( 'निज रे! निज बाळा!' — या चालीवर )

सौदामिनि! बाळे! तुजला गे!
झोंप कां न ती लागे? ॥ सौदा० ॥ ध्रु० ॥
उत्तम रंगीतसा । बहु खासा । हा बघ । पलंग कैसा! ॥
त्यावरि पसरियला । मउ गाशा । गादीवर तीन उशा! ॥
मेणांबरावरी[1] । स्वच्छ अशा । घालुनि पलंगपोसा ॥
पांघर ही रजई । नाजुकशा। मच्छरदाणीस कशा[2] ॥
काय उणें सांगे । तुजला गे! । झोंप कां न ती लागे ॥ १ ॥
फार रात्र झाली । बहुशांत । वारा मंद वहात ॥
सुमनसुगंधाच्या । सदनांत । लाटा खेळत जात ॥
चिद्घन देवाच्या । स्तवनांत । आनंदें मन घात ॥
जवळी बैसोनी । पद गात । थापटितों— तव तात ॥
दिवसा जरि भागे!। तुजला गे! । झोंप कां न ती लागे ॥ २ ॥
लागलिसे तुजला । भूकजरी । तरि खा पेढे ताजे ॥
जरि तूं असती गे! । आजारी । तरि बा[3] डाक्टर गाजे! ॥
हें तव रडगाणें । मधुर जरी । तरि न तुला तें साजें! ॥
पाहुनि तव लीला । ही सारी । हट्टी मुलही लाजें! ॥
तेंहि नसें जागें । तुजला गे! । झोंप कां न ती लागे ॥ ३ ॥
आतां तरि चतुरे!। स्वस्थ रहा । हृदयीं ईशास पहा! ॥
रक्षितसे आह्मां । पालक हा । त्वरित निवारुनि मोहा ॥
शांतिज्ञानदया— । सिन्धु महा । जाउं तयाच्या गेहा ॥
अर्पुं तया वाचा । मन देहा । गातो 'शंकर' तो हा ॥
भक्तिदान मागें । तुजला गे! झोंप कां न ती लागे? ॥
मुंबई, जुलै १९१९  सौदामिनि बाळे! ॥ ४ ॥

[वर पाळण्यांत गाइलेली मुलगी ता. २० आगष्ट १९२२ रविवार श्रावण कृष्ण त्रयोदशीस दुपारी ३ वाजतां आह्मांस सोडून स्वर्गी गेली! देवानें दिलेलें त्यानेंच नेलें!!!]

---

१ मेणकापडावर (!)  २ दोऱ्या.  ३ बाप.

## ७. मनाचे श्लोक.



[ प्रस्तुत लेखकाचे घरीं एक मांजराचें पिल्लूं होतें. लहानपणीं ती भाटी आहे असें वाटून तिचें नांव 'मनी' असें ठेविलें. पण पुढें तो बोका आहे असें आढळून आल्यानें त्यास 'मना' हें नांव प्राप्त झालें ! त्या 'मना'स उद्देशून पुढील श्लोक श्रीसमर्थांच्या प्रसिद्ध श्लोकांच्या धर्तीवर रचले आहेत. ]

( वृत्त–भुजंगप्रयात. )

मना ! सज्जना ! आड मार्गीं फिरावें । दिसें भक्ष्य तें त्वां प्रयत्नें धरावें ॥
जरी ना मिळे यत्न सोडूं नको हो ! । मना ! अंतरीं बोल हा नित्य राहो ! ॥१॥
धरीं रे मना ! ध्यान त्या उंदराचें । असें वाहन श्रेष्ठ लंबोदराचें ॥
निदिध्यास आणील साक्षात् तयाला । करीं गट्ट त्या तुष्टिपुष्टिप्रदाला ॥ २ ॥
जरी तूज मार्गांत भेटेल कुत्रा । डरावें न तूं मांजरीच्या सुपुत्रा ! ॥
विदारीं नखें त्याचिया नाककानां । पळें दूर वेगें जरी आवरेना ॥ ३ ॥
घुशीचें भयें काय भीतोसि लंडी[1] । धरीं रे मना ! धैर्य धाकासि सांडी ॥
तुला घूस केव्हांच मारूं शकेना । तुवां जिंकिल्या मेजवानी चुकेना ॥ ४ ॥
तुझी मावशी[2] दीर्घतुंडी व लांडी । अकस्मात भेटे तरी तूं वलांडीं ॥
तिला खेळवीं, लोळवीं, वा वधींही । परंतू न खा तीस बापा ! कधींही ॥५॥
जगीं सर्वभक्षी असा कोण आहे ? । विचारीं मना ! तूंच शोधून पाहें ॥
ह्मणोनी न खा ! पालसर्पादिकांला । तयांच्या विषें देह जाई लयाला ॥ ६ ॥
कधीं अन्न वा मांस वा तूप, पक्षी । मिळे दैवयोगें तसें तेंच भक्षीं ॥
परी मूषकीं[3] सर्वदा भक्ति कीजे । अती आदरें लक्ष तेथेंच दीजे ॥ ७ ॥
मरे एक त्याचा दुजा शोक वाहे । अकस्मात तोही पुढें येत आहे ॥
तयालाहि धाडून दे पोटपंथा ! । किती फाडिल्या मालकाच्या सुकंथा ! ॥८ ॥
तुला भेडसावी जरी दुष्ट बोका । तरी सांग लोकांस कीं यास ठोका ॥
न भीं ना पळें युद्धकौशल्य दावीं । जगीं जाणत्यांनीं सुकीर्ती वदावी ! ॥ ९ ॥
तुझा देह भूमीं उताणा पडावा । जरी मार्ग हा होय वीरास डावा ॥
धराचत्वरा[4] शत्रुरक्तें भरावें । मरावें परी प्रेतरूपें उरावें ! ॥ १० ॥

---

१ नामर्द ! २ चिचुंदरी. ३ उंदीर. ४ अंगण.

जयाचेनि संगें समाधान भंगे । अशा संगतीं सांग पां कोण रंगे ॥
धरीं ओळखी लोभ लावीं प्रभूतें । जगीं व्यर्थ तो जो न दे दुग्ध तूंतें ॥ ११ ॥
बरें हुंगिल्यावीण कांहीं न खावें । न बोलावितां खावया त्वां न जावें ॥
अभक्ष्यास भक्षून बाटूं नको रे ! । मना ऊन मिष्टान्न चाटूं नको रे! ॥ १२ ॥
स्वयंपाकगेहीं सदा वस्ति कीजे । धनीणीकडे लक्ष संधान दीजे ॥
कुठें ठेविती, केधवां, काय, कैसें । फळे यत्न, संधान राखील जैसें ॥ १३ ॥
फिरें सामुपायीं हरीं तन्मनाला । करीं प्रेमविश्वाससंपादनाला ॥
सुसंधीस साधून पी दुग्ध ताजें । कुणीं पाहिल्या स्वीकरीं मुग्धता जे ॥ १४ ॥
करीं होय संतुष्ट जेणें धनीण । लुटीं साय जी शुद्ध सत्त्वप्रवीण ॥
"सुना चोरट्या साय चोरून खाती । वृथा मांजरीं आळ घेती !" ह्मणे ती ॥१५॥
सदा चित्त खादीवरी बा ! असावें । रिकामेपणें व्यग्र केव्हां नसावें ॥
मना ! आळसा ठाव देऊं नको रे ! । जगीं आळशी राहिले सर्व कोरे ! ॥१६॥
ह्मणूं तूं नको हें न तें मी न लक्षीं । तया धर्म साधेल जो देह रक्षी ॥
मिळे तें गिळीं लावि रे ! आत्मकाजा । मला दे ह्मणे तो जरी बाप आजा ॥१७॥
सदा चाटुनि स्वच्छ ठेवीं निजांग । दुजें काय आरोग्य दे तेवि सांग ॥
सदा वृत्ति उत्साहसंपूर्ण राहे । तयाला यशःश्री स्वयें शोधिताहे ! ॥ १८ ॥
मना ! संशयो नित्य जीवीं धरावा । परीक्षून विश्वास थोडा करावा ॥
रहा काष्ठधारी, न तत्कच्छपीं जे[1] । दुधें पोळतां ताक फुंकून पीजे ! ॥ १९ ॥
सदा चित्त हें ठेवि बा ! सावधान । असो आत्मविश्वास युक्तिप्रधान ॥
बळें बैसवीं गेहराज्यीं दरारा । प्रसिद्धीस ये या गुणें तूं भरारा ! ॥ २० ॥
वसो अंतरीं बा ! तुझ्या पूर्ण शांति । प्रसंगीं करीं मर्दनें शत्रुशांति[2] ॥
तुला अर्पिले श्लोक हे एकवीस । न हो मूषकत्रास देवा ! कवीस ॥ २१ ॥

* * *

[ वरील श्लोकांनीं संतुष्ट झालेल्या 'मनाचें' वरप्रदान ]

(अनुष्टुभ्)

पठे जो श्लोक हे सारे आठ वा दोन वा कमी ॥
त्याचे घरीं गोरसाची चोरी साची करीं न मी ॥ १ ॥

---

१ अन्वयः—जे काष्ठधारी तत्कच्छपीं न रहा. २ शत्रुनाश.

## ८. माशांचें गाणें.



( भूपती खरे० — या चालीवर )

[ सिंध हैद्राबाद येथें सन १९२१ मध्यें असतांना, तेथील माशांच्या अनिवार त्रासामुळें पुढील गाणें सुचलें आहे ! ]

परमेशा ! पुरवीं एक आमुची आशा ।
भक्तांच्या घरच्या कर नाहींशा माशा ! ॥ ध्रु० ॥
केलीस तुवां बा ! सुंदर सृष्टी सारी ।
मृगखगझषतरुमणि, नगनदनभनरनारी ॥
इतिहास पुराणें, शास्त्रें वेदहि चारी ।
हीं फुलें सुगंधी अलंकार सुखकारी ॥
पक्वान्नें बहुविध, प्रावरणें जरतारी ।
चिंतितां चमत्कृति होतों बहु आभारी ! ॥
चाल:-सुखसोयी सगळ्या धामीं । सेवक तत्पर हरकामी ॥
रत चित्त उमावरनामीं । भाग्य काय पर तें नामी ॥
खाऊही देते मामी ! । सुखरूप असावें आम्हीं ॥
परि माशाचमुळें । भासे सर्व तमाशा ॥ भक्तांच्या० ॥ १ ॥
कोठेंहि विचारा, ह्मणती ' माशा फार ! ' ।
विधिलाहि कळेना माशांचा विस्तार ! ॥
आळशीहि मारी माशा अपरंपार ! ।
परि उरलेल्या ह्या पड्डूं न देती थार ॥
लाजेल सासुही इतुका भाजाकार ।
वदवेना वाचें अक्कल झाली गार ! ॥
चाल:-आगगाडि दिसते मोठी । तिस पुसा तुह्मी ही गोठी ॥
' धांवतेस घटका साठीं । उतरून नद्या, वन, घाटीं ॥
कससाठीं ? ' माशासाठीं । परि येतिच पाठोपाठीं ॥
कांहींच सुचेना उपाय यांच्या नाशा ॥ भक्तांच्या० ॥ २ ॥
आमटींत माशा, अन्नीं, जळिंहि, चहांत ! ।
हा रणीं न, परि भोजनीं आंखडे हात ! ॥

मलमूत्रांवरुनी अन्नांवरि बसतात ।
रोगबीज चारुनि अन्नजनां वधितात ॥
छळितात भल्यासहि शिरुनि नाककानांत ।
मारणें तयां तरि, युक्ति धरा ध्यानांत ॥
चालः—फॉर्मॅलिन्[1] चमचा घ्यावें । तितुकेंच दूध घालावें ॥
अदपाव पाणि मिसळावें । मग बशांत तें ठेवावें ॥
माशांचें मरण पहावें । परि मुलांसि सांभाळावें ॥
रुपयांत अधेली, झाल्या कमि आतांशा ॥ भक्तांच्या०॥ ३ ॥

इतुक्या मरती परि, शतपट जन्मति पोरें ।
अहिमहिरावणही हटतिल यांच्या होरें ! ॥
कोठें घर न दिसें, माशांवांचुनि कोरें ।
कंटाळुनि गेले त्रासानें जन सारे ॥
केलेंस ऋणी मज, परि एक्या उपकारें ।
स्मरविती तुला ! भगवंता ! धांव अतां रे ! ॥
चालः—पृथ्वीचा भरुनि नकाशा । व्यापितात ह्या आकाशा ।
जन सोडुनि मायापाशा । टाकूनि वस्तु जरि खाशा ॥
गुंडाळुनि पळती गाशा । येउंदे दया जगदीशा ! ।
'शंकर' पद गातो वाजवा ! किं रे ! ताशा॥ भक्तांच्या० ॥ ४ ॥

शुभं भवतु ।

[ उपरिनिर्दिष्ट माशांचें गाणें ज्या पत्रांतून प्रथम सिंधहैद्राबादहून आलें, त्यांत गाण्याचे समाप्तीनंतर पुढें दिलेला मनोरंजक व मार्मिक मजकूर आहे. —रा. चिं. श्री. ]

"... या पद्यांत कोठें शुद्धाशुद्ध, ओढाताण, छाटाछाट, दूरान्वय, पौनरुक्त्य, असंबद्धता, असहकारिता, नजरचूक, ऱ्हस्वदीर्घ, अर्थहानि, ग्राम्यशब्दप्रयोग, वर्णसंकर, लेखनप्रमाद, पदच्छेदविच्छेद, स्वारस्यभेद, यतिभंग, सौंदर्यनाश, अनादर, कूटस्फोट, ध्वनिविध्वंस, मिथ्यावाद, सत्यगोपन किंवा गायनशास्त्राविरुद्ध बंड आढळल्यास कळवावें, म्हणजे दुसऱ्या आवृत्तीचेवेळीं सुधारण्यास बरें पडेल. दोषाविष्करण करणाऱ्यांचीं व सूचकांचीं नांवें प्रस्तावनेंत छापलीं जातील अशी मुद्दाम व्यवस्था करण्यांत येईल. — —"

—शं. चिं. श्री.

---

१ फॉर्मॅलिन (Formalin) हें एक उग्रदर्पाचें व जंतुनाशक पातळ औषध आहे.

## ९. बहुरूप्याचें जेवणास आमंत्रण.

( " काकुबाई ! काकुबाई ! लग्नाला चला. " ही चाल )

खासेराव! भलेराव ! जेवायला चला! तुह्मि जेवायला चला! ।
रुसु नका ! फुगु नका ! जेवायला चला ! अधिं जेवायला चला ! ॥ ध्रु० ॥
चिमुटभर भात । ताटें भरलिं सात ॥
धुवणाची कढी ! । गुलबशिची वडी ॥
भोपळ्याचं भरीत ! । ताक करकरीत ॥
दमडी एवढी पोळी ! । वर लाडवाची गोळी ॥
खाउन भट पोट चोळी ! माझी वाढणार भोळी ॥ खासेराव० ॥ १ ॥
वाटाण्याचें वरण ! । बांधू लागा धरण ॥
चिंचोक्याची उसळ । ऊन पाणी घुसळ ! ॥
खीर भारि गोड । वर लिंबाची फोड ! ॥
पळिभर सार ! । पण खातां करि गार ॥
आले वाडपि हजार ! तुह्मि पिऊं नका फार ॥ खासेराव० ॥ २ ॥
लोणकडें तूप ! तुह्मि वास घ्या खूप ॥
भेंड्याची भाजी । केली काल ताजी ॥
चट्णीचा वास ! । नाकिं भरला आसपास ॥
आमटिच्या साठ । वाट्या भरल्या काठोकाठ ॥
बसा जेवायला ताठ ! मारा शेंडीला गाठ ॥ खासेराव० ॥ ३ ॥
मिठाचा खडा । त्यावर शिडि लावुन चढा ॥
कोशिंबीर खाशी । त्यांत अडीचशें माशी !
भजांचि मजा । मिटक्या मारी गजा ॥
ही ऐकुन वाणी । ज्याच्या तोंडाला पाणी
त्याची कांदा खाते राणी । ऐका गजाचि गाणीं ॥ ४ ॥
खासेराव! भलेराव ! जेवायला तुह्मि जेवायला चला ! ॥
रुसूं नका ! फुगूं नका ! जेवायला चला ! अधिं जेवायला चला ॥

## १०. भोजनाचा फटका.

भल्या मुला! तुज दसलाखाची मात सांगतों, नटूं नको ॥
दूध, तूप, दहिं, ताक, मिळाल्या यथेच्छ खाया हटूं नको ॥ ध्रु० ॥
तिखट दाट आमटी नसावी कच्ची रोटी खाउं नको ॥
जाडें भरडें अन्न खाउनी पोटाला कष्टवूं नको ॥
अभक्ष्य भक्षण करुनि जनांचा बोल आपणां घेउं नको ॥
मन गेलें, तरि विवेक करुनी आवरूनि धर; बाटुं नको !
चालः–'मला मला' तूं करूं नको–उगांच मागुन घेउं नको ॥
आग्रह करून घेउं नको–पानामध्यें टाकुं नको ॥
परि नावडतें आणि नको तें टाकायाला लाजुं नको ॥ भल्या मुला० ॥१॥
सावकाश रे! जेव चावुनी उगिच भराभर गिळूं नको ॥
साधें सात्त्विक जेवण हितकर, पक्वान्नांना भुलूं नको ॥
मी मोठा खाणारा भोक्ता गर्व असा तूं वाहुं नको ॥
एकाहुनि चढ एक जगामधिं, भरीस त्या तूं पडूं नको ॥
चालः–पोटावर कधिं रुसूं नको–सदा चरत तूं बसूं नको ॥
गोड फार तूं सेवुं नको–भूक नसे तर खाउं नको ॥
असल्यावर सांगणें कशाला? मिळेल जें तें सोडुं नको! ॥ भल्या मुला० ॥२॥
पोट फुगुनियां तडसहि लागे, असलें जेवण जेवुं नको ॥
अजीर्ण होतां अधिं लंघन कर मग डॉक्टर विस्मरूं नको ॥
कच्चें, करपट, उष्टें बेचव, शिळें, सांडलें खाउं नको ॥
जवळीं आल्या मुठभर द्याया मागें पुढतीं पाहुं नको ॥
चालः–एकटाच कधिं खाउं नको–अंधारांत मुळींच नको ॥
अपवित्राला शिवूं नको–प्रसादतीर्थी विटूं नको ॥
हवें असुनिया उगिच भिडेनें 'नको नको' तूं ह्मणूं नको! ॥ भल्या मुला० ॥३॥
अन्नासाठीं खर्च करीं परि चैन कधींही करूं नको ॥
चहाकाफितंबाकू यांचें व्यसन लावुनी घेउं नको ॥
जेवण समयीं दुर्मुखलेला उदासीनसा राहुं नको ॥
चालः-अवेळ करुनी खाउं नको–दास जिभेचा होउं नको ॥
अधिं सर्वांच्या बसूं नको–तसाच मागुन उठूं नको ॥
मोठ्याची पगंत बोधप्रद दुर्जन पाहुणचार नको! ॥
शंकरासि नैवेद्य अर्पिल्यावांचुन जेवण करूं नको ॥ भल्या मुला० ॥४॥

## ११. मुलांचे करमणुकीकरितां.

( सतारीवर वाजविण्यासाठीं सतारीच्या कांहीं गतींच्या चालींवर रचलेलीं गाणीं. )

### १ भोंवरा.

घुम् करुनिया घुमतो भोंरा ।
वाटे, हा जणुं भृंगचि दुसरा ! ॥
घुं करुनिया घुमतचि जाशी
योग्याचें परि डोलत राहशी
आनंदें, मग लोक तुझे झाले बंदे !
गुणवंतचि खरा ! घुम् ॥ १ ॥

### २ बेंडबाजा !

राजा ! राजा ! प्रियकर ! माझ्या
हे बघ ! आले काका घेउनि सुंदर बाजा,
कैसा साजे ! उत्तम वाजे !
हा, बघना करिं धर ना !
हळूं वाजिव, राजा !

---

लहान मुलींसाठीं

## १२. हदग्याचें गाणें.



( चालः—कृष्णाचं अंगडं, बाइ कृष्णाचं टोपडं. )

वंदन माझें गजाननाला विघ्नहरा देवाला ॥
माझा हदगा सिद्धी जावो ! पावूं दे ! नवसाला ॥
नमितें शंभू गिरिजादेवी जगाची माऊली ॥
विद्यादेवी सरस्वती मी प्रेमानें वंदीली ॥
आइबापाचे चरणहि वंदूं सौख्याचें माहेर ॥
इडापीडा दुःख आमुचें जाऊं दे ! बाहेर ॥
ब्रह्मा, विष्णू नमिले, त्यांचे गुण आह्मीं गाऊं या ॥
लक्ष्मी पार्वतीस आजचि आनंदें पाहूं या ! ॥
प्रदक्षिणा या करुनी भावें, वंदूं या ! हदग्याला ॥
शंकर झाला प्रसन्न; देवो ! संपत्ती आह्मांला ॥

## श्री. सौ. कृष्णाबाई श्रीखंडे ( ऊर्फ सौ. पार्वतीबाई सरदेसाई ) यांचीं कांहीं पद्यें.



### १३. श्रीसावित्रीगीत.

[ चाल-उद्धवा ! शांतवन० ]

सुजन हो ! आदरें परिसा । शुभ चरित्र सावित्रीचें ॥ ध्रु० ॥
मद्रदेशभूषण नृपती । अश्वपती नामें होता ॥
पाळुनी नयानें अवनी । तोषवी प्रजाजनचित्ता ॥
परि नसे संतती ह्मणुनी । मानसीं खिन्न तो असतां ॥
विधिपत्नीच्या वरदानें । लाभली एक त्या दुहिता ॥
सावित्री नामें विलसे । जी केवळ पावन सरिता ! ॥

चालः— लावण्यगुणांची खाणी ।
उपमेसि मिळेना कोणी ।
रविशशिही लपले गगनीं ! ।
बघुनियां रूप बालेचें ॥ सुजन हो ! आदरें० ॥ १ ॥

सकल कलाशास्त्रांमध्यें । ती दावी बहु चतुराई ॥
पाहुनियां तेज तियेचें । नृपतितें गमे नवलाई ॥
मनिं ह्मणे योग्य कन्येच्या । पाहुं कुठें मी जांवाई ॥
मग काय बोलला तिजला । 'बहु सुज्ञ असति गे बाई ! ॥
अनुरूप तुझ्या कुलशीला । वर असा शोधण्या जाईं !' ॥

चालः— वंदुनी जनक-चरणांसी ।
घेउनी चतुरशा दासी ।
ती निघे भर्तृ-शोधासी ।
कुलशील थोर हो ज्याचें ॥ सुजन हो ! आदरें० ॥ २ ॥

हिंडुनी देश तो सगळा । अतिरम्य तपोवनिं आली ॥
त्यागुनी मोहममतेला । मुनिवृन्दें जेथें रमलीं ॥

च्युतवैभव शाल्वपतीही । रत तेथें हरिपदकमलीं ॥
सत्यवान् तनय तो त्याचा । साधुवृत्त सद्गुणशाली ॥
पाहुनी तपोधन युवका । मद्रभूपतनया रिझली ॥
चालः— मग हृदयें त्यासि वरूनी ।
पातली पित्याचे सदनीं ।
तंव नारद मुनितें बघुनी ।
वंदिले चरण हो त्यांचे ॥ सुजन हो ! आदरें० ॥३॥
कथि वृत्त सर्व जें घडलें । ती सुमती जनकाज्ञेनें ॥
मुनि ह्मणे युवा अल्पायू । न वरावा तव कन्येनें ॥
चित्राश्व[1] होय विगतासू । येथून एक वर्षानें ॥
भूप ह्मणे अन्य वरीं गे । नर योग्य मुनींद्रमतानें ॥
मग पित्यासि सविनय दिधलें । प्रत्युत्तर सावित्रीनें ॥
चालः— नर अन्य तुझ्यासम मजला ! ।
माझा हा निश्चय ठरला ! ।
मुनि देई अनुमति तिजला ।
झालें मग लग्न तियेचें ॥ सुजन हो० ॥ ४ ॥
तापसी बनलि नृपकन्या । ऐश्वर्य विलासा त्यजुनी ॥
आंधळीं सासरासासू । दैवतें मनीं मानूनी ॥
पतिसेवातत्पर राही । गृहकृत्य सर्व सारूनी ॥
परि नित्य झुरे ती चित्तीं ! मुनिवच तें घोर स्मरुनी ॥
त्रिदिन व्रत मग आरंभी । मृत्युंजय शंकर नमुनी ॥
चालः— तों कठिण काल ओढवला ।
चित्राश्व निघे फलमूला ।
भर्त्यासह जाय सुशीला ।
करि निमित्त वन बघण्याचें ॥ सुजन हो० ॥ ५ ॥
नृपपुत्र दावि दयितेसी । मृगयूथ, विहग, तरु, हस्ती ॥
तद्वचनसुधा सेवाया । बहु पुसे प्रश्न ती सुमती ॥
तंव एकाएकी त्याच्या । मस्तकीं वेदना उठती ॥

१ सत्यवान्.

घेउनी अंकिं शिर पतिचें । उपचारा बहुपरि करि ती ॥
आळवी रमावर हृदयीं । धरि थोर धीर ती चित्तीं ॥
चालः— देखे तैं यमधर्मासी ।
जो जाई पितृदिग्देशीं ।
बांधुनी प्राण दृढपाशीं ।
ईहि निघे मागुनि त्याचे ॥ सुजन हो० ॥ ६ ॥
धर्म ह्मणे 'जा! परतोनी। कां व्यर्थ शिणसि गे! नारी ?' ॥
'पतिविना स्त्रीस गति नाहीं! बोलति कीं श्रुति त्या चारी' ॥
वदुनि असें, धर्मरहस्या। ती विदुषी त्यासि विचारी ॥
ऐकुनी चतुर बोलांसी। तुष्टला सूर्यसुत भारी ॥
'वर इच्छित देतों,' बोले । 'घेउनियां जा! माघारी' ॥
चालः — बोलुनी मधुर वचनांसि ।
मेळविलें चार वरांसी।
सोडीना परि धर्मासी ।
कीं तत्करिं असु नाथांचे ॥ सुजन हो० ॥ ७ ॥
'द्यावें जी! श्वशुरालागीं । गतवैभव, सुंदर नेत्र ॥
मग मागे, व्हावे पितया । कुलतारक शंभर पुत्र ॥
पावेन वदे संततिशीं। जी होय जगीं स्तुतिपात्र ॥
तरि मत्पति मजला द्या हो!। रक्षाया वचन पवित्र ॥
'धन्य! धन्य!' यमराज ह्मणे। 'गातिल जन तव हें स्तोत्र ॥
चालः— पति तुजसी दिधला जा गे!।
भूवरी यश तुझें जागे'!।
पातलीं क्षणीं ती मागें!।
अद्भुत हो सत्त्व तियेचें ॥ सुजन हो० ॥ ८ ॥
वृद्ध पिता, माता सदनीं । सुतविरहें होती कष्टी ॥
जरि सकल जाणते मुनिही । समजावुनि सांगति गोष्टी! ॥
तंव अकस्मात त्यां दोघां । लाभली दिव्य कीं दृष्टी ॥
करभार घेउनी येतां । सत्वरें रिपूही भेटी ॥
देखुनी वधूसह पुत्रा । आनंद न माये पोटीं! ॥

चालः— लागे ती गुरुजनचरणीं ।
सत्कथा तरी[1] भवतरणीं ।
जन वदती अघटित करणी ।
गुण वानिति सावित्रीचे ॥ सुजन हो० ॥ ९ ॥

चिरसौख्य हर्ष संपत्ती । पावले प्रजाजन सकळ ॥
पुण्यबळें सावित्रीच्या । वरदानें झाली सफळ ॥
होउनी त्रिभुवनीं वंद्या । लाधली कीर्ति हो ! अढळ ॥
अघनाशक, रसिकां सुखवीं । सावित्रीचरित रसाळ ॥
ऐकतां भक्तिभावानें । सन्निश्चय होई सुफळ ॥

चालः— जाणुनी ' जानकी-तनया ' ।
भवसिंधु घोर हरपाया ।
वंदुनियां सद्गुरुपायां ।
गात असे सुयश सतीचें । सुजन हो० ॥ १० ॥

## १४. धांवा.

[ चालः- भूपती खरें० ]

हे दयानिधे हरि ! पाव झणीं तूं मजसी ।
भवसागरतारक एक तूंच बा ! असशी ॥ ध्रु० ॥
तुजविना असेना दीन जनांचा त्राता ।
तूं चराचरांचा असशी जनिता माता ॥
जडजीव पातकी बहुत तुवां तारियले ।
जाणुनी असें मी शरण तुला ही आलें ॥
देखुनी भयानक मोह-नक्र हे पाहीं ।
तरण्यासि भवार्णव मार्ग दिसेना कांहीं ॥

चालः--पोंचवीं पैलतीराला । श्रीहरी ! ।
चुकवीं बा ! षड्रिपुघाला । श्रीहरी ! ।
दे अखंड तव भक्तीला । श्रीहरी ! ।

पदिं ठेवुनि माथा, 'कृष्णा' विनवी ऐशी ।
हे दयानिधे हरि ! पाव झणीं तूं मजसी ॥ १ ॥

---

१ नाव.

## १५. चंद्रोदयवर्णन.

परत जाय गृहीं जइं भास्कर । उदय पावत हा रजनीकर ॥
सखिगणांसहिता करि रोहिणी । पतिमहोत्सव ती मनमोहिनी ॥ १ ॥
नक्षत्रमाला गगनीं उदेली । चंद्रागमें जी बहु धन्य झाली ॥
पाहूनियां त्या रुचिराकृतींना । शोभा तयांची मज वर्णवेना ! ॥ २ ॥
तेजस्वितारागण दिव्य राशी । आकाश ज्यांचे विलसे प्रकाशीं ॥
केली असे यांहिं विशेष बाई ! । नीलांबरीं सुंदर रोषणाई ॥ ३ ॥
न चंद्रमा, इंद्रचि भासताहे ! । न तारका, हा सुरवृंद आहे ! ॥
व्योमीं जणूं शक्रसभा विराजे ! । तेणेंचि, गे ! हें नभ फार साजे ॥ ४ ॥
किंवा असे हा बहुरत्नहार ! । फांके जयाची नभिं भा अपार ॥
तारापती आणित अर्पिण्याला । अत्यादरानें प्रिय रोहिणीला ॥ ५ ॥
नक्षत्रमेळ्यामधिं चंद्रकांत । क्रीडा करी हा गगनांगणांत ॥
काळ्या ढगाआड लपे विनोदें । ज्योत्स्नाविहारा करितो प्रमोदें ॥ ६ ॥
येतां नभीं सुंदर चंद्रकोर । सानंदचित्तें डुलतो चकोर ॥
उत्कंठ होऊनि कसा सुधा पी ! । तथापि तो तृप्त न हो कदापी ! ॥७॥
कुमुदिनी बघुनी गगनीं शशी । विकसितानन होय पहा कशी ! ॥
सुटत गंध किती सुमनोहर ! । परिमळें भरलें गगनोदर ॥ ८ ॥
हरुनि ताप सदा सुखवी जना । मृदुकरें करुनी मनरंजना ॥
रजनिनायक हा गमतो मना । पुरवितो झटुनी परकामना ॥ ९ ॥
परोपकारार्थचि देह जाणें । आयुष्यसाफल्यचि होय तेणें ॥
ठेवा मनीं यातिल हेंच वर्म । निष्कामसेवा जनिं मुख्य कर्म ! ॥ १० ॥

---

कवयित्री:-**श्री. सौ. वेणूबाई श्रीखंडे** ( ऊर्फ सौ. लक्ष्मीबाई पंडित )

## १६. कृष्णरुक्मिणी-विनोद.

[ चाल:-भूपती खरें तें० ]

एकदां स्वगर्वें पुसे भीमकी हरिला ।
अभिमान माधवें तिचा युक्तिमें हरिला ॥ ध्रु० ॥
षोडशोपचारें पूजुनि तमालनीला ।
तांबूल-त्रयोदशगुणी प्रभुकरीं दिधला ॥

अवलोकी प्रेमें श्रीहरिच्या मुखकमला ।
पाहतां न्यहाळुन, दिसे प्रभू तंव काळा ॥
मनिं ह्मणे-दिसे ही एक उणिव नयनाला ।
मग भीमकबाळा, पुसे विनोदें त्याला ॥
चालः- ती हंसुनि बोलली माता—रुक्मिणी ।
'आश्चर्य वाटतें नाथा !—मम मनीं, ।
मी तुह्मी कुळीं थोराच्या—जन्मुनी ।
केतकीवर्णसम माझी तनु गोपाळा ! ।
परि काळे कां तुह्मि सांगा हें अजि मजला !' ॥ एकदां० ॥१॥
या प्रश्ना परिसुनि काय वदे वनमाळी ! ।
'तूं राजकुमारी, गोकुळिंचा मी गवळी ! ॥
कुंजांत बाळपणिं धेनू वत्सें पाळीं ।
वेताटि हातिं गे ! खांदिं घोंगडी काळी ॥
वृंदावनिं गोमयलिप्त होउनी खेळें ! ।
हुंबरी हमामा, संगें गवळी-बाळें ! ॥
चालः- नाजुक तूं गोरी खाशी,—रुक्मिणी ! ॥
बावनकशि पुतळी जैशी,—रुक्मिणी ! ॥
तुझि माझि बरोबरि कैशी !—रुक्मिणी ! ॥
धांवूनि पातलों, पाहुनि तव पत्राला ! ।
हो सावध अजुनी, वरीं बरें शिशुपाला ! ॥ एकदां० ॥ २ ॥
'शिशुपाळ वरीं !' हे शब्द ऐकतां श्रवणीं ।
तत्क्षणीं रुक्मिणी मूर्च्छित पडली धरणीं ! ॥
मग दीनदयाळू उठला लगबग करुनी ।
सप्रेम बैसवी मंचकिं तिज सांवरुनी ॥
विंजणें वारुनी सावध करि हरि तिजला ।
'देवते ! इंदुमुखि ! विनोद सहजीं केला ॥
चालः- तूं आद्यशक्ति गे ! माझी— प्रियसखे ! ।
तुजविणें तुच्छ हीं सारीं —मज सुखें ।
हें आज सांगतों माझ्या—मी मुखें' ।
हें वदुनि कौतुकें, सुखविलि हरिनें कमला ।
हो 'लक्ष्मी' निशिदिनिं वंदी हरिपदकमला ॥ एकदां० ॥ ४ ॥

## श्री. सौ. गंगाबाई श्रीखंडे ( ऊर्फ सौ. लक्ष्मीबाई कशाळकर. ) यांचीं कांहीं पद्यें.



### १७. मंदोदरी.



( चालः-चंद्रकांत० )

ह्मणते साध्वी लंकाधीशा, " ऐका मम बोला ।
सीताकांता देउनि सीता, सखा करा त्याला " ॥ ध्रु० ॥

रावणचरणीं मस्तक ठेवुनि मंदोदरि बोले ।
" वदतें ह्मणुनी राग नसावा ऐकुनि घ्या ! सगळें ॥
आदीमाया राघवजाया घेउनियां आलां ।
चित्तीं धरुनी दुष्ट वासना नका छळूं तिजला ॥
भूमीबाळा ज्वाला केवळ अग्नीची वाटे ।
वंशवृक्ष हा जाळिल सगळा नसें मुळीं खोटें ! ॥
पतिव्रतेचा छळ जो करितो सौख्य नसें त्याला ।
जाणुनि, नाथा ! देउनि सीता, भोगा सौख्याला ! "॥ह्मणते०॥१॥
मयजा[1] बोले, " मीच थोर हा नका धरूं गर्व ।
श्रीरघुपतिच्या पराक्रमातें ऐकुनि घ्या सर्व ॥
हलाहलातें जेव्हां प्राशी गिरिजेचा कांत ।
नामामृत तें वदनीं घेतां दाह करी शांत ॥
मख रक्षाया राघव जातां ताटकेसि वधिलें ।
मारिचासि तो सिंधु दाविला, सुबाहुला मथिलें ॥
मिथिले जातां पदरज उडतां उद्धरिली शीळा ।
भूमीबाळा देउनि त्याला, मित्र करा अपुला " ॥ ह्मणते० ॥२॥
" शिवचापातें तुह्मी उचलितां अंगावरि पडलें ।
तें रघुनाथें काढुनि हातें, जानकीस वरिलें ॥

---

१ मयासुराची कन्या, मंदोदरी.

सुवेळेसि जाउनी नाथ हो! सीतापति वंदूं ।
कर जोडुनियां प्रार्थू ‘ सखया ! तोडीं भवबंधू ’ ॥
न होय ऐसें तरी रणांगणिं पडतिल तव बंधू ।
राम अगस्ती प्राशिल अपुला हा सेनासिंधू ! ॥
शरण जाउनी त्यास बिभीषण जन्ममरण चुकला ।
जाणुनि, सीता देउनि चुकवा ! जन्ममृत्यु-घाला” ॥ ह्मणते० ॥३॥
रावण बोले, “ प्रिये ! बोल तव असती बहु गोड ।
शरण जाउनी मरण चुकविणें ही न मला खोड ! ॥
देइन सीता तरी जन मला ह्मणतिल बहु भ्याड ।
युद्ध करोनी श्रीरघुपतिचें पुरविन मी कोड ! ॥
मारिन समरीं, मरेन मी तरि, परि नच दें सीता ।
श्रीरघुनाथा जिंकिन आतां, नको करूं चिंता ! ” ॥
विरोध-भक्ती करुनि रावणें रघुपति वश केला ! ।
‘ गंगा ’ भावें कवन-सुमन हें अर्पी रघुपतिला ॥ ह्मणते० ॥४॥



## १८. पांवा.

[ चालः— त्यजि भक्तासाठीं० ]

किति गोड वाजवि पांवा । मनमोहन मुरलीवाला ॥ ध्रु० ॥
ऐकतां हरपलें भान । विसरलेंच भूक तहान ।
लागलें हरीचें ध्यान । झणिं जाउनि पाहूं त्याला ॥ किति० ॥१॥
जमवुनी भोंवत्या नारी । खेळतसे रास मुरारी ।
देतसे मुक्ति त्या चारी । तारिल्या सर्वही अबला ॥ किति० ॥२॥
ठेवुनी पाय तो पायीं । डौलांत उभा जो राही ।
भोंवतीं वासरें गाई । आवडे रूप हें मजला ॥ किति० ॥३॥
पाहुनी रूप हें ऐसें । लागलें ध्यान मज तैसें ।
तव पायीं मन हें बैसें । करिं ऐसें दीनदयाळा ! ॥ किति० ॥४॥
गोपाळ घेउनी संगें । खेळतो खेळ अनुरागें ।
जोडुनी करां त्या मागें । दे ठाव पदीं ‘ गंगे ’ला ॥ किति० ॥५॥



## १९. शबरी.



( चालः—चंद्रकांत० )

एके दिवशीं सिंहकेत नृप मृगयेला गेला ।
वनीं हिंडतां लिंग पाहुनी हर्ष तया झाला ॥
त्या लिंगातें करीं घेउनी शबरातें देई ।
सांगे विधिनें पूजन करितां प्रसन्न हें होई ॥
ह्मणे विनोदें चिताभस्म त्या नित्य अणुनि लावीं ।
ऐकुनि शबरहि लिंग नेवुनी पत्नीतें दावी ॥
लिंग पाहुनी शबरी मोठ्या आनंदें बोले ।
धन्य धन्य, अजि दर्शन देउनि पुनित अह्मां केलें ॥ १ ॥

भक्तीभावें लिंग स्थापुनि पूजा करिताती ।
नैवेद्यातें आणित शबरी मग तो दाखविती ॥
सत्त्व तयाचें बघूं ह्मणूनी शंकर काय करी ? ।
चिताभस्म तें कुठें मिळेना, चिंता शबरांतरीं ॥
येवुनि सदनीं प्रियेसि सांगे, भस्म कुठें न मिळे ।
ऐकुनि शबरी काय वदे त्या, मी देत्यें अपुलें ॥
ऐसें वदली, सदनीं गेली, पतिव्रता नारी ।
घेउनि अग्नी अंगा लावी, चिंता मुळिं न करी ॥ २ ॥

भस्म तियेचें घेउनि शबरें, पूजा करुं लागे ।
पूजारंगीं लीन जाहला भान नसे मागें ॥
देह जाळिला शबरीनें हें नाठवेंचि त्याला ।
आणीं वेगें नैवेद्यातें, ह्मणतो शबरीला ॥
हांक ऐकतां काय करितसे अघटित मदनारी ।
ऐकावें तुह्मिं चित्त देउनी सादर हो ! चतुरीं ॥
जिवंत शबरी करुनी दिधलें अनुपम सौंदर्या ।
वाटतसे जणुं गिरिजा, कमला, सीता, नलभार्या ! ॥ ३ ॥

करीं घेउनी नैवेद्यातें पतिजवळीं आली ।
दाउनि शबरें नैवेद्यातें, तिजसी पाहियली ॥
ह्मणे जाळिला देह तुवां परि अणिलें निळकंठें ।
दर्शन तुजसी दिधलें ह्मणुनी भाग्य तुझें मोठें ॥
भक्तीभावें पूजन करितां प्रसन्न मदनारी ।
जें जें इच्छित तें तें देइल जाणा निर्धारीं ॥
शबरी शबरहि मुक्त जाहले भजुनि उमारंगा ।
जाणुनि शंकरच्चरणीं भावें लीन असे 'गंगा' ॥ ४ ॥

---

## २०. दधिमंथन.



[ चाल—कुंति ह्मणे धांव श्रीहरी. ]

ह्मणतसे यशोदे हरी । 'भागलीस तूं बैस पळभरी !' ॥ ध्रु० ॥
त्या दिनीं काज सारुनी । यशोदा मंथी दधि घेउनी ॥
तो ध्वनी मधुर ऐकुनी । सांवळा तिथें पातला क्षणीं ॥
रविदोर घेउनी करीं । 'तक्र करिन मी' ह्मणतसे हरी ॥ ह्मणतसे० ॥१॥
गोविंदबोल ऐकुनी । यशोदामाय हर्षली मनीं ॥
रवि दोर करीं होउनी । पाहि तें कौतुक मन लावुनी ॥
श्रीहरी मंथना करी । इंदिरा मनीं होय घाबरी ॥ ह्मणतसे० ॥ २ ॥
इंदिरा ह्मणे, सुंदरा । दुजी यांतून निघे इंदिरा ॥
प्रिय होय ती श्रीवरा । डाव हा तिनें साधिला बरा ! ॥
आनंद सुरवरांतरीं । ह्मणति ही निघे सुधा बहु बरी ॥ ह्मणतसे० ॥ ३ ॥
मनिं ह्मणे पार्वतीपती । हलाहल अतां घेउं मी किती ! ॥
पाहुनी मंथनाप्रती । घाबरी प्रजा सर्व होय ती ॥
मग ह्मणे यशोदा सती । 'भागला किं हा लाडका अती !' ॥
उचलुनी घेत कडिवरी । घेइ चुंबना तेंच अवसरीं ॥
सर्वांसि मोक्ष दे हरी । जाणुनी असें तत्पद 'गंगा' धरी ॥ ह्मणतसे० ॥४॥

---

## २१. बागुलबोवा.

(चाल—उद्धवा! शांतनव०)

करुं नको अशा हट्टाला । बघ दारीं बागुल आला ॥ ध्रु० ॥
गोकुळीं यशोदा माता । उठली हो प्रातःकाळीं
संमार्जन करितां वदनीं । ह्मणतसे रामभूपाळी
वेणीही घालुनि बरवी । कुंकुमा लाविते भाळीं
स्नानासी करुनी वेगें । आरती हरिस ओंवाळी
चाल:- मग तक्र कराया घेई
येउनी हरी ते समयीं
ह्मणतसे यशोदे 'आई!
यांत जें घुमत तें देई
काढुनी खेळण्या मजला ॥ करुं नको० ॥१॥
ह्मणतसे यशोदा माता । तें देतां कैसें येई?
एखादी दुसरी वस्तू । खेळाया घेउनि जाई
गोपाळ ह्मणे मातेला । 'तव नयनीं दिसते जी ही
बाहुली सुबकशी खाशी । खेळाया मजला देई
चाल:- खेळेन घेउनी भाऊ
घालीन तिला मी न्हाऊं'
ती कैशी तुजला देऊं?
खेळाया हा घे खाऊ
नायके हरी त्या बोला ॥ करुं नको० ॥२॥
बाहुली नये ती देतां । हा चेंडू घेई बाळा!
दावुनी बोट सूर्याला । श्रीकृष्ण ह्मणे मातेला
'हा देई जननी! मजला । कंदूक करिन मी त्याला
दे दे' तो ह्मणुनी लोळे । नायके कदा मातेला
चाल:- मग ह्मणे यशोदामाता
'हें ऐसें काय अनंता!
तो कैसा येइल हाता?
उगिच कां करिसि आकांता?
बागुलासि देइन तुजला' ॥ करुं नको० ॥३॥

स्फुंदतां स्फुंदतां बोले । ' बोवा तो दावीं मजशी '
कुरवाळुनि माता सांगे । ' बघुं नकोस बाळा ! त्यासी
पंचानन नयन त्रय ते । पाहतां भयाभित होशी '
' दाखवीं ' ह्मणे ' तो आधीं ' । करुनियां हट्ट हृषिकेशी

चाल:- बाहेर घेउनी आली
श्रीसांब पाहुनी भ्याली
श्रीहरिनें सावध केली
हरिहरां भेटती झाली !
नमि 'गंगा' त्या उभयाला ॥ करुं नको० ॥४॥



## कु. कृष्णाताई शंकर श्रीखंडे ( हुजूरबाजार. )
### यांच्या कांहीं कविता.



## २२. सीता—हरण.



( गीति. )

त्या सोनेरि मृगाला पाहुनि सीतेसि लागलें वेड !
कोदंडधारिराघव पुरवाया धांवला तिचें कोड ॥ १ ॥
धांवत धांवत असतां रामानें बाण सोडिला वेगें
लागे त्या हरिणाला कपटी तो असुर ओरडूं लागे ॥ २ ॥
' सौमित्रा ! धांव सख्या ! सत्वर ये संकटांत मी पडलों
हा दैवा ! हत दैवा ! मेलों ! राक्षसमुखांत सांपडलों ' ॥ ३ ॥
रामस्वरापरी तो, असुरस्वर अशुभ परिसिला उभयें
सौमित्रें ओळखिलें कपट परी जानकी वदे सभयें ॥ ४ ॥
' कां हो ! स्वस्थ असे तुह्मि ! जा हो ! आणि घ्या धनुष्य ते बाण
निज बंधुरक्षणास्तव नच जाल तरी तुह्मांसि मम आण ॥ ५ ॥

'माते! सीते! ऐसें बोलसि कां मूढशी कळें न मला
त्रैलोक्याधिप विभु हा सुरगणही सर्व ज्यापुढें नमला' ॥ ६ ॥
हे मूर्तिमंत सत्यचि बोल तिला वाटले मुळीं खोटे
होते विनाशकालीं मति विपरीता असें ह्मणति मोठे ॥ ७ ॥
ह्मणुनी देवी सीता बहु रोषें वदलि ऊर्मिलापतितें
'निजबंधुघात इच्छिसि रघुकुलभूषण तुह्मांसि जे त्राते' ॥ ८ ॥
ऐकुनि वैदेहीचे शब्द बहू कर्णकटु अकल्पितसे
कोमल शुद्ध असें तें झालें सौमित्रहृदय कंपितसें ॥ ९ ॥
'रामाच्या आज्ञेनें तुज रक्षायासि राहिलों येथें
विधि मम वाइट ह्मणुनी तव मनिं हें आजि वांकडें येतें ॥ १० ॥
आज्ञाच तुझी ह्मणुनी जातों, परि ऐक बोल हित ज्यांत
या धनुरेषेपुढतीं जा नच! जरि जाहलाहि कल्पांत' ॥ ११ ॥
बोलुनि यापरि दुःखें जाय जधीं जो महा धनुर्धारी
जनसुकता मनिं वदतें 'आतां नाथासि विजय निर्धारीं' ॥ १२ ॥
तों बटुवेषें आला रावण जो लपुनियां तिथें होता
कपटाचरण करोनी पळवुनि न्याया पतिव्रता सीता ॥ १३ ॥
त्यातें भिक्षा द्याया रेषेच्या येइ जानकी निकट
उचलुनि तिज, पळ काढी अतिवेगें हास्य करित बहु विकट ॥१४॥
आला जटायु, ऐकुनि सीतेची हांक आणखी रडणें
परि अपजय येउनियां शेवटिं त्या प्राप्त जाहलें मरणें ॥ १५ ॥
इकडे मारीचातें वधुनि निघे राम आश्रमा जाया
'ऐकुनि तें वच निष्ठुर काय बरें करिल आपुली जाया?' ॥१६॥
नाना विचार कटुतर रामाच्या उठति अंतरावरती
तों तो सौमित्रातें पाही थोड्याच अंतरावरती ॥ १७ ॥
विस्मयखेदातुरतायुक्त प्रभु जाउनी त्वरें पुसतो
'कां मोडिली ममाज्ञा?' परि लक्ष्मण अश्रु नयनिंचे पुसतो ॥१८॥
आवरुनी शोक जरा भ्रात्यासी सर्व वृत्त मग कथिलें
ऐकुनि तें श्रीरामें बहु मधुवचनें तयासि शांतविलें ॥ १९ ॥

मग ते वेगें दोघे निज उटजामाजि जावया वळले
आले जों ते तेथें वैदेही-हरण होय त्यां कळलें ॥ २० ॥
बहु लक्ष्मण बंधु तरी त्याहुनि करि रामचंद्र दुःख मनीं
" हे सीते ! जनकसुते ! तूं कोठें ?" ह्मणत फिरत सर्व वनीं ॥२१॥

---

## २३. मनाची एकाग्रता.



( गीति. )

शस्त्रास्त्रनिपुण ऐशां राजसुतां इतरही मुलां द्रोण ।
वदला 'आजीं पाहूं शिकला सकलां कलांसि तो कोण' ॥ १ ॥
घेउनि सकलां गेला आम्र-तरूनिकटिं उपवनीं एका ।
बोले 'त्या शाखेवरि कृत्रिम तो भास ठेविला देखा ॥ २ ॥
निज धनु सज्ज करोनी एकेकानेंच या स्थळीं यावें ।
आज्ञा करीन तत्क्षणिं बाणानें लक्ष्यशीर्ष भेदावें' ॥ ३ ॥
आला युधिष्ठिर पुढें सत्याचरणांत जो सदा दक्ष ।
ठेला उभा तरुतलीं जेथुनि ये पाहण्यास तें लक्ष्य ॥ ४ ॥
घटकेनें द्रोण ह्मणे 'काय तुझे पाहतात, रे! नेत्र ?' ।
'दिसतो विहग मला तो दिसती गुरुवर्य, बंधु, मम मित्र' ॥५॥
ऐकुनियां उत्तर हें, बोले 'नच शक्य तुजसि हे गोष्टी' ।
हांसति मुलें तया बहु, होय युधिष्टिर मनामधें कष्टी ॥ ६ ॥
भीम पुढें मग आला घेउनि हातांत तें धनुष्य भलें ।
'काय दिसें तुज ?' ह्मणतां, बोले 'दिसतात पक्क आम्र फलें' ॥ ७ ॥
पिकला हंशा अतीशय ह्मणती 'हा भक्त शुद्ध खादीचा' ।
कौरव ह्मणती 'खाउनि तोटा करणार हाच गादीचा!' ॥ ८ ॥
दुर्योधनादि आले, परि कां ती गोष्ट त्यांस साधावी ? ।
पार्था, 'ये!' द्रोण ह्मणे जो सर्वां बालकांत मेधावी ॥ ९ ॥
धनु निज सज्ज करोनी नमुनी गुरु-चरण शिष्य जो सु-भट ।
भासशिरीं स्थिर दृष्टी लावुनियां राहिला उभा नीट ॥ १० ॥

किंचित्कालें तो गुरु बोले ' बा ! काय पाहसी सांग ।
दिसतो कां भास तुला, मी, मित्र, तशीच बंधुची रांग! ॥११॥
' कांहिं न दिसतें मातें भासाचें दिसतसें परी शीर्ष ' ।
शिष्योत्कर्षेच्छूतें ऐकुनि तें जाहला किती हर्ष ! ॥ १२ ॥
बोले ' तूं शिष्य खरा, अध्यापन सफल आजि मम झालें ।
कृति दूरचि राहों दे तव वचनानेंच चित्त मम धालें ' ॥ १३ ॥
गुर्वाज्ञेनें इषुनें अर्जुन तें शीर्ष भू-तलीं आणी ।
मग त्या सर्व मुलांतें द्रोणाची काय बोलली वाणी ॥ १४ ॥
' एकाग्रता मनाची सर्वहि विद्या शिकावया लागे ।
अनुसरुनियां तियेला सर्वहि येतात हो ! तिच्या मागें ' ॥ १५ ॥
पार्थापरि विद्यार्थी ज्यावेळीं चित्त करुनि एकाग्र ।
अध्ययना करितिल तैं होइल अंकित सरस्वती साग्र ॥ १६ ॥

---

## २४. संक्रान्तीचा हलवा.

चालः—चंद्रकांत.

संक्रमणाचा गोड असा हा सण शोभवि पौषा ।
त्या सुदिनाचा हलवा बोले ऐका निज भाषा ॥
' वरिवरि पाहुनि बुधजन तुह्मी भक्षुं नका मातें ।
विचार करुनी मजपासुनिया घ्या हो ! बोधातें ॥ १ ॥
ज्यापरि दिसतों बाह्य शुभ्र मी त्याच परी चित्तीं ।
मजपासुनियां कोणी न कधीं कटुता अनुभविती ॥
शर्करेचिया संगें मी निज कटुतेला नाशीं ।
तिजपरि बनलों ज्यापरि दुर्जन सज्जन-सहवासी ॥ २ ॥
ज्यापरि होउनि गुणी मिळविली मी लोकप्रियता ।
त्यापरि मिळवा धरुनि सु-संगत बाह्यांतर-शुचिता ॥
अपशब्दानें दुखवा न कुणां बोला मंजूळ ।
विसरा न कधीं या बोधातें ' विनवी तिळगूळ ॥ ३ ॥

## डॉ० रामचंद्र चिंतामण श्रीखंडे, एम्. बी.; बी. एस्.
### यांच्या कांहीं कविता.

## २५. आईपाशीं प्रार्थना.
( द्रुतविलंबित वृत्त. )

विनत मी गुरुमाउलिये ! तुला उचलुनी कुरवाळ किं या मुला ! ॥
पुरविं कोड मनीं वसलेत गे ! तरिच बाळ तुझें असलें तगे ॥ १ ॥
करुनि आजवरी सुखवृष्टिला खुलविलें मानिंच्या मम दृष्टिला ॥
ह्मणुनि हें सरतों कवळावया चरण; चित्त तसेंच वळावया ॥ २ ॥
किति तुझें अमृतासम गोड तें सुगुणगायन चित्त न सोडतें ॥
विमलता मनिं वर्धन पावते भुजलतांप्रति जैं पद गावतें ॥ ३ ॥
मम मनीं सुविचार सदा वसो ! तव पदीं नत शीर्ष असें असो ॥
स्मृति तुझी करवो मम मानस स्थिर, सुधीर, पवित्र, निरागस ॥ ४ ॥
मजकडूनि घडोघडिं गे ! घडो सकलसत्कृति; दुर्जन नावडो ॥
तव पदांबुजिं मन्मन हें जडो मम तयावरि मस्तक हें पडो ! ॥ ५ ॥
मन गमे मज हें बहु चंचल नियम ना दिसतो कधिं वंचिल ! ॥
तर विवेक लगाम सदा करीं वसुनि नित्य करो मम चाकरी ॥ ६ ॥
विषय सर्व गमोत विषापरी न मन हें भटको कधिं त्यांवरी ॥
नमन अम्ब ! तुझें बहु आवडो ! रिपुसमूह समूलहि हा झडो ॥ ७ ॥
ह्मणति ज्या जन यौवन त्याप्रती पद समर्पितसे शिशु संप्रती ॥
तर सुमार्ग सदा मजला कळो ! विरघळो कुविचार; तृषा गळो ॥ ८ ॥
सकलशैशवसौख्यहि भोगिलें दिन समग्र सुखात्मिक मागिलें ॥
गमतसे तव ही मजला दया जननि ! वारिशि तूं शिशुच्या भया ॥ ९ ॥
सुमति, सज्जन, थोर विभूतिचें चरित सुंदर नित्य जरी सुचे ॥
तरिच हे पद नीतिपथीं चलें अमृत सच्चरितांवरि सिंचलें ! ॥ १० ॥
मम कृती न कधीं दुखवो परा उपकृती करण्यास असो त्वरा ॥
सुवच सत्य सदा वदनीं निघो ! तव कृपामय नेत्र अह्मां बघो ! ॥ ११ ॥
जननि ! नित्य असो तव सन्निधी मज मिळो तव सद्गुणसन्निधी ॥
अधिक काय वदूं ? नच आकळे जगतिं जें तुज, तें मज नाकळे ॥ १२ ॥
मन रमो कविसत्कृति पाहतां नच दमो हरिचें यश चाहतां ॥
मधु गमो भवसागर हा महा तुज नमो विनयें करि 'राम' हा ॥ १३ ॥

---

## २६. कृष्ण-गुंफा.

### १. अंगाई.

हां ! नीज अतां तान्ह्या ! माझ्या बाळा ! ।
नीज रे ! नीज गोपाळा ! ॥ ध्रु० ॥

ही गोकुळिंची गौळण गाणीं गाई
कर मुला ! झणीं अंगाई ! ॥
कीं रडण्याची हंसुनि अशी भरपाई ?
दृष्ट तरी काढा, बाई ! ॥
चालः— किति आंतुनि येत उमाळा ।
हास्याचा वेळोवेळां ! ।
लागेना कैसा डोळा ? ।
किति वाजविशी बाळा ! घुंगुरवाळा ?
नीज रे ! नीज गोपाळा ! ॥ हां ! नीज अतां० ॥१॥

किति सुरेख हें भाळीं पिंपळपान
कानांतहि डूल लहान ॥
हें हंसणारें गोजिरवाणें ध्यान,
विसरे कीं भूक तहान ! ॥
चालः— कमळासम सुंदर डोळे ।
वरि रुळती कुंतल काळे ।
वदनांत बोट हें कोंळें ।
किति वेळ हरी ! करिसि असा तूं चाळा ?
नीज रे ! नीज गोपाळा ! ॥ हां ! नीज अतां० ॥२॥

मी भिववुं कशी ? हंसणाऱ्या या जीवा
बोलावुनि बागुलबोवा ॥
कुणि रुसा हंसा ! एकच धंदा ठावा
रडणें तें नाहीं नांवा ! ॥
चालः— ही मोहनमूर्ती तान्ही ।
झोंपेल कशी या स्थानीं ! ।
विनवी त्या 'राम' नमूनी ।
मम हृदयाचा तुजला हो झोंपाळा
नीज रे ! नीज गोपाळा ? ॥ हां ! नीज अतां० ॥३॥

## २. नंदकिशोर.

( चाल—सबसे राम भजन० )

हरि हा कोमल नंदकिशोर । सखये ! मानस हरतो चोर ! ॥ध्रु०॥
कुंजवनामधिं मुरली वाजवि मंजुळ मेघश्याम ।
ऊठ गडे ! चल जाऊं तिकडे कांहिं सुचेना काम ।
विश्वसुंदरा बघण्यावांचुनि नाहिं मना आराम ।
गोकुळिंचा हा चांद बघाया झुरला चित्तचकोर ॥
हरि हा कोमल नंदकिशोर । सखये ! मानस हरतो चोर ॥ १ ॥
कानिं कुंडलें सूर्यचंद्रसम पायीं घुंघुर चाळ ।
शोभतसे शिरिं मुकुट भरजरी, कंठिं रुळे वनमाळ ।
पद्मनेत्र तो बळरामानुज राजस मोहन बाळ ।
पाहुनि ऐसा कृष्णपयोधर, नाचे मन जणुं मोर !
हरि हा कोमल नंदकिशोर । सखये ! मानस हरतो चोर ॥ २ ॥
बाळ शोभला पीतांबरधर बहु गोजिरवाणा ।
भाळीं पिंपळपान विराजे, तो यादवराणा ।
भूल पाडतो मजसी बाई ! मोत्याचा दाणा ।
ऐक ऐक हा मंजुळ पांवा कौतुक उपजवि थोर ॥
हरि हा कोमल नंदकिशोर । सखये ! मानस हरतो चोर ॥ ३ ॥
देव, यक्ष, गंधर्व, अप्सरा ऐकति माधवगान ।
धेनु, वत्स, मृग, हंस, कोकिळा विसरलिं भूक तहान ! ।
बल्लवांगना अखिल मोहिल्या जरि हा बाळ लहान ।
मूर्ति कोंवळी अमृतवर्षिणी, सुंदर चंदिर–कोर ॥
हरि हा कोमल नंदकिशोर । सखये ! मानस हरतो चोर ॥ ४ ॥
नंदतनय लावण्यसिंधु हा गोवर्धनधारी ।
गोपसखा यदुराय आमचा प्रेमळ कैवारी ।
धांवत तिकडे जाति कुरंगी, गोकुळिंच्या नारी ।
कृष्णाधरिंची वेणु ऐकुनी डोलत ' राम ' समोर ! ॥
हरि हा कोमल नंदकिशोर । सखये ! मानस हरतो चोर ॥५॥

## ३. श्रीकृष्णगीत.



( श्लोक उपजाति. )

कथा अशी कीं, परिसा मुळांत
श्रीकृष्ण खेळे बहु गोकुळांत ॥
गोपाळमेळाहि बरोबरीचा
चाले तिथें खेळ परोपरीचा ॥ १ ॥
दांडूचिनी खेळति खेळ केव्हां
चेंडूफळी खेळ लगोरि केव्हां ॥
आट्यापट्या आवडतोहि खोखो
मौजेंत ते हांसति सर्व ‘ खो खो ! ’ ॥ २ ॥
पोहावयाला यमुनानदीला
जाती सखे सर्व अनेकवेळां ॥
ते पोहती, डुंबति खोल डोहीं
नानापरी ठोकति ते उड्याही ॥ ३ ॥
“ कृष्णा ! बळ्या ! थांबविं दांडगाई
पोरें परी फारचि चांड बाई ! ॥
राखा तुह्मी केवळ बैल, गाई ! ”
बोले अशी ती मुलग्यांस आई ॥ ४ ॥
“ हीं शेंबडीं जाहलिं लांब नाकें
डुंबू नका हें तरि एक ऐकें ! ”
बोले यशोदा भितरी तरी तो
पोहावया चोरुनि चोरें जातो ॥ ५ ॥
“ रे ! सांगतें एक उगाचि ! कान्हा !
अजूनही तूं तरि काय तान्हा ॥
तूं गोडसें पाडस होय माझें !
खोड्या तुला या करणें न साजे ! ” ॥ ६ ॥
फिरे हरी फारचि डोंगरांत
घरीं न येतो जरि झालि रात ॥
ह्मणालि आई सहजीं यशोदा
“ अंधार झाला; मग काय शोधा ! ॥ ७ ॥

“ आधींच काळा असत्ती, हरीबा !
वणावणा हिंडसि तूं तरी बा !
होईल माझा बळराम काळा !
त्याला नको नेउंस; जा निराळा ! ” ॥ ८ ॥

✣ ✣ ✣

उठे सकाळीं करितो न्यहारी
जमा करी गोपसखे मुरारी ॥
नें वाजवीतो अलगूज गोड
सांगे ‘ चराया वनिं गाइ सोड ! ’ ॥ ९ ॥

काळें मऊंसें उबदार एक
घे कांबळें तो सरदार-लेंक ! ॥
हातांत काठी कमरेस पट्टा
पोषाख साधा पण धट्टकट्टा ! ॥ १० ॥

गाऱ्हाणिं रोजीं परिसे दहादां
भंडावली मावलि ती यशोदा ॥
कृष्णासि मारी मग ती दबावा !
परंतु माया करि नंदबाबा ! ॥ ११ ॥

✣ ✣ ✣

एका सकाळीं तिनचार बाया
वाड्यांत आल्या जणुं काय खाया ! ॥
रागावुनी कांपति त्या थरारा
कृष्णासि दावूं म्हणती दरारा ॥ १२ ॥

डोळेहि त्यांचे फिरती गरारा
‘ ओढूं हरीला ’ म्हणती ‘ फरारा ॥
त्या लांब कानांसि चिरूं चरारा ’
गाऱ्हाणिं हीं सांगति त्या भरारा ॥ १३ ॥

“ बाई ! तुझ्या आंवर बालकाला
नाहीं तरी सांगिन मालकाला ॥

हें पोर काळें परि हाय सोदें !
	मारी मला खापरि हा यसोदे !" ॥ १४ ॥

"पर्ड्यांत माझ्या बघ बाळकीचा
	विस्तारला मांडव वाळकीचा ॥
तो तोडिला ! मी करुं काय सांग
	नकोत पोरें ! बरिं माकडें ग !" ॥ १५ ॥

"माझ्याहि खोपीवर गोपळीचा
	फोंफावला विस्तर भोपळीचा ॥
तैसीं मक्याचीं भरलेलिं शेतें
	याणेंचि गे ! मोडियलीं; कसें तें ?" ॥ १६ ॥

"मी सांगतें आणिक, बाइ ! थांबा !
	माझ्याहि बागेमधिं रायुआंबा ॥
आली मुलांची परि टोळधाड
	हा कोंडवाड्यामधिं पोळ धाड !! ॥ १७ ॥

"दह्यादुधांचीं जरि उंच शिंकीं
	तो खांकरे आणि हळूंचि शिंकी ॥
खुणावितो आणवितो सख्यांना
	बोले अरे प्या ! सगळेचि घ्या ना !" ॥ १८ ॥

"संभाळ गे ! बाळ तुझा घरांत
	होतें मला येइल कैंवि रात ॥
न सासवा, जाचत हा सुनांना
	तूं बांधुनी घाल ग ! वासुनाना !" ॥ १९ ॥

✤ ✤ ✤

ऐके यशोदा सगळी कहाणी
	हरीस काठी हळु एक हाणी ॥
मनांत रागावलि नंदराणी
	डोळ्यांत पाणी पुशि चक्रपाणी ॥ २० ॥

बोले यशोदा मग बायकांना
“ खुळाचि हा बाळक होय कान्हा !
जा हो ! बयांनो ! अपुल्या घरास
संभाळतें मी मम बाळरास ! ” ॥ २१ ॥

आला तिथें नंतर नंदराणा
दिसे हरी अंगणिं दीनवाणा ॥
प्रेमें मुलाला उचलोनि घेतो
गोंजारुनी हांसवुनी निघे तो ॥ २२ ॥

गोपाळ आले परि त्यांत सोद्या
पेंद्या पुसे “ हाय कुठें ग ! गोंद्या ? ॥
आई ! कुठें तो बळरामदादा ? ”
सर्वांसि ती भेटविते यशोदा ॥ २३ ॥

भेटे हरी त्या मग नागड्यांना
कुर्वाळि गोपाळ पुन्हां गड्यांना ॥
आनंद झाला सगळ्या मुलांना
खोड्याहि आरंभिति सर्व नाना ॥ २४ ॥

❖ ❖ ❖

अहो ! जरी आवडले चवीस
श्लोकांस या गा तरि पंचवीस ॥
संसारथंडीस भिऊनि जात
‘रामा’सि घे रे ! हरि ! कांबळ्यांत ॥ २५ ॥

❖ ❖ ❖

ग्यां उपजातिश्लोकीं गाइयला कृष्णबाळ पंचविशीं ॥
तरिच तरीन मुकुंदा ! भवबाजारीं जरी न वंचविशी ॥ २६ ॥



# ४. कालियामर्दन.

( श्लोक )

श्रीकृष्ण मारी उडि खोल डोहीं । कदंबवृक्षावरुनी पहा ! ही ॥
अगाध पाणी यमुनानदीला । परंतु तो बालक नाहिं भ्याला ! ॥ १ ॥

तो कालिया दुष्ट विखार काळा । गुंडाळुनी आवळि नंदबाळा ॥
चावे करारा कितिदा तयाला । परंतु तो बालक नाहिं भ्याला ! ॥ २ ॥

कुमार योद्धा सुकुमार अंग । हा इंद्रनीळासम नीलरंग ॥
युद्धासि तत्काळचि सिद्ध झाला । परंतु तो बालक नाहिं भ्याला ! ॥३॥

कृष्णासवें खेळुनि युद्ध पाहे । तों कालिया अंतरिं धाक वाहे ॥
ह्मणे ‘ अहो ! बाळ लहान वाटे । परंतु आतां मम ऊर फाटे ’ ॥ ४ ॥

क्रोधें तया माधव फार ठोकी । तो नाग तेव्हां बहु रक्त ओकी ॥
झाली नदी ती यमुनाहि लाल ! । परंतु हा बालक हो खुशाल ! ॥५॥

असा तदा मर्दुनि नम्र केला । हरी असे भक्तजनां भुकेला ! ॥
गाई मुखें कीर्तिसुधा हरीची । शिरें पदीं लावित नाग पांची ॥ ६ ॥

घेऊनि माथां मग कृष्णनाथा । सेवीत लाथा, मुखिं गात गाथा ॥
हर्षाश्रु तेव्हां किति ते गळाले । योग्यासि जें दुर्लभ तें मिळालें ! ॥ ७ ॥

उभारुनी कोमल पाय डावा । श्रीकृष्ण तो वाजवि गोड पांवा ॥
नाना तनाना हरि घेइ ताना । ज्या ऐकतांना डुलतात माना ! ॥ ८ ॥

वनीं लतांना, वनदेवतांना । नभीं सुरांना, घरिं वासुरांना ॥
वृक्षीं पिकांना, गृहिं गोपिकांना । मोहीत कान्हा करि गोड गाना ॥९॥

मोरांमृगांना सकला खगांना । साऱ्या पशूंना सगळ्या शिशूंना ॥
नंदादिकांना बहु हर्ष देई । जो कृष्ण त्याचें यश ‘राम’ गाई ॥ १० ॥

## ५. मुकुंदपूजा.*

(श्लोक)

प्रभातकाळीं उठुनी त्वरेनें । म्यां आणिलीं हिंडुनि बाग रानें ॥
जीं हीं फुलें, तीं तव पूजनाला । समर्पितें मी वसुदेवबाळा ॥ १ ॥
सुगंध ज्यांचा सुटला वनांत । उन्मत्त ते ज्यांवरि भृंग गात ॥
गंधें, स्वरें शोधुनि काढिलीं जीं । तीं अर्पितें मी सुमनेंचि ताजीं ॥२॥
देवा ! मुकुंदा ! मकरंद ज्यांत । तुडुंब होता भरुनी वहात ॥
अद्यापि तो ज्यावरि गात आहे । मिलिंद तें पद्म तुह्मांस वाहें ॥ ३ ॥
रसाल वृक्षा धरुनी उभी जी । लता वनीं मालति ती पहा ! जी ! ॥
भासे तुझ्या सन्निध जेंवि राधा । वाहें तुला तत्सुमहार साधा ! ॥ ४ ॥
या कोंवळ्या मोगरिच्या कळ्यांनीं । ना दाविलें हृद्गत पाकळ्यांनीं ॥
भेटावया काय तुला पहात ? । हो ! हासल्या जोंवरि मी वहात ! ॥ ५ ॥

---

* [ प्रस्तुत मुकुंदपूजेचे २० श्लोक संपूर्ण होतांच माझे वडील बंधु ती कै. डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे, एम्. बी. पी. एस्. यांजकडे अवलोकनार्थ मी पाठविल्यानंतर त्यांचें जें मला पत्रोत्तर लाभलें तें अत्यंत रसिकपणाचें वाटल्यावरून येथें बहुतेक समग्रच देत आहें. शिवाय त्यांत त्यांनीं रचलेले सहा सुंदर श्लोक असून त्यांचे थोडक्यांत त्यांनीं मार्मिक विवरणही केलें आहे. हे सहा श्लोक मुकुंदपूजेच्या ११ व्या श्लोकानंतर ह्मणून १२ ते २० श्लोक त्यानंतर घ्यावयाचे. समाप्तीचा २१ वा श्लोक नंतर बरेच दिवसांनीं जोडला आहे. याप्रमाणें सर्व मिळून हे २७ श्लोक होतील —रा चिं श्री ]

---

हैदराबाद सिंध. श्रीसद्गुरुमायप्रसन्न. ता. २६।८।२१

कृतानेक आशीर्वाद उपरी विशेष. आपलें ता. २१ चें हृदयस्पर्शी गद्यपद्यात्मक वामनाकृति शब्दमय पण विराटासही लाजविणाऱ्या अर्थमाहात्म्यानें भरलेलें पत्र पोंचलें. हॉस्पिटलमधेंच मिळाल्याबरोबर वाचूं लागलों. कांहीं श्लोकांतील भक्तिप्रेमभावना वाचतांना माझ्या डोळ्यांतून सहज आनंदाश्रू येऊं लागले. त्यावेळीं जवळच बसलेल्या दुसऱ्या डॉक्टरांचे अस्तित्वाचा मला विसर पडला. मग त्यांनीं " What's the matter ? Doctor ! (डॉक्टर ! काय झालेलें आहे ? ) " ह्मणून मला विचारलें; " Anything serious ? (कांहीं गंभीर स्वरूपाचें आहे ?) " मग मी जागा झालों व ह्मणालों " Yes, something very serious; honestly serious, and so I was touched within. My brother has written to

( यापुढील मजकूर पृ ४२ ते ४८ अखेर टीपेंत पहावा )

सु-वर्ण चांफाहि अवर्णनीय । सुगंध ज्याचा गगनीं न माय ॥
हे पाय देवा! स्थल योग्य त्याला । समर्पितांना मज हर्ष झाला ॥ ६ ॥
जाई, जुई मेळविण्यास जाई । अर्पावया ती तुज शेषशायी! ॥
ही अंजली अर्पित मी मुकुंदा! । असो तुझें पूजन हाचि धंदा ॥ ७ ॥
माला विशाला तुळसीदळांची । जियेंत दाटी बहु मंजरींची ॥
कृष्णा! तुझ्या कंधरिं घालितें ही । तुझ्या मुखीं निश्चल दृष्टि राही ॥ ८ ॥
देवा! अहाहा! कमळें कितीही । एकत्र केलीं तुजलागिं मी हीं ॥
शोभा तयांची परि होत नाहीं । जशी मुखाची तव रोषनाई ॥ ९ ॥
हें पुष्प कृष्णा! 'कमलाक्ष' नाम । वाहोनि तूंतें करितें प्रणाम ॥
तें आवडावें कमला-पतीला । नामें प्रियेच्या पति मोहियेला! ॥ १० ॥
सुकोमलांगी कमला मुकुंदा! । आहे न कीं तें बघ, मोदकंदा! ॥
तोलावयाला तुजलागिं देतें । हें माधवा! पुष्प शिरीष हातें ॥ ११ ॥

---

me a piece of his poetry and some parts in it are very pathetic. (होय! खरोखरच अति गंभीर स्वरूपाचें काहीं असून त्यानें माझें अंतःकरण हलवून सोडलें आहे. माझ्या बंधूनें मला आपली एक कविता लिहून पाठविली आहे. व तिच्यांतील कांहीं भाग अत्यंत हृदयस्पर्शी आहेत.)"

"Let me see it, please! Oh, the writing is microscopic; splendid. Let me hear it please. (बरें! पाहूं द्या तें मला. ओहो! फारच बारीक अक्षर. उत्तम! मला ऐकवा तरी तें!)"

मी ह्मणालों "It is in Marathi. I shan't be able to translate it all. But I shall give you a sample. (तें मराठींत आहे. सगळ्याचेंच भाषांतर मी काय करणार! तथापि आपल्यास एक नमुना दाखवितों.)" असें ह्मणून—

"या कोंवळ्या मोगरिच्या कळ्यांनीं । न दाविलें हृद्गत पाकळ्यांनीं ॥
भेटावया काय तुला पहात? । हो! हांसल्या जोंवरि मी वहात ॥ ५ ॥"

याचें भाषांतर करून सांगितलें. तें ऐकून त्यांना आनंद झाला; पण डोळ्यांस पाणी आलें नाहीं; जसें माझ्या आलें. प्रथम पाणी, या श्लोकांतील सौंदर्य अनुभविल्यामुळें आलें. नंतर, माझ्या स्नेही डॉक्टराच्या डोळ्यांस पाणी आणण्याइतकें भाषांतर मला साधलें नाहीं ह्मणून आलें. मी दोन्ही डोळ्यांतील दोन्ही वेळचे अश्रू दोन वेळां दोन निरनिराळ्या हातरुमालांनीं व दोन हातांनीं पुसले.

हा केवडा माधव ! अर्पितांना । हो केवढा हर्ष मना विलीना ! ॥
तूं सांवळा हा अतिगौरकांति । विद्युल्लता शोभवि मेघपंक्ति ॥ १२ ॥
अनेक पुष्पें तुज वाहियेलीं । ते धन्य बा ! पादप, धन्य वेली ॥
तरीच हें सार्थक जन्म होई । दिलें तुला तें जरि शेषशायी ! ॥ १३ ॥
शेवंतिकेचें सुम पद्मनाभा ! । ग्यां वाहिलें वाढवि तें तुझी भा ॥
आतां असें पल्लव कांहिं देत । चतुर्भुजा ! घे दुजिया करांत ॥ १४ ॥
हे सांवळ्या ! सांवाळि कोंवळीं हीं । घ्यावीं सुगंधीं तुळसीदळेंही ॥
तीं आवडीचीं ह्मणुनी दिलीं बा ! । घ्या ! आणखी घ्या ! प्रभुराज ! थांबा ॥१५॥
झाली मुकुंदा ! परडी रिकामी ! । कंटाळलें नाहिंच पूजना मी ॥
पूजा न संपो अशि हौस माझी । वाहीन नामें कुसुमें तुझीं जीं ॥ १६ ॥
कृष्णा ! मुकुंदा ! वृषभासुरारे ! । जनार्दना ! कंसविमर्दना रे ! ॥
हरे ! मुरारे ! घनसांवळ्या रे ! । पावा मला या क्षणिं या जि सारे ! ॥१७॥

---

'मुकुंदपूजा' उत्तम साधले हें लिहावयास नकोच. पूजक गोपीप्रमाणें 'पूजा न संपो अशि हौस माझी' ही असल्यामुळें वीस श्लोकांची पूजा जरा आखूड वाटते. तथापि 'परडी रिकामी' झालेली ऐकून मुकुंदानें आणखी कांहीं नवीं फुलें पाठविलीं आहेत. द्रौपदीस, दुःशासनासारखा दांडगासुद्धां दमेल, इतकीं लुगडीं पुरविणारा दयाळु गडी, आपल्या भक्त गोपीची परडी रिकामी कशी राहूं देईल ? या फुलांची तिनें आवडतील तशी गुंफून माळ करून मुकुंदास घालावी. तीं सुमनें अशीं:—

(श्लोक)

त्वन्नेत्रसादृश्य बघोनि नामी । पाण्यांतुनी आणियलीं पद्मा ! मी ॥
इंदीवरांची अशि घाल माळा । कृष्णा ! तुला कोण ह्मणेल काळा ? ॥ १ ॥
गुलाबपुष्पें सगळीं सुगंधी । अर्पावयाची तुज हीच संधी ! ॥
यांचेहुनी रक्त असें पद्मा रे ! । मच्चित्त पायीं तुझिया मुरारे ! ॥ २ ॥
पूजीन आतां बकुळीफुलानें । तर्डीस देवा ! मम हेतुला ने ॥
जिकी जगा साच सुगंध आहे । सुदर्शनाचे परि शोभताहे ॥ ३ ॥
स्वर्गीय हें सत्सुम पारिजात । दाही दिशा वास भरोनि जात ॥
करो तुला हें सदया ! प्रसन्न । भामेसि केलें जरि पूर्वि खिन्न ॥ ४ ॥
ही कोमलाचार सपुष्प पाच । रंगारसाचा हृदयांत नाच ॥
भोगीं इची तूं सुखदा नवाई । जरी गुणैश्वर्य तुझें सवाई ॥ ५ ॥
सुवास बाहेर जरी असावा । तरी तुझा वास मनीं वसावा ॥
भरीं मला तूं अपुल्या प्रभावें । किंवा करीं लीन तुझ्यांत भावें ! ॥ ६ ॥

विशालनेत्रा ! तुजला पहातें । हा देह देवा ! चरणीं वहातें ॥
'कृष्णा ! मुकुंदा !' ह्मणुनी वहातें । तुझ्याच पायीं प्रभुजी ! रहातें ॥१८॥
हे कान ऐकोत तुझेच गाना । हे नेत्र पाहोत मुकुंदराणा ॥
करोत पूजा तव, हात माझे । हें ना, तरी सर्वहि होय ओझें ॥ १९ ॥
प्रभो ! माझी वाणी गुणगण तुझे ती गुणगुणो ।
तुझीं गावो गाणीं, विमल तव नामावलि ह्मणो ॥
मना ! गोविंदाचें स्मरण करणें विस्मरुं नको ।
मुकुंदस्थानाचा जन सरळ हा मार्ग न चुको ॥ २० ॥

❖ ❖ ❖

वृंदावनीं सुंदर एक गोपी । पूजा अशी माधवजीस ओपी ॥
संतोषलें दैवत कृष्णनाम । वंदीतसे त्या उभयांसि 'राम' ॥ २१ ॥

---

आतां श्लोकवार थोडें विवरण देतों:—

श्लोक १ इंदीवर कमलें फारच काळीं, त्यांपुढें मुकुंदाचा काळेपणा फिका. शिवाय 'कृष्णा' ह्मणण्याचा आपला हक्क गोपीनें राखून ठेविला आहे !

श्लोक २ तूं जर माझ्या चित्तांत शिरशील तर तें गुलाबाहूनही रक्त आहेसें पहाशील.

श्लोक ३ बकुलपुष्पाचें सुदर्शनचक्राशीं साम्य आकारांत. त्याचप्रमाणें चक्र जसें जगजेते तसाच पुष्पाचा सुगंध जेता व आकर्षक.

श्लोक ४ 'पारिजातकानिमित्त भामा रुसली श्रीहरिवरी । तिला तो समजवि नानापरी '। तेंच हें फूल तुला पूर्वीच्या सुखद आठवणीनें प्रसन्न करो !

श्लोक ५ 'पाच' नांवाची वनस्पति. श्रीकृष्ण षड्गुणैश्वर्यसंपन्न आहे पांच सर्वे सवासहा ह्मणून सवाई. हेंच वर्णन पर्यायानें व श्लेषार्थानें तरुण गोपीस लागेलसें वाटतें.

श्लोक ६ 'वास' शब्दावर श्लेष. कृष्णानें सबाह्यांतर भरणें किंवा कृष्णांतच विरघळून जाणें. कोणतेंही एक कर ह्मणजे अद्वैतानुभव येवो !

शिवाय या पूजेंत कस्तूरीचा नामनिर्देश नाहीं. तो असलेला एक श्लोक मिळून २७ श्लोक असल्यास १०८ चरण होतात व १०८ चरणांची माळ इतर मणिमालेप्रमाणें शोभिवंत होईल. १०८ श्लोक करविणेंही मुकुंदास अशक्य नाहींच. ... ... ....

कळावें हे आशीर्वाद. शंकर



## ६. माधवगीत.



[ माझ्या वृद्ध भगवद्भक्तिपरायण अत्याबाई ( आतां कै० ) ती. आवडीबाई ( आऊअक्का ) यांनीं हरिनामस्मरणास योग्य असें एक गीत रचण्याविषयीं मला आज्ञा केल्यावरून मीही हें आवडीनें रचलें ( १९२१ नोव्हेंबर ) व त्यांस सादर केलें. श्रीमद्भागवतांत १०।३९।२१ मध्यें ' गोविंद दामोदर माधवेति ' असें आहे तसेंच येथें ' मुकुंद नारायण माधव ' अशीं भगवन्नामें घेतलीं आहेत. सहजच नामसंकीर्तनाबरोबर अल्पसा कथाभाग असावा या हेतूनें ' यशोदा श्रीकृष्णास प्रातःसमयीं सृष्टिसौंदर्य वर्णून उठवीत आहे, व नंतर शेषशायी भगवान् व भगवद्भक्त यांचें वर्णन करून बालकृष्णास सांगत आहे,'असा साधाच कथाभाग कल्पिला आहे. —रा. चिं. श्री. ]

( श्लोक. )

श्रीमाधवाची जननी यशोदा । प्रभातकाळीं उठवी मुकुंदा ॥
जागे करीते सुकुमार हातें । मुकुंदनारायणमाधवातें ॥ १ ॥
" उठीं उठीं श्रीधर! राजसा! रे । दारीं मिळाले बघ गोप सारे ॥
ते मारिती हांक तुला पहा! तें । मुकुंदनारायणमाधवातें ॥ २ ॥
उठीं उठीं संपलि रात्र बाळा ! ' कूऊ ' करी कोकिळ ऐक काळा ॥
वत्सप्रिया ! वत्स तुला बहातें । मुकुंदनारायणमाधवातें ॥ ३ ॥
बा ! पद्मनेत्रा ! बघ रम्य पूर्व । शोभा मला भासतसे अपूर्व ॥
सजे जशी काय बघावयातें । मुकुंदनारायणमाधवातें ॥ ४ ॥
तेजस्वितारागण पाहिं सारा । लोपे, परी शोभत शुक्रतारा ॥
पहावया उत्सुक हा प्रभाते ! । मुकुंदनारायणमाधवातें ॥ ५ ॥
अंधार बाळा ! सगळा दडाला । विहंगमांचाहि थवा उडाला ॥
ती सारिका कोमलकंठि गाते । मुकुंदनारायणमाधवातें ॥ ६ ॥
पक्षी पहा सुंदर लालरंगी । नारिंगि, कित्येक अनेक रंगी ॥
गाती जणूं मंजुळ शब्दजातें । मुकुंदनारायणमाधवातें ॥ ७ ॥
पूर्वा दिशा पांघरि शालु लाल । कीं, हा तिनें फेंकियला गुलाल ! ॥
यावें प्रभो ! स्वागत हें करीतें । मुकुंदनारायणमाधवातें ॥ ८ ॥
कुरंगनेत्रा उठ ऊठ ! कान्ह्या ! । उशीर होतो म्हणि ऊठ तान्ह्या ! ॥
बा ! ऐक ही सर्वचि सृष्टि गाते । मुकुंदनारायणमाधवातें ॥ ९ ॥

वाहे कसा शीतल मंद वारा ! । पाहें घरीं येइ सुगंध सारा ॥
या धांव घेती लहरी हरीतें । मुकुंदनारायणमाधवातें ॥ १० ॥
बागेंत बाळा ! फुलली फुलें हीं । गुलाब जाई जुइ मोगरीही ॥
पाहोनि आनंदित होइं जें तें । मुकुंदनारायणमाधवातें ॥ ११ ॥
सरोवरीं हीं कमलें उदेलीं । प्रफुल्ल झालीं रसपूर्ण ठेलीं ॥
गाताति हे भोंवति भृंग गीतें । मुकुंदनारायणमाधवातें ॥ १२ ॥
हळूंहळू डोलति बाळ ! वेली । आनंदलेली दिसते चमेली ॥
बोलाविते ती तुज पर्ण-हस्तें । मुकुंदनारायणमाधवातें ॥ १३ ॥
या दिग्वधूंच्या पिवळ्या पताका । उभारुनी मारिति तूज हांका ॥
ही मालिका अंबरपंथिं येते । मुकुंदनारायणमाधवातें ॥ १४ ॥
या कोकिळा, सारस, राजहंस । पाहूनि शोभा तनया ! प्रशंस ॥
बा ! धांवती सर्व निराळपंथें । मुकुंदनारायणमाधवातें ॥ १५ ॥
अदृश्य हा चंदनगंधयुक्त । हरी ! तुझा प्रेमळ एकभक्त ॥
केलें असें स्वागत पाहिं वातें । मुकुंदनारायणमाधवातें ॥ १६ ॥
वृक्षीं हरी ! मत्तमयूरपक्षी । पहा ! तयां रे ! सरसीरुहाक्षीं ॥
केकास्वरें आळविती जणूं ते । मुकुंदनारायणमाधवातें" ॥ १७ ॥

मधुरसमय वर्णी माउली श्रीहरीला ।
मृदुल वचन कर्णी गाउनी ऊठवीला ॥
कमलनयन त्याचे पावले ते विकास ।
कवळुनि कुरवाळी वत्सला बालकास ॥ १८ ॥

बोले तदा प्रेमळ शब्द आई । श्रीविष्णुचें सुंदररूप गाई ॥
चुंबीतसे ती अबला स्वबाला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ १९ ॥
"वत्सा ! असे क्षीरसमुद्र मोठा । जयावरी पर्वततुल्य लाटा ॥
क्षीरांबुधी सेवुनि धन्य झाला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ २० ॥
तें पंधरावें जणुं नीलरत्न । लाभो म्हणूनी करि शंभु यत्न ॥
भुजंग हेमांग पलंग झाला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ २१ ॥
डोईवरी तोलियली धरित्री । वानूं किती तो महिमा चरित्रीं ? ॥
अंगीं धरी शेष विभूषि नीला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ २२ ॥

सुहास्य विष्णू पहुडे भुजंगीं । लक्ष्मी चुरी पाय सुकोमलांगी ॥
मी त्या प्रभूला नमिं चारुबाला ! । मुकुंदनारायणमाधवाला ॥ २३ ॥
कासेसि पीतांबर शोभलाहे । ऐसी प्रभा भूवरि कोण लाहे ? ॥
आजानु साजे वनपुष्पमाला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ २४ ॥
दाही दिशा वाहतसे सुगंध । व्यापीयला सागर हा सबंध ॥
शोभे टिळा चंदन भव्य भाळा । मुकुंदनारायणमाधवाला ॥ २५ ॥
काळीच कस्तूरि तनूहि काळी । जरी वरी ती न दिसे निराळी ! ॥
परी तिचा मंद सुगंध आला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ २६ ॥
मांडीवरी घेइ रमा पदातें । वंदूनि सेवा करि दिव्य हातें ॥
प्रेमा बघूनी मनिं हर्ष झाला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ २७ ॥
विशाल जैसा जलधारिमेघ । माला उरीं शोभत वीज रेघ ॥
ती वैजयंती विलसे सलीला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ २८ ॥
कंठीं रुळे कौस्तुभदिव्यहार । सुढाळ ते मौक्तिकरत्नभार ॥
सुशोभती श्रीहरि ! विश्वपाला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ २९ ॥
आकर्ण आरक्त सतेज नेत्र । विशाळ ते केवळ पद्मपत्र ॥
विराजती दीनदयार्द्रशीला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ ३० ॥
कृष्णा ! विराजे मुखचंद्रमाही । काळा मुळीं ज्यासि कलंक नाहीं ॥
प्रकाशि मंद स्मित रम्य गाला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ ३१ ॥
अगाध दुग्धार्णविंचें निधान । पाहोनि जातें हरपोनि भान ॥
मी त्या नमस्कार विभूसि केला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ ३२ ॥
मुखेंदुला साजतिं भव्य साची । तीं कुंडलें, पुंजकि कृत्तिकेची !
विलोकुनी हा मनिं भास झाला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ ३३ ॥
तें लाजवी लोचन मंगळाला । तेजापुढें भास्करही गळाला ॥
तोलावया ठाव नसे मिळाला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ ३४ ॥
ते शंखचक्रांकित चार हात । गदा तसें पद्म जिथें रहात ॥
बघूनियां भाव असे विराला । मुकुंदनारायणमाधवाला ॥ ३५ ॥

शिरकमलिं विराजे दीप्तिमान् रत्नतेजें ।
मुकुट सुकविराजे वर्णिती जाणते जे ॥
अनुपम तनुशोभा; श्रीहरी प्रेमगाभा ।
निशिदिनिं नमितें मी माधवी पद्मनाभा ॥ ३६ ॥

सभोंवतीं प्रेमळ भक्तराज । वत्सा ! तयां वर्णिन ऐक आज ॥
भावें नमस्कारिति पुण्यराशी । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ३७ ॥
प्रल्हाद बद्धांजलि सत्यनिष्ठ । श्रीविष्णुभक्ती वरि जो वरिष्ठ ॥
विनम्रभावें जडला पदाशीं । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ३८ ॥
औदार्यशाली बलवान् बली तो । जो वामनातें निजदान देतो ॥
वाखाणितो त्या कलिपापनाशी । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ३९ ॥
प्रभंजनाचा सुत रामदास । भावें प्रभूच्या धरितो पदास
प्रेमाश्रुंनीं न्हाणित अब्धिवासी । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ४० ॥
भक्ताग्रणी गानविशारदाचें । चाले तिथें गायन नारदाचें ॥
समर्पिली ती स्तुति विष्णुदासीं । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ४१ ॥
तो पक्षिराज प्रभुराजवाह । विनम्र होई लववूनि देह ॥
जो आवडे पुष्कळ सर्वदासीं । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ४२ ॥
नमीं सदा रामपदा विलीन । बिभीषणें पाउल सोडलें न ॥
तो सेवितो नित्य दयांबुराशी । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ४३ ॥
सुनाभिपद्मीं चतुराननानें । गाईयलीं श्रीपतिकीर्तिगानें ॥
वानील कैसा बहुतप्रयासीं । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ४४ ॥
मुनींद्र येत्ते, सनकादि वृंद । ते शोधिती विष्णुपदारविंद ॥
आह्मां मिळो संगति नित्य ऐसीं । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ४५ ॥
त्रैलोक्यगंगा धवलांगरंगा । चलत्तरंगा विमलांतरंगा ॥
भागीरथी ती पदलीन दासी । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ४६ ॥
वाल्मीकि पाराशर योगिराणे । जे भक्तिनें गाति महापुराणें ॥
ते प्रार्थिती श्रीहृदयाब्जवासी । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ४७ ॥
अरुंधतीयुक्त वसिष्ठ आदि । सप्तर्षि तेजोमय तत्त्ववेदी ॥
प्रदक्षिणा ते करिती प्रवासी । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ४८ ॥
पुण्यांतरात्मे जनकादि तेथें । तारागणीं चंद्र जसा तसे ते ॥
प्रेमें स्तवीती सकळप्रकाशी । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ४९ ॥
निष्पाप भक्तेंदु अजामिळाला । सभेंत सन्मान असे मिळाला ॥
ध्यातो मनीं तो अतिरम्यवेषी । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ५० ॥

महाव्रती भूपति अंबरीष । जो शेषशायीसि रुचे विशेष ॥
तो वंदितो हृत्कलिकाविकासी । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ५१ ॥
कृष्णा ! जसा तूं सुकमार बाळ । तैसाचि तो त्या ध्रुव घालि माळ ॥
आलिंगितो बाळक सूर्यवंशी । मुकुंदनारायणमाधवासी " ॥ ५२ ॥
गाऊनि हें चुंबन घेउं जाय । देखे विचित्रा नवलाइ माय ॥
नसे शिशू पाहत दिव्यदर्शी । मुकुंदनारायणमाधवासी ॥ ५३ ॥

बघत सकळ जें जें वर्णिलें बालकासी ।
चकितनयन पाहे ध्यान कारुण्यराशी ॥
कवाळि चरण भावें माउली लीन झाली ।
नमन करित भालीं चित्तवृत्ती रिझाली ॥ ५४ ॥

ऐशा यशोदाप्रियनंदनाचे । लीलेसि वाखाणुनि ' राम ' नाचे ॥
श्रीकृष्णलीला मज आवडावी । त्याच्या पदीं हीं सुमनें पडावीं ॥५५॥

—श्रीकृष्णार्पणमस्तु—

---

## ७. उपाय—योजना.

(वृत्तः– प्रमाणिका.)

' स्वयें मुकुंद जों न ये । न भेट तूंहि त्या स्वयें ! ' ॥
असेंचि कीं अनंग तो । तुला बळेंचि सांगतो ! ॥ १ ॥
किती बघूं तुझी तरी । पुन्हांहि वाट अंतरीं ॥
प्रिये ! मदीय राधिके । पहा हृदब्ज हें सुके ॥ २ ॥
अनंग थोर माझिया । मनासि दाह देइ या ॥
मृदू फुलेंचि बाण ते । परी उणें न कोणतें ! ॥ ३ ॥
कठोर शस्त्र कासया । हवें रतीश्वरास या ! ॥
फुलेंचि वज्र जाहलीं । विचित्र रीति पाहिली ! ॥ ४ ॥
सुरेश्वराबरोबरी । लढेल काम या शरीं ॥
सुरासुरांसि जिंकितो । असा गमे अनंग तो ॥ ५ ॥
महानुभाव शंकरें । त्रिलोचनें दिगंबरें ॥
जरीहि यासि जाळिलें ! तरी अखेर पाळिलें ॥ ६ ॥

लहान वक्र भूवयी । धनुर्लता मनोमयी ।
कटाक्षबाण नेमके । करीत घाय, ना चुके ॥ ७ ॥
गुलाब जाइ मोगरी । फुलें सुगंधि यापरी ॥
वसंतसाह्य हें किती । मिळे रतीश्वराप्रती ॥ ८ ॥
विहंगमांत कोकिळा । रसाळ तो जिचा गळा ॥
अनंग-गीति गाउनी । मनासि घालि मोहिनी ॥ ९ ॥
तशाच सर्व सारिका । हृदब्जकोशदारिका ॥
अमंद गाति सुस्वरें । प्रियेसि कोण न स्मरे? ॥ १० ॥
सुगंधि हा समीरण । वियोजितांसि मारण ॥
असह्य होय शीतळ । नकोचि होइ भूतळ ॥ ११ ॥
शशांक शांत अंबरीं । प्रिया पहात वावरी ॥
न सोसवेंहि चांदणें । कसें जगांत नांदणें? ॥ १२ ॥
असा प्रिये! पहा बरें- । मदीय चित्त घाबरें- ॥
अनंग सज्ज जाहला । विखारितो हलाहला ॥ १३ ॥
हलाहला सुधा करी । क्षणामधेंचि सुंदरी! ॥
असा उपाय एकला । दुजा न म्यांहि ऐकिला ॥ १४ ॥
प्रिये! तुझ्याच अंतरीं । उपाय तो वसे तरी ॥
सुध मये! दयामये! । जनासि रक्ष या सये! ॥ १५ ॥
कृपा करोनि सुंदरी! । मनोज्ञ मंजु वैखरी ॥
मला सदैव ऐकव । वदे वियुक्त माधव ॥ १६ ॥
प्रिये! त्वदोष्ठ कोंवळे । जसे सुरक्त पोंवळें ॥
मला कदापि चाखवीं । सुधा कशास ती हवी? ॥ १७ ॥
सरोरुहाक्षि! ईश्वरी! । तुझ्याच बाहुवल्लरी ॥
पडोत माझिया गळां । दुजा न लाभ आगळा ॥ १८ ॥
सये! सुशीलशालिनी! । सुकोमले! मृणालिनि! ॥
फुटे हृदब्ज ही कळी । मदीय तीस आकळीं ॥ १९ ॥
असे उपाय वल्लभे! । करीं तुझ्याच दुर्लभे! ॥
करूनि एक योजना । सदैव पाळ या जना ॥ २० ॥

## ८. विरही माधव.

( श्लोकः—वियोगिनी, ४-५ मालभारिणी. )

हृदयेश्वरि! जीविताधिके! । दयिते! सत्वर येइं राधिके! ॥
नयना गमलीस तूं शशी । विरहाग्नीं लपलीस गे! कशी? ॥१॥

बघतो खग लावुनी टक । जणुं मेघावलिलागिं चातक! ॥
तशि मी तव वाट पाहिली । विरहाची कळ थोर साहिली ॥२॥

न चकोरहि तेविं चंद्रिका । स्मरतो कंठ करूनियां सुका ॥
तितुकी तुजसाठिं भामिनि! । धरिली मी बहु आस ती मनीं ॥३॥

रविकांतिसि चक्रवाकपक्षी । बहु सोत्कंठपणें सदैव लक्षी ॥
तुजसाठिं तशीच, सारसाक्षि! । धरिली आस, रवीच यास साक्षी ॥४॥

मनिं सुंदर पद्मिनीसि गावें । भ्रमरें धुंडित तीस तें भ्रमावें ॥
भ्रमलें मम चित्तही तसेंच । मजसाठीं अमृतासि नित्य सिंच ॥५॥

कितिसे तुज देउं दाखले? । किति सांगूं तुज दुःख चाखलें? ॥
विरही मन वाट पाहतें । न तसें या जगतांत कांहिं तें ॥६॥

स्मर तूं हृदयांत हा जन । कर यातें उपकारभाजन ॥
जर यासि सदैव, मानिनि! । तुजवांचूनि न अन्य या मनीं ॥७॥

प्रणयामृत पाजुनी तरी । जगवावा जन हा परोपरी! ॥
मधुरा अधरामृतासवें । तुळितां येतिल काय आसवें! ॥८॥

कलशासम ते पयोधर । विरहाग्नी शमवोत सत्वर ॥
वरती रुळणार माळ ती । चपळा भासलि माझिये मतीं ॥९॥

वदनेंदु तुझा सुनिर्मळ । जरि नेत्रीं विलसेहि काजळ ॥
अधरा तव पाज गे! जरा । अमृताचा वसला तिथें झरा! ॥१०॥

## ९. बांसरी.

[ चाल—साधारण पादाकुलकाचे धर्तीवरील एक स्त्रीगीत. ]

गुणगुण गाणीं घुमतीं कानीं । अलगुज वाजवि शारङ्गपाणी ! ॥
धांवति गाई बघ ती घाई । पुच्छ उभारुनि दौडति, पाहीं ! ॥
वत्स पळालें अर्धेंच प्यालें । हरिपाशिं ठेलें मोहुनि गेलें ! ॥
सखे ग ! भांडा ! गाऱ्हाणिं मांडा ! । हृदयाचि चोरित हा हरि, चांडा ! ! ॥
अंतरिं बाधा समय ग ! साधा । गेलिच आधीं सुंदर राधा ॥
गवळणि या ! या ! उचला पायां । वाजवि बांसरि बाळ कन्हय्या ! ॥

---

## १०. गोपींचा नाच.



[ चाल:—'कृष्ण बोले रुक्मिणीला' इ० स्त्रीगीतासदृश.]

पदर खेंचा ! खचा खोंचा । कसा काचा मुर्दे नाचा ॥
करा वाचा मुकुंदाच्या । गजर साचा सुनामाचा ॥ ध्रु० ॥
सभोंवारीं उभ्या नारी । मधें हारी मनोहारी ॥
ढगाकासें विजा कीं शें । असाव्यासें मला भासें ! ॥१॥
तनू निळा गळां माळा । बघूं याला किती वेळां ? ॥
मनीं डोळां- पथें गेला । अनंगाला सुचे चाळा ! ॥२॥
मदन-राहू न दे राहूं ! । कसें साहूं ? तया पाहूं ! ॥
स्फुरे बाहू तया बाहूं । तनू वाहूं ह्मणा कीं 'हूं' ! ॥३॥
बसे स्कंधा-वरी राधा । तिचा बंदाचि गोविंदा ! ॥
असा वृंदावनीं धंदा ! । करीं वंदा सदानंदा ॥४॥
'हरी' नाम सुखा धाम । परीपूर्ण करीं काम ॥
'घनश्याम घनश्याम । घनश्याम' ह्मणे 'राम' ॥५॥



**कृष्ण-गुंफा समाप्त.**

# २७. मोरोपंत-स्मृति.

" काव्य करावें म्यां, नच वचकावें दूषितो परि लघूस ॥
कां न सदन बांधावें कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस " ॥
—मोरोपंत.

श्रीमन्मयूर-कवितें नमितों मी भक्तिपूर्ण हृदयानें ॥
त्याच्या काव्यरसाचीं रसिकें गावींत सर्वदा गानें ॥ १ ॥
भाषासरस्वती ही प्रसन्न झाली जशी मयूराला ॥
झाली तशी न इतरां, यास्तव कविवर मयूर हा झाला ॥ २ ॥
सुकवि महाराष्ट्राचा, भाषेचें दैन्य आपुले सुकवी ॥
कवण न वंदी यातें सुरगुरुही मान ज्याप्रती तुकवी ॥ ३ ॥
सरस मनोज्ञ सुभूषण, ईश्वरभक्तिहि जिच्यांत अनिवार्या ॥
ती निर्मिशी मयूरा! आर्यान्तःकरणहारिणी आर्या! ॥ ४ ॥
प्राकृत भारत रचिलें यास्तव आह्मी ह्मणूं तुला व्यास ॥
कीं वाल्मीकि ह्मणावें! रचणें रामायणेंचि हव्यास ॥ ५ ॥
किंवा नारदसम तूं प्रभुचीं गातोस बा! यशोगानें ॥
त्वां या तिघां मुनींचें सुयश असें मिळविलेंसि एकानें! ॥ ६ ॥
' सन्मणिमाला ' तव ती भूषविली साधुवर्य भक्तांनीं ॥
भक्तिगुणें जीमध्यें वरिला जणुं बंध बंधमुक्तांनीं! ॥ ७ ॥
' संशयरत्नावलि'नें निःसंशय मोहिला असेल हरी ॥
उठल्या असतिल करुणावरुणालयिं लोल लहरिंवरि लहरी! ॥ ८ ॥
भगवत्प्रेमरसानें नटलेल्या भावमधुर तव ' केका ' ॥
झाल्या असतिल कैकां तारक होतिल पुढेंहि कितिएका! ॥ ९ ॥
कल्पद्रुमसम झाला भूवरि आह्मांसि भव्य काव्यतरू ॥
तत्फळ रसाळ सुंदर सेवुनि आह्मी भवाब्धि हा उतरूं ॥ १० ॥
गुण गातां तव कृतिचे थकतों आह्मी अशक्त यासाठीं ॥
गुण तव अगणित असती वर्णनशक्तीच आमुची थोटी ॥ ११ ॥
श्रीमन्मयूरचरणीं वंदन माझें विनम्र भावानें ॥
देवो तो कवि भजकां प्रतिभास्फूर्ती निजप्रभावानें ॥ १२ ॥

## २८. श्रीमारुतिस्तवन.



( गीति. )

श्रीरामहृदयवासा ! मारुतिराया ! दयाघना साधो ! ||
तुझिया कृपाप्रसादें, बलभीमा ! भक्तकामना साधो || १ ||
देवा ! महानुभावा ! पदकमलीं मी असें तुझ्या लीन ||
देउनि अभय ह्मणा कीं, 'वत्सा ! तुज मीचि पाठिं घालीन' || २ ||
करुणार्णवा विभो ! मी भवसागरिं बुडतसें मला वरि घे ||
भक्तांस तारण्याला संकटिं देवा ! तुझाच पाव रिघे || ३ ||
तव महिमा थोर किती ? मी तों पामर वदूं कसा सगळा ? ||
यश गातां भव्य तुझें लागे वाल्मीकिचा कसास गळा || ४ ||
होते इतरहि मोठे सुग्रीवादिक परंतु तुजसम न ||
श्रीरामलक्ष्मणांचें प्रेमळ निर्मळ तुझ्यावरी सुमन || ५ ||
पुण्यश्लोका जननी जनकसुता हरिलि रावणें छद्में ||
तीतें शोधुनि राक्षस-सैन्यें त्वां मारिलीं महापद्में || ६ ||
मुष्टि तुझी रक्षो मज आघातें ह्मणत राक्षसा 'मर !' जी ||
भीमा ! महाबलाढ्या ! भूपविं आह्मां तुझ्या पदाब्जरजीं || ७ ||
दुर्लंघ्य सागर परी झाला गोष्पदसमान केवळ तो ||
जो धीर तोचि तरतो विघ्नांतें; इतर मागुतीं वळतो || ८ ||
स्वामिपरायण सेवक असशी बा ! तूंचि रामरायाचा ||
सीता-वार्ता सांगुनि वाचविला त्वां बरा मरायाचा ! || ९ ||
शरण तुला आलों मी चरण तुझे वायुनंदना ! धरिले ||
बलभीमा ! ते मोठे ज्यांनीं शरणागतासि उद्धरिलें || १० ||
श्रीराममानसांतिल भक्तिकमलिनीवरील तू भ्रमर ||
सेविसि रामयशोमधु तव पदवी वांछितात ते अमर ! || ११ ||
राजीवनयन राघव ज्यावरि संतुष्ट होउनी बघतो ||
विलया नेवो सत्वर अंजनिचा बाळ आमुचें अघ तो || १२ ||

पाहूनि बालभास्कर मानुनि फल पक्क घालिशी झडप ॥
तो तूं भक्तजनांचे अघराशी हे न करिशि कां गडप ? ॥ १३ ॥
तुझिया प्रतापरविचा एकहि तो किरण वर्णितां ना ये ॥
व्यापूनि भूमिमंडळ कीर्ति तुझी दश दिशा न ती मायें ॥ १४ ॥
बा ! त्वांचि हरण केला अशोक–वन–जानकी–हृदयशोक ॥
अद्यापि विमल यश तें धवल करीं निशिदिनीं तिन्ही लोक ॥ १५ ॥
ध्वजरक्षक पार्थाचा, सेवक रघुराजजानकी यांचा ॥
नायक कपिसेनेचा, तारक आह्मां असे स्वकीयांचा ॥ १६ ॥
पुतळा सामर्थ्याचा, सागर धीचा, रवि प्रतापाचा ॥
मंदर जो धैर्याचा, त्याचा आह्मांस आसरा साचा ॥ १७ ॥
देवा ! पदर पसरतों, तार मला दीनवत्सला ! आलों ॥
व्याघ्रातें हरिण जसा तैसा या भवदवाग्निला भ्यालों ! ॥ १८ ॥
घन जेविं चातकांचा वांचविता तेविं आमचा असती ॥
नससील रक्षिता जरि, माझ्या चित्तांत कां ? सदा वससी ॥ १९ ॥
'हे अंजनाकुमारा ! अनाथनाथा !' अशा किती हांका ॥
माराव्या करुणरवें तव कानीं नाद जाइना हा कां ? ॥ २० ॥
जाणें न गीत सुस्वर जरि तुज गानेंचि आळवूं ह्मटलें ॥
साधेच बोल माझे परि देवा ! तुजसि गावया नटले ॥ २१ ॥
राम तुझा प्रेमानें शबरीचीं उष्टिंही फळें चाखी ॥
त्रिभुवनिं विख्यात कथा; स्वामीचें ब्रीद आपुले राखीं ! ॥ २२ ॥
वाणी असंस्कृत, परी भिल्लिणिची भक्ति तींत पाहून ॥
उद्धरिले प्रभुंनीं तिज; भक्ति गमे श्रेष्ठ ती तपाहून ॥ २३ ॥
भक्तीच दे विभो ! तूं वायुसुता ! मज तुझ्या पदावरली ॥
धरली मी कास तुझी, होय तरिच ही भवापगा तरली ॥ २४ ॥
वंदुनि बलभीमाला आर्याची अर्पिली चरणिं माला ॥
श्रीमारुतिप्रसादें 'रामा'चाही मनोज्वर निमाला ॥ २५ ॥

## २९. कृष्णा-कोयना संगम.

(श्लोक.)

कृष्णा नदी भेटत कोयनेला । जें पाहतां ताप लयास गेला ॥
तेथील शोभा कवणें वदावी ! । वाटे मला ती तुजलागिं गावी ॥१॥
ज्यावेळिं येई उदयास भानू । तो रम्य मी संगम काय वानूं? ॥
परस्परां प्रेमभरें नद्या या । पाहाति आलिंगन गाढ द्याया ! ॥२॥
कृष्णा मला ही यमुनाच वाटे । ती कोयना-जन्हुसुतेसि भेटे ॥
हर्षाश्रुबिंदू जमले अपार । प्रवाह हा केवळ तोच पूर ! ॥३॥
या दोनही पर्वत-राजकन्या । पुन्हां मिळाल्या इहलोकधन्या ॥
ज्या कांक्षिती सागरसंगमाला । कीं गुंफिती एक अनंगमाला ! ॥४॥
विस्तीर्ण त्यांचे पुलिनप्रदेश । ते दीर्घ वीचीमय कृष्णकेश ॥
नितंबिनी भासति मन्मनाला । विलेपिलें चंदन फेनमाला ! ॥ ५ ॥
न या नद्या, ह्या प्रमदाच दोघी । न वारि तें, हा रसराज ओघीं ॥
न सेतु ते, त्या दिसतात कांच्या । समुद्रगामी अभिसारिकांच्या ! ॥६॥
न वालुका ती, कुसुमास्त्ररेणू । न वायु हा, मंजुळ कृष्ण-वेणू ॥
नोहेत तैसीं पुलिनें कदा हीं । हे दीर्घ विस्तीर्ण नितंब पाहीं ! ॥७॥
अहो ! पहा निर्मळ वारि तें, जें । नाशीतसें ह्यातिमिर स्वतेजें ॥
पवित्र रम्यात्मक दर्शनानें । वैमल्य जाणों, वरिलें मनानें ॥८॥
शृंगार या सागरगामिनींनीं । केला असें कीं जणुं कामिनींनीं ॥
जो पाहतां मोहवि मन्मनातें । सांगेन आतां सखया ! तुला तें ॥९॥
इक्षुप्रभेच्या हिरव्याच शाली । ही कामिनी पांघरि भाग्यशाली ! ॥
क्षेत्रें सुवर्णी वसनें तट-स्थ । पाहोनियां कोण न हो तटस्थ ! ॥ १० ॥
नौका बघूनी मम मानसास । हो भास कीं त्या नयनाब्ज खास ॥
शृंगारिल्या भासति काजळानें । ज्या वेष्टिल्या निर्मळ त्या जळानें ॥११॥
उत्तुंग देवायतनें बघूनी । मी त्या नद्यांचे कुचकुंभ मानीं ॥
कीं मैत्रिणींचा घडतां विहार । हे मोकळे शोभति निर्विकार ! ॥१२॥

❖ ❖ ❖

उभयतां सरितांमधि मेलन । निरखितां हरिखें भरलें मन ॥
करिल वर्णन दर्शनमाधुरी । सुकविची प्रतिभा जरि लाजरी ! ॥१३॥

## ३०. सूर्यास्त व नंतर-

[ वृत्त—द्रुतविलंबित. ]

गगन-मार्ग समग्र फिरूनियां परतला रवि हा निजमंदिरा ॥
स्मित करी-हंसलीच दिगंगना बघुनियां हरिला जशि इंदिरा ॥ १ ॥
मधुर दिङ्मुखपंकज लाल हें विकसलें घडतां रविसंगम ॥
उधळिलीं गगनीं कुणि कुंकुमें प्रमुदिता अवनी स्थिरजंगम ॥२॥
भ्रमुनियां गगनीं बहु भागला हळुं हळूं स्वगृहीं शिरतो रवी ॥
पटतसे बहुधा श्रमल्या मना स्वजनसंगतिची मधु थोरवी ! ॥३॥
रजतपूर्ण असा मुळचा रवी दिसत या क्षणिं कांचनगोल तो ॥
खपत जो जगिं लोकहितार्थ तो मिळवि मूल्य असें जणुं बोलतो ! ॥४॥
बघुनि रक्त असा निजमित्र हा घनहि हे अनुरक्तचि जाहले ॥
'जग जशास तसेंच असे' असें शिकविलें मजला रविनें भलें ! ॥५॥
अरुणकांति मनोहर दीप्तिमान् विमल लोकहितैषि असा रवी ॥
पतन त्या चुकतें नच तें कदा ! किति वदूं विधिची कटु थोरवी ! ॥६॥
निजसुदैव अकल्पित हें असें दिसतसे बहुधा जरि भंगलें ॥
अधिकरम्य तथापि दिवाकरा बघुनियां मम मानस रंगलें ॥७॥
गगनमध्यविलंबित दीप हा नयन जो दिपवी दिवसेश्वर ॥
बघतसे जग त्यासि कुतूहलें पतन त्याप्रति जैं धरणीवर ! ॥८॥
रवि न हा जणुं कंदुक कांचनी उडविला गमला कुणि अंबरीं ॥
त्वरित त्या धरण्यासि दिगंगना पसरती वरती भुज सुंदरी ! ॥९॥
जलनिधीमधिं सुंदर गोजिरें हळुं हळूं लपले रविबिंब तें ॥
मिसळलें उदधीमधिं रत्न हें मधुरचित्र मनावरि बिंबतें ॥१०॥
रसिकहृद्गतसागरचंद्र तो दिनपती उदधीमधिं लोपला ॥
विनयनम्र नमस्कृति अर्पुनी प्रकटिती जन आदर आपला ॥११॥
विहगवृंद तरूंवरि बैसले कलरवें करिती रविगायन ॥
श्रवणसुंदर मंजुळगान तें परिसुनी जणुं डोलतसे वन ॥१२॥
समजुनी रवितें जणुं पाहुणा विनयशीलवती शशिकामिनी ॥
दिनभरी लपल्या सदनांत ज्या बघति बाहिर त्या हळुं येउनी ! ॥१३॥

कनककुंभसमान असे लपे जसजसें रविबिंब जलोदरीं ॥
तसतसें मदनें रतिनायकें प्रकटले निजहेतु परोपरी ॥१४॥
अमृतसार असा मकरंद जी कमलिनी अलिंना बहु पाजवी ॥
कवळिते दृढ अंतरिं षट्पदा समयिं या रमणींप्रति लाजवी ॥१५॥
कमळकोष हळूं हळुं झांकती कुमुदिनीस्मितहास्य विकासलें ॥
त्यजुनियां कमळां रसिकाग्रणी (!) भ्रमर ते दुसरींवरि बैसले ! ॥१६॥
फडकती ध्वज अंबरिं तांबडे ! उधळिला गगनांत गुलाल तो ! ॥
हृदयवल्लभसंगम लाभतां विपुल हर्ष मनांत न मावतो ! ॥१७॥

❖ ❖ ❖

सकळही गगनांगणतारका विरहिणी गमल्या परि मानसा ॥
उडुपती, विरहांधविलोचना तिमिरिं तो गवसेल तयां कसा ? ॥१८॥
विरहशोकभराकुल या प्रिया हुडकिती गगनीं शशिबिंब तें ॥
दयितलाभ न होउनि अंबरीं सकळ ही अबलातति थांबते ! ॥१९॥
यदुपतिप्रति त्या व्रजसुंदरी हुडकिती गमतें जणुं गौळणी ॥
यदुपतिप्रिय ती जशि राधिका हुडकिते शशितें तशि रोहिणी ॥२०॥
बुधबृहस्पतिमंगळ बांधव करिति साह्य तयां शशिमार्गणीं ॥
अहह ! साह्य नसे जर दैव तें, फसति यत्न; करा मग ते कुणी ! ॥२१॥
विरहिणी जरि या शशिच्या प्रिया तरि नभाप्रति भूषवि तत्प्रभा ॥
गगनिं कीं सगळया शशिकांक्षिणी भरविती युवती जणुं ती सभा ! ॥२२॥
उपजली बहुधा गमते दया प्रभुमनीं करुणादयितागृहीं ॥
विलसली नभिं इंदुकलाद्युती, मुदित अंबर डोलतही मही ॥२३॥
दिनपती परते निजमंदिरा रमविल्या रमणी शशलांछनें ॥
बघुनि ईश्वरवर्तन हें असें रिझिवती जनही युवतीमनें ! ॥२४॥

---

## ३१. अभीष्टचिंतन.



[ भाचीस तिच्या लग्नप्रसंगीं लिहिलेल्या गीति. ]

श्रीरामचंद्रदयिता पतिव्रता जनकनंदिनी सीता ॥
पुण्यश्लोका जननी तुजवरि बाळे ! असो सदा प्रीता ॥१॥

जीच्या मंगलनामें मंगलकार्यें सुसूत्र घडतात ॥
त्या जानकीस भावें वंदन करण्यास हात जडतात ॥२॥
परमेश्वर पति व्हावा ह्मणउनि गिरिराजकन्यका तपली ॥
त्या साध्वी देवीची नामावलि विमल पाहिजे जपली ॥३॥
'आर्ये! त्र्यंबकभार्ये! जगदंबे! अंबिके! शिवे! वरदे! ॥
तव बालकासि माते! गिरिनंदिनि! आपुला अभयकर दे' ॥४॥
श्रीकृष्णरुक्मिणींचे पदकमला बालिके! नको विसरूं ॥
हो वासरूं तयांचें! तुजसाठीं त्यांकडे पदर पसरूं ॥५॥
हा मेघ कृष्णनामा, त्यासह विद्युल्लता रमा विलसे ॥
नित्य कृपाजल वर्षी, संतोषावेचि भक्त चातकसे! ॥६॥
कृष्णा पांडवपत्नी, द्रुपदसुता, निर्मला सतीरत्न ॥
जिव्हे! या साध्वीचें यश गायाचा करीं सदा यत्न ॥७॥
ही धन्य वीरपत्नी करिल तुझें शुभ सदैव संसारीं ॥
भक्तिगुणें वश झाला आहे तिज साह्यकारि-कंसारी ॥८॥
कीर्तिमती आर्यस्त्री, सावित्री तव मनीं सदा राहो! ॥
तीच्या कृपाप्रसादें भाग्यवती पुण्यशील दारा हो! ॥९॥
परिसुनि सर्व जियेच्या युक्तिवचा धर्मराज वाखाणी ॥
खाणी गुणरत्नांची, गाति हिचीं देवदेवता गाणीं ॥१०॥
साध्वी अरुंधतीचें वागविं चित्तांत पुण्य आचरण ॥
तैसें वसिष्ठमुनिचें वंदन कर बालिके! भले चरण ॥११॥
उभयहि गेले होते गिरिजाशंकर-विवाह जुळवाया ॥
व्हाया कुमारसंभव देवांचें असुरविघ्न पळवाया ॥१२॥
स्मरणीं सदा असों दे दमयंतीचें चरित्र उज्ज्वल गे! ॥
सांगे आर्येतें पतिभक्तीहुनि अधिक कांहिंही नलगे ॥१३॥
ऐशा अनेक आर्या मंगलकार्यांसि सिद्धि देतिल या ॥
तुजवरि वर्षोनि कृपा, विघ्नें निःशेष शीघ्र नेति लया ॥१४॥

## ३२. श्रीमंगलागौरीस्तव.

( शुद्ध कामदा. )

नमियलीं तुझीं रम्य पावलें । ह्मणुनि अंतरीं सौख्य पावलें ॥
मजवरी कृपाछत्र चांगलें । तव सदा असो, गौरि! मंगले! ॥१॥
जगतिं जीं सुखें, चंचलें जरीं । स्थिरविशी तयां तूंच मंदिरीं ॥
सकल संपदा वैभवें बरीं । तुजसि वंदितां येतिं सत्वरीं ॥२॥
मधुकरी मधा धुंडिती जशा । उपवनीं अह्मी हिंडलों तशा ॥
जमवुनी किती पालवीफुलें । तुज पुजावया सिद्ध जाहलें ॥३॥
कमळ, केवडा, पारिजातक । बकुळ, मोगरी आणि चंपक ॥
तगरि, शेवती, शेवटीं कळया । जमविल्यातही कांहिं पांकळया! ॥४॥
तव पदीं अशीं अर्पुनी फुलें । तुजसि वाहतें चित्त आपुलें ॥
हृदयमंदिरीं तूं रहा सदा । ह्मणुनि अर्पितें हें तुझ्या पदां ॥५॥
हृदयिं माझिया होय मूर्ति जी । तिजहि घालितें या पदांबुजीं ॥
विनवितें असें आपलेपणें । सदयदेवते! सर्व पाळणें ॥६॥
जननि! मंगलागौरि! अंबिके । तव अजाण हीं जाण! बालकें ॥
धरुनियां उरीं दोन्हि बाहुंनीं । शिशुसि रक्षणें हीच मागणी ॥७॥
करिसि सर्वदा भक्त-मंगलें । ह्मणुनि 'मंगला' नाम चांगलें ॥
जरि तुझ्या पदीं चित्त रंगलें । तरिच या भवीं मी तरंगलें! ॥८॥
भजुनियां तुला भक्तिनें मनीं । बहुत जाहल्या धन्य या जनीं ॥
तुजसि पूजुनी कृष्णकांक्षिणी । सकलवंद्य ती होय रुक्मिणी ॥९॥
त्रिभुवनीं जिची कीर्ति पावनी । मधुर गाउनी रंगले मुनी ॥
रघुपतिप्रिया जानकी तुझे । चरणपंकजा अंतरीं भजे ॥१०॥
इतरही अशा थोर कामिनी । तुजसि वंदिती आपुल्या मनीं ॥
बघुनि रीत ही मीहि हौसिनें । करितसें तुझीं गौरि! पूजनें ॥११॥
हळद कुंकुमें अर्पितें तुला । मज सदैव हो देवि! मंगला ॥
शरण येउनी मी तुला वदें । करुण दृष्टिचें पांघरूण दे! ॥१२॥
विविधजातिची ही नवीनवी । तुजसि वाहिली देवि! पालवी ॥
हृदयिं वेल ही भक्तिची नटो । नवनवी तिला पालवी फुटो! ॥१३॥

सकलदेवते! देवि! मंगले! । तुजसि वंदिता पाप भंगलें! ॥
करितसें तुझें नित्य चिंतन । चरणिं ठेवितें हें तनूमन ॥१४॥
तुजसि गावया कंठ योजितें । तुजसि या करीं देवि! पूजितें ॥
सतत माझिया अंतरीं रहा । जननि मंगळे! हेतु फार हा ॥१५॥
नमितसें पुन्हां गौरि! अंबिके! । बघसि बाळकालागिं कौतुकें ॥
दिघलिं म्यां दळें हीं दहासहा ; तुज मुळें दिला घेइं घांस हा! ॥१६॥

## ३३. श्रीराघवगीत.

( चालः—श्रीसांब, जगादिस्तंभ, गौरिहेरंब. इ. )

रघुराय! दाखवा पाय, करा साहाय्य, कठिण भवतरणीं ।
मी शरण, जानकीरमण! आपुल्या चरणीं ॥ ध्रु. ॥
भूवरी, अयोध्यापुरी, जियेहुनि बरी, नव्हे सुरनगरी ॥
भूपती तियेचें दशरथ पालन करी ॥
सुत चार, भगवद्वतार, खेळ अनिवार, खेळले भुवनीं ।
त्या धन्य जाहल्या कौसल्यादिक जननी ॥
ते पुत्र, कमलदलनेत्र, रामसौमित्र, अल्पवय बालें ।
यज्ञासि रक्षण्या विश्वामित्रें नेलें ।
चालः— मखविघ्न निवारुनि मुनिवर संतोपिला ।
पदरजें उद्धरी राम अहिल्याशिला ।
मैथिलीस्वयंवरिं दारुण पण पाहिला ।
शिवधनू, न लागे क्षणूं, मोडि तो सुतनु, दाविली लीला ।
ती जनकनंदिनी घालि तयाला माला ॥ रघुराय० ॥ १ ॥
जंव थोर, होइ रघुवीर, तरुण रणधीर, सकलगुणराशी ।
भूपाळ ह्मणे 'युवराज करावें त्यासी' ॥
ते समयिं, राणि कैकेयि, करुनि दुष्टाइ, ह्मणे रायासी ।
'वर दोन दिले मज पूर्ण करा हो! त्यांसी ॥
युवराज, भरत हो आज, एक हें काज, दुजें परिसावें ।
तें वर्षचतुर्दश राम वनामधिं जावें!' ॥

चालः— रघुराय निघे, मग लक्ष्मणसीता न कां ?
ते राजहंस हो ! कमळिण ती बालिका ।
ढळढळां ढाळिती अश्रु पुरुषबायका !
सुतविरह, कैकयीकलह, होउनी असह, राय मृत झाला ! ।
श्रीराम नव्हे, त्या प्राणचि सोडुनि गेला !! ॥ रघुराय० ॥२॥
तीं तिघे, चालतीं उगे, जानकी बघे, कौतुकें नयनीं ।
गिरि, नद्या, सरोवर, हंस, हरिण, पद्मिनी ॥
सारंग, पक्षि बहुरंग, मत्तकलभृंग, दंग मधुपानीं ।
ती गुंग जाहली बघुनि वनश्री रानीं ॥
वनवास, नाहिं सायास, स्वामिसहवास, पंचवटिं रमले ।
राहूनि आश्रमीं ऋषिसम केवळ गमले ! ॥
चालः— तों दुष्ट दशानन सीता कपटें हरी ॥
मारूनि जटायुसि गेला लंकापुरीं ।
श्रीराम अंतरीं शोक करी बहुपरी ॥
इतुक्यांत, विश्वविख्यात, कपींचा नाथ, सखा सांपडला ।
परि राममना आराम मुळीं नच पडला ! ॥ रघुराय० ॥ ३ ॥
त्रिभुवनीं, फिरुनि निशिदिनीं, शोध काढुनी, दमति हरि सारे ।
कोणांहि मिळेना वैदेहीचें वारें ! ॥
एकला, वायुसुत भला, तया लाभला, शोध बहु यत्नें ॥
स्वामीसि कळविलें तें मग वानररत्नें ॥
मिळविली, चमू चांगली, हलूं लागली, कपींची सेना ।
सुग्रीव अंगदादिक त्या गणति असेना ! ॥
चालः— दक्षिणोदधीच्या तीरावरि पातले ।
वर सेतु बांधण्या दगड जळीं घातले ।
लंकेसि वेष्टितां, भ्याले ते आंतले ! ॥
रघुवीर, शूरवर धीर, जयाचा तीर त्वरित रिपुनाशी ।
तो सिद्ध जाहला वधण्या दशवदनासी ॥ रघुराय० ॥ ४ ॥
घनघोर, युद्ध तें थोर, जगीं महशूर, राम त्या समरीं ।
मारूनि रावणा, भार भूमिचा हरी ॥

रघुवरा हर्षनिर्भरा, देव अप्सरा, वर्षती सुमनें ।
तीं ह्मणत तयाच्या बाणवृष्टिसी उणें ! ॥
त्या दिनीं, जनकनंदिनी, सर्वे घेउनी, येइ निजनगरा ।
श्रीरामदर्शनें हर्षलि सारी धरा ! ॥
चालः— उत्साहमंगलीं नारीनर रंगले ।
श्रीकांतकृपेनें दिन दिसले चांगले ।
रघुरायदृष्टिनें दुरितगिरी भंगले ॥
बहु मधुर, गीतमय गजर, जाहले सुचिर, भरे नभ नादें ।
'जानकीतनय 'ही हृदयीं भरला मुदें ! ॥ रघुराय० ॥ ५ ॥
श्रीराम, हृदयविश्राम, सुखद आराम, असावा ध्यानीं ।
ते धन्य धन्य जन राघव नामिला ज्यांनीं ॥
मैथिली, अंकिं बैसली, बहुत हर्षली, जगाची जननी ।
जणुं दिसे अंबरीं झळकत सौदामिनी ॥
हनुमंत, बुद्धिबलवंत, सकलगुणवंत, लीन रघुचरणीं ।
अंजनासुताची नवलपरीची करणी ॥
चालः— घननीळ राम हा पीतवसन नेसला ।
मणिरत्नकांचनी सिंहासनिं बैसला ।
सुरसभेंत जैसा इंद्र तसा भासला ॥
ते तीन, रामपदलीन; भरतशत्रुघ्न, ढाळिती चवरी ।
लक्ष्मणें धरियलें छत्र विमल तें वरी ॥ रघुराय० ॥ ६ ॥

---

## ३४. विवाहमंगल.

[ मित्रास त्याचे विवाहप्रसंगीं लिहिलेले श्लोक. ]

आनंदाचा दिवस उगवे आज मित्रा ! तुझ्या हा
साक्षात् लक्ष्मी प्रविशत असे ही तुझ्या रम्य गेहा ॥
' येऊं येऊं ' बहुत ह्मटलें त्वद्विवाहानिमित्त
काया येथें, परि मम असे हें तुझ्यापाशिं चित्त ! ॥ १ ॥

बाल्याची ती कमलकलिका मुग्धसौंदर्यशाली
  काळें तीही नवविकसिता यौवनाम्भोज झाली ! ॥
तेथें लक्ष्मी सुचिर विलसो ! हो सखे ! धन्य धन्य !
  मांगल्याच्या मधुरसमयीं मागणें काय अन्य ! ॥२॥
संसाराला उपमिति कुणी घोर त्या सागरानें
  याच्या त्रासें कुणि वरियल्या त्या गुहा, शैल, रानें ! ॥
दैवें लाभे जर सुगृहिणी स्वर्ग संसार होतो
  पीयूषाचा उदधि अथवा नंदनोद्यान हो ! तो ॥३॥
चंद्रज्योत्स्नाधवल शिखरीं रम्य कैलासशैलीं
  अत्यानंदें विहरत फिरे जोडपें भाग्यशाली ॥
देवें प्रेमें कुसुमशर तो देखिला होय आजी !
  गौरीशंभू तुजसि सुखवो दंपती आद्य हे जी ॥४॥
क्षीराब्धीच्या उदरिं वसला थाटुनी शेषशय्या
  लक्ष्मीसंगें प्रियतम तिचा रंगला तो कन्हय्या ! ॥
आलिंगी जी सुदृढ पतिसी–त्या भुजंगासि भ्याली !
  त्या देवीची तुजवरि कृपा होंउं दे सर्वकालीं ॥५॥
शीतश्यामा मधुर यमुना वाहिनी वाहताहे
  तीरीं कान्हा रतिचतुर तो मंडपीं वाट पाहे ॥
येवोनी जी हळुं निजभुजा–हार त्या घालि साधा
  संभाळो ती रसिक युवती आपणां कृष्णराधा ! ॥६॥
विद्या–वल्ली सुगुण–तरु ते, कीर्ति–पुष्पें सुवासी
  तोळाव्या त्या सकलहि कला कोकिलासारिकांसीं ॥
रम्योद्याना रचुनि चतुरा या अशा तेथ खेळे
  वंदावी ती रमणसहिता शारदा याच वेळे ॥७॥
मेघश्यामा सुभग तनु ती जानकी-नायकाची
  विद्युल्लेखेसमचि दिसली मैथिली जेथ साची ॥
हर्षें वर्षी जल–निजकृपा–पूरवी भक्तकाम
  संतोषो तो तुजवरी सदा राम कारुण्यधाम ॥ ८ ॥

ऐशा आर्या गुणगणवती आर्यही थोर ते ते
 ज्यांहीं केलें निजसुचरितें धन्य या भूतलातें ॥
ज्यांच्या पुण्यें रविहि तपतो, तो सुधा चंद्र देतो
 वंदोनी त्या जन सकळही तद्गुणां आदरीतो ॥ ९ ॥
आकाशाचें विमल सर तें, पद्मिनी दिव्य तारा
 जेथें येई नटुनि शशिच्या कामिनींचा पसारा ॥
सर्वांनाही मृदुनिजकरें चंद्रमा गौरवीतो
 वामाक्षींची सुखमय भवीं दाखवी थोरवी तो ! ॥ १० ॥
संध्यादेवी नटुनि थटुनि लेउनी लाल सेला
 सत्संगाच्या धरुनि हृदयीं एकल्या लालसेला ॥
सायंकाळीं प्रियतम अशा भास्करातें वरीते
 हर्षें कुंकूं उधळिति अहा ! दिग्वधू त्यांवरी तें ! ॥ ११ ॥
प्रावृट्काळीं भ्रमत गगनीं नादगंभीर मेघ
 प्रेमें आर्द्रा करुनि अवनी प्रीतिचे निर्मि ओघ ! ॥
त्याच्या अंगीं रुचिर धनुची रंगवल्ली निघाली
 विद्युद्देवी चपळ तरुणी त्या जणों माळ घाली ! ॥ १२ ॥
एकांतींही रमवि चतुरा वाढवी सौख्य-राशी
 विश्वप्रेमा शिकवी धरुनि प्रेममूर्ती उराशीं !
दुःखाचेही उदधि निपुणा शोषवी आत्मसंगें
 द्यावी भार्या तुजसि सखया ! यापरी पांडुरंगें ॥ १३ ॥

❖ ❖ ❖

विवाहीं जायेचा पदर पतितें गांठुनि धरी
 तदा होतीं बद्धें उभय हृदयेंही झडकरी ॥
दृढा प्रेमग्रंथी करिल सुदृढा बालक पहा !
 अपत्याच्या लाभें फलित जगिं संसारतरु हा ॥१४॥
 आनंदधाम परिपूरितसर्वकामं
 श्रांतामृतं दयितलोचनचंद्रकांति ॥
 शीलादिसद्गुणमयं हृदयं द्वितीयं
 भाग्याल्लभस्व भवमित्रमिदं कलत्रम् ॥१५॥

चंद्रज्योत्स्ना नेत्रयोर्वेस्गुकंठी
श्यामा रामा पक्वबिम्बाधरा च ॥
पूर्णप्रेमा शारदाम्भोजवक्त्रा
प्रौढप्रज्ञाशालिनी प्रीणयेत्त्वाम् ॥१६॥
पुण्याय सौख्याय सुसंगमाय
ज्ञानाय वित्ताय निरामयाय ॥
जयाय शक्त्यै यशसे प्रजायै
श्रीरामचन्द्रे युवयो रतिः स्यात् ॥१७॥

## ३५. विरहांत वसंतागम.

पाडवा जिवलगे! अजि आला। हर्ष देइ नव वर्ष मनाला ॥
हा वसंत उगवे ऋतुराया। स्वागता बघति सर्व कराया ॥ १ ॥
सारिका मधुर गाइ वसंता। जेविं तो शुक दयार्णव संता ॥
आयकोनि रमतें मन गानीं। तोष तेविं न धनें, न नगांनीं ॥ २ ॥
कोकिला-कुशल-गायन-शैली। ती दिसे उपवनीं, वनिं, शैलीं ॥
सर्व वृक्ष रुचती तिज वासा। आम्रवृक्षाचि गमे न हवासा! ॥ ३ ॥
पूर्ण गे! भरलिं जीं मकरंदें। तीं अशीं किति तरी अरविंदें ॥
दंग त्यांवरि पहा! कलभृंग। वाजवीति जणुं कोमल शृंग! ॥ ४ ॥
मत्त कामुक विहंगम रावे। काढिती ध्वनि मनांत भरावे ॥
गावयासि विहगां शिकवीतो। कोण गे! रसिकराज कवी तो? ॥ ५ ॥
मोगरी, बकुल, शेवति, चांफा। तो गुलाब, मधुमालति वांफा ॥
कोण हें फुलवितो वन माळी?। वाटतो मजसि कीं वनमाळी! ॥ ६ ॥
" वृक्षवेलिंवरि पुष्पपताका। रोंविल्या रमण! आज अशा कां? "
सारिकेसि वदला शुक काय?। "आज येइ रसिके! ऋतुराय" ॥७॥
हे प्रिये! मिथुनसारसपक्षी। खेळते त्वरित सुंदरि! लक्षीं ॥
हृन्नभीं मदनचंद्र विलासे। भीतिचा तिमिर घालविळासे ॥ ८ ॥

अशा आनंदाचा दिवस दयिते! आज उगवे
मुदश्रूंनीं नेत्रें भरलिं नच कांहींहि बघवे ॥
ह्मणोनी नेणें तूं जवळ मज नाहींस अशि ही
वसंताची युक्ती ह्मणुनिच जगे येथ विरही! ॥ ९ ॥

## ३६. मुक्तामाला [माझी दिवंगत बालिका.]

कन्या मदीया सुकुमार बाला मालाचि म्यां मानिलि मौक्तिकांची ॥
हास्यप्रभेच्या बघतां विलासा भासे मला जी जणुं चंद्रिकाचि ! ॥१॥

मन्मानसाची जणुं बालहंसी अस्पष्टशब्दा मज वाटली जी ॥
कीं होय जी सत्य सरस्वतीची स्फूर्ती जणों मूर्तिमती सुतेजीं ! ॥२॥

भागीरथीच्या जणुं शुद्धतेची मूर्तीच कीं निर्मल मीं ह्मणावी ॥
कीं रामकृष्णादिकसत्कथांची पावित्र्यपूर्णा पुतळी गणावी ! ॥३॥

श्रीव्यासवाल्मीकिकवीश्वरांची मानूं जिला मी प्रतिभाचि मूर्त ॥
कीं मंजुनादा मुरलीधराची वेणूच आह्मी गणुं जी मुहूर्त ॥४॥

ती बालिका मन्नयनांसि आतां बंधो ! कधीं कां सुखवील काय ? ॥
दुर्दैव माझें किति ! दुष्ट काळें नेला जिचा तो सुकुमार काय ॥५॥

आह्मी ह्मणूं 'क्षेम' ह्मणूनि त्यातें तथापि आहे सगळी कहाणी ! ॥
कीं जेथ तो निष्ठुर काळ आम्हां आघात वज्रें जणुं काय हाणी ! ॥६॥

दावाग्नि कीं जाळि मनोमृगाला व्यापूनि सर्वत्र दिगंतरातें
कीं कालसर्पे विषदिग्धदर्पें हा ! दग्ध केलें हृदयांकुरातें ! ॥७॥

'मुक्तामाला' मजसि सदयें ईश्वरें देउनीयां ।
केलें चित्तीं प्रमुदित मला-अंबुदें चातका या ! ॥
तेथें दुष्टा ! सहज करिशी घात; हा कोण कावा ! ।
हा ! दुर्दैवा ! तुजसि कवणें कां न रे ! दोष द्यावा ? ॥८॥

---

## ३७. छात्र-तर्जन.

(गीति)

छात्रा वदे परीक्षक "आजि मला स्मरसि रे ! निजाभ्यास ॥
नापास योग्य तूं; तें इच्छिसि तूं मात्र पास व्हायास ॥१॥

आजवरी वर्षभरी अभ्यासीं पळ न घेशि सायास ॥
आतां व्यसनीं बुडतां ह्मणसी 'यावें गुरूजि ! साह्यास' ॥२॥

येतां जवळ परीक्षा आजि मला स्मरसि देवता अंबा ! ॥
थांबा ! पाहूं तुह्मां वांचवितो कोण तो निरालंबा ! ॥३॥

कीं जें ह्मणसि 'यशस्वी कर गा ! वाहीन शंकरा ! बेल' ॥
यश त्या लाभे निश्चित, जो कोणी राबला नि राबेल ! ॥४॥

‘ विघ्नेशा ! तुज यावी करुणा गा ! गौरीनंदना ! माझी ॥
तूं तों भल्याभल्यांच्या चिंतेची वाहसी किती ओझीं ! ’ ॥५॥
आतांचि बऱ्या सुचल्या या ऐशा प्रार्थना तुला वत्सा ! ॥
विद्यागुरुदेवांची कारितचि होतास आजवरि कुत्सा ! ॥६॥
प्रोग्राम सिनेमांचे, पार्टीचे, नृत्य-नाट्य-गानांचे ॥
क्रीडाप्रिया ! जयेच्छो ! चुकुनिहि त्वां चुकविले न ते साचे ! ॥७॥
बहु मानिलेंसि मूढा ! नानापारि खेळ खेळतां शर्म ॥
अभ्यास करायाचा अवगणिला योग्य तो तुवां धर्म ! ॥८॥
वेळींच ते निवारुनि आवरुनी मन धड्यांसि जपतास ॥
तरि या परीक्षकांशीं संग्रामीं आजि तूं न खपतास ! ॥९॥
गहन अशा विषयांचे नेमानें चुकवितास ना तास ॥
तरि या परीक्षकांशीं संग्रामीं आजि तूं न खपतास ! ॥१०॥
निज उद्दामपणाची लवहि न रे ! वाटली तुला शरम ॥
आतां कठिनपरीक्षासमयीं झालासि कीं भला नरम ! ॥११॥
कादंबऱ्या नि गोष्टी दवडुनियां काळ वाचतां ना जी ! ॥
जरि वाचतां निज धडे, तरि या युद्धांत वांचतां आजि ! ॥१२॥
वर्गांत शिक्षकांना नित्य तुह्मी ‘ हुश्श ! हुश्श ! ’ करणारे ! ॥
दुःखें तसेंचि करितां, तुमची कोणास येइ करुणा रे ? ॥१३॥
‘ सन्नद्धो भव ’ ऐसें स्मरतां जरि वाक्य बालवीरांचें ॥
तरि काय तुह्मां ‘ हर हर ! नच केला यत्न ! ’ शल्य हें डांचे ? ॥१४॥
जरि रक्षितासि विद्या, विद्या तुजलागिं रक्षिती अंतीं ॥
‘धर्मो रक्षति रक्षित’ इत्येवं पंडिता हि कथयंति ! ॥१५॥
पूर्वींच ऐकतां जरि सांगति जे वडिल, शिक्षक हितज्ञ ॥
तुमच्या यशोधनाचा तरि हा होता न आजि रे ! यज्ञ ॥१६॥
पूर्वीं यत्न न रुचला नानापारि खेळ ढंग हा सुचला ॥
तरि आतां हेंचि ह्मणा ‘ जाउं चला ! ’ पद झपाझपां उचला ! ॥१७॥
ह्मणसी ना(?)पास करां, तरि मी तैसेंचि करित गा ! आहें ! ॥
सद्गुरु रुच्छिष्याचें प्रार्थित केल्याविना कसा राहे ? ॥१८॥

## ३८. कुशलपत्र!

[ आह्मीं मुंबईस असतां क्वचित् श्लोकबद्ध पत्रें केवळ मनोरंजनार्थ एकमेकांस लिहीत असूं. भगिनीद्वय चि. सौ. वेणूताई व चि. सौ. गंगुताई यांजकडून एकदां कोल्हापुराहून कांहीं साक्या व आर्यादिकांनीं मंडित अशीं दोन संयुक्त पत्रें आह्मांस आलीं. त्यांना उत्तर ह्मणून जें आह्मीं लिहिलें त्यापैकींच पुढील श्लोक होत. शेवटचे तीन श्लोक कै. ती. दादांचे (डॉ. शं. चिं. श्रीखंडे यांचे ) आहेत. — रा. चिं. श्री. ]

श्री. मुंबई ता. २८-८-१९

मांडीवरी तें लडिवाळ बाळ। शुंडा असे चुंबित शंभुभाळ ॥
अंबा बघे सुंदर बाळलीला। थांबा! नमूं या गणराजयाला ॥ १ ॥
नानापरी विलसतीं रमणीय वृत्तें। कानांवरी फिरकतां हारितात चित्तें ॥
ऐसें तुझें भगिनि वेणु! बघूनि पत्र। बैसे तयावरिच मन्मन, हें न चित्र! २
पाहोनी तें जाहले हृष्ट दादा। ना हो तृप्ती वाचितांही दहांदा ॥
जैसी रामा सेवितां कृष्ण–वेणू। किंवा संतां विष्णुपादाब्जरेणू ॥ ३ ॥
गंगूचें पत्र होतें ह्मणुनि बहु भलें जाहलें, वेणुताई!
त्वत्पत्रा वाचतांना करि नच मजला कोणिही फार घाई ॥
हें जैसें मन्मनातें विवश करि, तसें तेंहि दादादिकांतें!
सद्वृत्तें, गोड वृत्तें, रसिकजनहि ते, कोणतें न्यून होतें? ॥४॥
जरि कधीं कविता रचिली नसे। तरि कवित्व तुझ्यावरि लीनसें ॥
बघुनि हें गमतें मुदिता मला। रसिक तो सिकतो सकला कला! ॥ ५ ॥
न वहिनीवाहिनींत रुसा असो। उभय बंधुहि भांडत ना बसो! ॥
ह्मणुनि धाडिशि पत्र दुजें, पहा। समजला मजला तव भाव हा! ॥६॥
आह्मीं पूर्वी बहु रचियले बंगले इस्पिटांचे
तैसे येथें किंतिक दिसती, मात्र ते साग्र साचे! ॥
नावा, गाड्या कितिक रचिल्या आह्मि त्या मोडिल्याही
त्यांची गोडी क्षणभरि न ये या खऱ्यामाजिं कांहीं! ॥७॥
गंगूस आतां लिहितील दादा। करूनियां श्लोक अनेक जादा ॥
आर्या तिच्या पाहुनि हृष्टलों मी। साक्याहि वाक्यांहुनि होत नामी! ॥८॥

❖ ❖ ❖

पत्रें सुंदर पाहुनी तुमचिं तीं आनंदले मन्मन
वाटे स्वप्नचि कीं खरोखरिच हें सौख्याब्धिचें मज्जन ॥

झाले हर्षित चाखुनी मम तुझ्या काव्यामृतातें सगे
देतों पाठवुनी उद्यांचि तिकडे मी रामचंद्रास गे! ॥१॥
होईल खात्री बघुनी तयातें। सुहास्यवक्त्रा कविराजयातें ॥
जो धाडिला सत्वर आणण्याला। दोघींसही येथ; जयो मण्याला! ॥२॥
निघावें गे! वेगें अतिशय जसा टांक कवनीं
तुह्मांला जो लाजो पवनहि जवा देखुनि मनीं ॥
कधीं येतां? हेता मम पुरवितां भेटुनि बरा
सुचेना, नाचेना मन, न धरि हें छंद दुसरा! ॥३॥

## ३९. श्रीमंगलमूर्तीची आरति.

जयदेव जयदेव जय जय हेरंबा! ॥
जगदंबातनया! मज तार निरालंबा ॥ जयदेव० ॥ ध्रु० ॥
गणपति विद्याधीशा! गौरीवेल्हाळा!
गजवदना सुखसदना मदनांतकबाळा! ॥
सुंदररदना! शोभत चंद्रकला भाळा
पदकमलांतें वंदुनि घालूं तुज माळा ॥ जयदेव० ॥१॥
परमेशा! नित्य तुझें भक्तहृदय ओक
शरणागत तारुनियां नुरविशि बा! शोक ॥
विघ्नेशा! तुज गाती सुरवरनरलोक
श्रीखंडें तुज चर्चित सदया! अवलोक ॥ जयदेव० ॥२॥
हातीं वीर मराठे घेउनियां साह्या
सत्कार्यी दीक्षित तो गेला शिवराया! ॥
भारत आतां बोलवि तूंतें; उद्धरि या
श्री वर्धन, पट वर्धन कर या ताराया ॥ जयदेव० ॥३॥
निपटुनि काढिशि दुर्जनबलवैभवगर्वा
व्यासांसाठीं लिहिशी अष्टादश पर्वा ॥
ओढिशि गाडा सहजीं विश्वाचा सर्वा
वाहे परि तुज पामर केवळ या दूर्वा! ॥ जयदेव० ॥४॥
गिरिजानंदन! सुंदर! इंदीवरहार!
बुद्धिविनायक देवा! मजला उद्धार ॥
सच्चित्प्रकाशरूपा! नुरवीं अंधार
'राम' गणेशा वाहत सुमनें मंदार ॥ जयदेव० ॥५॥

## ४०. निसर्गांतील प्रणय-लीला.

" मेघालोके भवति सुखिनोऽप्यन्यथावृत्ति चेत: ।
कंठाश्लेषप्रणयिनि जने किं पुनर्दूरसंस्थे ॥ " —मेघदूत.

[ आधुनिक युवा वर्षर्तूच्या आरंभीं आढळणारें हृदयंगम दृश्य आपल्या दूरदेशस्थ प्रणयिनीस पत्रद्वारें कळविल्याशिवाय कसा राहील ! ]

पहा प्रिये ! हे गगनांत मेघ । ती चंचळा त्यावरि वीज रेघ ॥
कडाडुनी भांडुनि दूर जातां । ही दुःख देते निजनाथचित्ता ॥ १ ॥
ती भामिनी दावि बळेंचि कोप । उगीच पावे गगनांत लोप ॥
क्वचित् दिसे कीं जवळीच आली । क्षणात कोठें परि ती पळाली ! ॥ २ ॥
हे खेळ ती वीज पतीस दावी । वाटे तया ही जवळी दिसावी ॥
परंतु कोठें दडते कळेना । स्थूळासि ही चंचळ आकळेना ! ॥ ३ ॥
हा घाबरा होउनि वाट पाहे । क्वचिन्नभोमंडळिं तिष्ठताहे ॥
दाही दिशाही भ्रमतो कसासा । वाराचि जैसा गमला उसासा ! ॥ ४ ॥
वेडावला जो दयितावियोगें । त्याची मला येइ बहू दया गे ! ॥
कवीच काव्यें, गवईच गाणें । दु:खीच कांहीं परदुःख जाणे ! ॥ ५ ॥
त्या दुःखभारें बहु अश्रुधारा । टाकीतसे वल्लभ हा बिचारा ! ॥
फेंकीतसे खालति गोल गारा । कीं तोडितो मौक्तिकरत्नहारा ! ॥ ६ ॥
वणावणा हिंडुनि घाम आला । हा तोच कीं भूमिवरि गळाला ! ॥
तथापि ती निष्ठुर मेघपत्नी । देई न त्यातें यश या प्रयत्नीं ॥ ७ ॥
कान्ते ! तिनें कां तरि हें लपावें ? । कितीं तिनें यापरि गे ! छपावें ?
कैसा तिला हा बघवे विलाप ? । कैसा तिला ही नच होइ ताप ? ॥ ८ ॥
हो ! हे प्रिये ! हां; चुकलों खरा मी । ती मानिनी स्वैरगजेन्द्रगामी ॥
ती वीज भूमीवर थेट आली । यावा मनीं मागुनि कान्त खालीं ॥ ९ ॥
मेघेंहि त्या जाणियली मनीषा । आला क्षणीं खालति जेथ योषा ॥
झाला मनस्ताप पळांत शान्त । गेलीं पुन्हां तीं गगनीं अनंत ॥ १० ॥

❖ ❖ ❖

खेळींहि कान्ता न कधीं दडावी । ताटातुटी ती न कधीं घडावी ॥
ऐसेंचि देवाप्रति मेघ गर्जी ! । प्रभूसि माझी तरि हीच अर्जी ! ॥ ११ ॥

## ४१. 'बालादपि सुभाषितम्।' [शिशूचे मानस बोल.]

[कविश्रेष्ठ मोरोपंत यांची 'आर्या' या कवितांची जननी असल्यामुळें एवढेंच ह्मणतों कीं, 'न ऋण जन्मदेचें फिटे'.]

(गीति)

आमा आह्मांसि रुचे याच्या दुग्धीं जशी असे गोडी ॥
आहे इतरां दुग्धीं गोडी परि यापरीस ती थोडी ! ॥ १ ॥
दूर असो जवळ असो माझी त्या माउलीस आठवण ॥
नामचि पुरें ! न घ्यावे हट्टें लोळून अंगिं साठ वण ! ॥ २ ॥
जरि बोबड्या वचें मम पावति ते मोह इतर जन साच ॥
परि माउली सुखावे सुतराम् कायेन सुष्टु मनसा च ॥ ३ ॥
सेवुनि मधुर मधाला मदधर घाला; तथापि मद्वदन ॥
ओखद कटुक पितांना कटु कपि-तानासमान करि रुदन ! ॥ ४ ॥
हास्य करावें म्यां; नच वचकावें बागुलास, बोव्यास ! ॥
कां न मुखाब्ज फुलों अजि ? येइल कीं पुढतिं वृद्धपण त्यास ॥ ५ ॥
माझ्या गानच्छंदें स्वच्छंदें गाय माय, घे ताना ॥
ज्या मधुर ऐकतांना व्हावें मन मंत्रमुग्ध निजतांना ॥ ६ ॥
दुर्बोध शब्द पुष्कळ लुडबें लुडबेंच बोलतों कांहीं ! ॥
तोकांहीं असल्या परि मानिलि जगिं धन्य माय लोकांहीं ॥७॥
माथां केश सुसंस्कृत सुमयुत यास्तव ह्मणां न मज बाला[1] ॥
पळवा संशय पुसुनी मातेला वा मदीय तातांला ! ॥ ८ ॥
मम नासिकामुखांवरि लालारस लवहि ज्या गमे फार ॥
त्या सूक्ष्मदर्शिरसिका माझा साष्टांग हा नमस्कार ! ॥ ९ ॥
मज पाळण्यांत घालुनि 'जो जो' जों ह्मणतसे मला आई ॥
तों वाटे मजवरि कीं, मधुर सुधावृष्टि जाहली कायी ! ॥ १० ॥
जरि वस्त्र, अंग झालें मातेचें मजकडून तें मलिन ॥
'धन्यास्तदंगरजसा—' श्लोक असा दावि तात तिज ह्मणुन ! ॥११॥
धरितों स्वकरें मी जैं परिचित मृदु मांजरीस आवळुनी ॥
ह्मणती 'भरत खरा हा !' विस्मयमय जन करूनि 'आ' वळुनी ! १२
बहुविध अलंकृति मला लेववुनी सजविते किती माय ! ॥
सुकविप्रतिभा तरि ती यापरि काव्यासि नटविते काय ? ॥१३॥

---

[1] मुलगी.

देतात खेळणीं मज नानापारिचीं कितीक वसनें तीं ॥
तितुकीं वदान्य नृपतिहि पदव्या पदकें कुणांस नच देती ॥१४॥
'जय विठ्ठल! जय विठ्ठल!' ह्मणुनि मला माय दाविते भजन ॥
मीही तैसें करतों धरतों, करताल! कठिण तें मज न! ॥१५॥
कोणी दादा, नाना, जरि मज ते नेति 'हत्ति' दावाया ॥
मी 'नेति नेति' न ह्मणें! बुध दवडी संधि का कदा वायां? ॥१६॥
करकमलें पदपंकज फुल्लमुखाब्जांत जों न मी घालीं ॥
तों बघति रसिकलोचन; पद्मसमूहास जेंवि मधुपाली! ॥१७॥

❖ ❖ ❖

प्रातःकाळीं हलुहलु होतां जैं पाळण्यांत मी जागा ॥
येउनि कुरवाळी झणिं जननी सप्रेम मज महाभागा! ॥१८॥
वाटे उषा जणों ही मूर्तिमती अमृतकुंभ धरणारी! ॥
कीं, वात्सल्यरसाची पुतळी विश्वास हृष्ट करणारी! ॥१९॥
कीं, शारदा ह्मणों ती मज मृदु मधुमधुर शब्द वदणारी! ॥
कीं, श्री दुसरी, हसरी, श्रितसज्जनसंकटें दवडणारी! ॥२०॥
कीं, मूर्त भानु–भा जणुं मन्मानसकमलिनी फुलविणारी! ॥
कीं, चंद्रज्योत्स्ना ती हृदयसमुद्रा जणों डुलविणारी! ॥ २१॥
कीं, कालिदासकविता रसिकातें सर्वदा भुलविणारी! ॥
कीं, ज्ञानेशप्रतिभा गीतार्था रसभरें खुलविणारी! ॥२२॥
कीं, मूर्ति भक्तिची जणुं नाथतुकारामदाससंतांची! ॥
कीं, ही आर्या आर्यां हृदयंगम त्या मयूरपंतांची! ॥२३॥
किंवा भगवंताची मूर्ति सगुण ही मनांत लोभावी! ॥
निरुपम परि मम जननी, कीं तिज उपमा तिचीच शोभावी! ॥२४॥

❖ ❖ ❖

यापरि शिशुचे मानस मोहक ऐकूनि बोल कानांहीं ॥
मीही चुंबुनि वदलों 'तुजसम हेरंब बोलका नाहीं!' ॥२५॥
हसवी विनोद मज, परि जैं जननीसुगुणगान हो! सरलें ॥
गहिंवरलें मम अंतर नेत्रांतुनि अश्रुबिंदु ओसरले! ॥२६॥



# ४२. 'वंदे मातरम्' *

['वंदे मातरम्' या राष्ट्रगीताधारें रचलेले श्लोक.]

वारा जिथें शीतळ तापवारी । तृष्णा हरी निर्मळ गोड वारी ॥
संपन्न उत्कृष्ट फलीं असें जी ; वंदीन ती प्रेमळ माय माझी ॥१॥
अनेक धान्यें दिसतीं उदेलीं । शालूच कीं श्यामलवर्ण ल्याली ॥
सुहासिनी संतत सौख्य दे जी । वंदीन ती प्रेमळ माय माझी ॥२॥
दिक्प्रांत तेजें भरलेत दाही । भासे अशी रात्रिच पौर्णिमा ही ॥
प्रफुल्ल जीच्या बहु वृक्षराजी । वंदीन ती प्रेमळ माय माझी ॥३॥
माता असे बोलत सौख्य-खाणी । माधुर्यपूर्णा रमणीय वाणी ॥
देत्ये प्रसन्ना वर मंगला जी । वंदीन ती प्रेमळ माय माझी ॥४॥
तेतीस कोटी तव कंठ, तेविं । तो काढिती भीषण सूर, देवि! ॥
त्यांच्याहुनी दुप्पट कोटि हस्त । जे तीक्ष्ण खड्गीं सजले समस्त ॥५॥
गे! कोण ऐशा बलधारिणीतें । बोलेल तूतें 'अबला' असें तें ॥
ही तारिणी शत्रुनिवारिणी जी । वंदीन ती प्रेमळ माय माझी ॥
तूं देवि! विद्या हितधर्म सारी । हृत्प्राण तूं मर्महि तूं शरीरीं ॥
दंडांतली शक्तिहि तूं उदंड । त्वद्भक्ति माझ्या हृदयीं अखंड ॥७॥
घेऊनि नानाविध आयुधांना । दुर्गे! खरें रक्षिसि तूं जनांना ॥
असे तुझा वास गृहीं गृहीं या । माते! तुला नाहिं तुला तुलाया ॥८॥
हे निर्मले! हे कमले! नमस्ते। हे श्यामले! हे सुफले! नमस्ते ॥
हे शारदे! हे वरदे! नमस्ते। हे हिंदमाते! सदये! नमस्ते! ॥९॥

---

* वंदे मातरम् । सुजलाम् सुफलाम् मलयजशीतलाम् । सस्यश्यामलाम् मातरम् । वंदे मातरम् ॥ शुभ्रज्योत्स्नापुलकितयामिनीम् । फुल्लकुसुमितद्रुमदलशोभिनीम् । सुहासिनीं सुमधुरभाषिणीम् । सुखदां वरदां मातरम् । वंदे मातरम् ॥ सप्तकोटिकंठ-कलकलनिनादकराले । द्विसप्तकोटिभुजैर्धृतखरकरवाले । अबला केन मा एत बले । बहुबलधारिणीं नमामि तारिणीम् । रिपुदलवारिणीम् मातरम् । वंदे मातरम् ॥ तुमि विद्या तुमि धर्म तुमि हृदि तुमि मर्म त्वं हि प्राणा: शरीरे । बाहु ते तुमि मा शक्ति । हृदये तुमि मा भक्ति । तोमारि प्रतिमा गडि मंदिरे मंदिरे । त्वं हि दुर्गा दशप्रहरणधारिणी । कमला कमलदलविहारिणी । वाणी विद्यादायिनी नमामि त्वां नमामि कमलां अमलां अतुलां सुजलां सुफलाम् मातरम् । श्यामलाम् सरलाम् सुस्मिताम् भूषिताम् धरणीम् भरणीम् मातरम् । वंदे मातरम् ॥ [बाबु बंकिमचंद्र-कृत.]

## ४३. भारतास प्रणाम.

[ चाल— घनश्याम सुंदरा० ]

विराटाकृती राष्ट्रदेव, कीं अवनीची भूषा ॥
प्रणाम माझा गणेशरूपी या भारतदेशा ॥ ध्रु० ॥
तुंग मस्तकें मेघां भेदुनि शिरलीं जीं गगनीं ।
विश्रांतिस्तव जणों बसावें जेथें रविशशिनीं ॥
ऐसे गिरिवर हिमालयादिक मंडन भूमीचें ।
प्रचंड पर्वत गंडस्थळसम गमले ते ज्याचे ! ॥ विराटाकृती० ॥१॥
स्वर्गाहुनि जणुं दिव्य सुधेचे प्रवाह देवांनीं ।
येथ ओतले आर्यभूवरी अतुलप्रेमांनीं ॥
किंवा आल्या वाहत गंड-स्थलांहूनि, देखा ! ।
गंगा-सिंधू, यमुना यांना माना मद-लेखा ! ॥ विराटाकृती० ॥२॥
गिरिसम्राटावरुनि निघाली, रामेश्वरिं आली- ।
विधात्याचिया विविधरुचीच्या वैचित्र्यें न्हाली !- ॥
सह्यविंध्यनग, सरिता, नगरी यांहीं भूषविली- ।
ऐशी शुंडा ज्यास उदंडा शोभलि भुवनतलीं ॥ विराटाकृती० ॥३॥
सौराष्ट्राचें द्वीपकल्प जणुं दंत शुभ्रवर्ण ।
केकय इकडे ब्रह्मदेश तो तिकडे, हे कर्ण ॥
लंकाद्वीपा मोदक ह्मटलें, भासे ना खोटें ! ।
जो शुंडाग्रीं देशगणेशें जणुं धरिला वाटे ॥ विराटाकृती० ॥४॥
मदगंधातें लोभुनि आले दूरूनि भ्रमर ! ।
अलोट त्यांचे लोट लोटले जे कीं अनिवार ! ॥
सागरलहरी तिहिंबाजूंच्या गर्जति संतत या ।
ऋद्धिसिद्धिच्या जणों मेखळा रुणझुणती तुझिया ॥ विराटाकृती० ५
अंकुशपरशू कोमळकमळहि वागविशी स्वकरीं ।
त्यागवृत्तिशीं वैभवशोभा मिनली येथ खरी ॥
रघुरायांच्या शिवरायांच्या शोभसि जन्मांनीं ।
राजर्षीनीं, ब्रह्मर्षीनीं, नटसी रत्नांनीं ॥ विराटाकृती० ॥६॥



## ४४. ईशवंदन.

विद्याधिदेवी गणराजभार्या
गानप्रिया पूरवि भक्तकार्या ॥
आर्येसि या वंदन मन्मनाचें
कादंबिनीभक्तमयूर नाचे ! ॥

❖ ❖ ❖

कक्षेंत झोळी मुखिं राम घोळी
क्रोधाग्निगोळीं करि काम-होळी ॥
कृपाजळीं जो परि त्यासि पाळी
खेळो मनीं ती शिवमूर्ति भोळी ! ॥

❖ ❖ ❖

धरिला तनुवरि हरिला माथां भूगोल तोलला न दमे ॥
परि गातां हारिसि दमे त्या शेषीं चित्त हें विशेष रमे ॥
ध्यावें मनानें मुरलीधरासी
निर्मील जो केवळ सौख्यराशी ॥
मारावया पातलि पूतना ही
मोक्षाविना तीसहि दंड नाहीं ! ॥
जणूं सौंदर्याची दुथडि भरली कायसरिता
प्रिया ती वामाक्षी पळभरिहि कीं दूर नसतां ॥
स्मरारीचें साचें स्मरण करणें ज्यासि सुचतें
रमानाथातें त्या नमन मजला फार रुचतें ॥
भक्तकामपरिपूरका ! तुझें । पादयुग्म मनिं मी सदा भजें ॥
तारिले बहुत भक्त ज्यापरी । श्रीहरी ! मजवरी कृपा करीं ॥
मानसीं कमल सुंदर आलें
ज्यांत लोल मकरंदहि झालें ॥
भोंवतीं घुमति मंद मिलिंद
वाहतों तुजसि हें अरविंद ॥

# श्रीयुत विश्वनाथशास्त्री शंकर कात्रे
## यांच्या कांहीं कविता.

## ४५. शरत्काल !

[ चालः— चंद्रकांत. ]

वाजत वाजत भूदेवीतें घालुनियां स्नान
मेघमालिका नकळे कोठें हो अन्तर्धान ॥
रविद्युतीनें, न्हालेलीला तिला करें पुसलें
पहा ! पहा तरि नटलेलीचें रूप कसें खुललें ! ॥
नटलेलीला तिला पहा ही भेटाया आली
दिव्य अंगना शरत्सुंदरी स्वर्गांतुनि खालीं ! ॥
प्रेमें त्यांनीं दृढ बाहूंनीं परस्परां धरिलें
विश्व सर्व त्या मधुर मीलनीं आनंदें भरलें ! ॥
नभीं विहंगम गाउं लागले तानांवरि ताना
तरुवर सारे रसिकचि गमती डोलविती माना ! ॥
निर्झर गाती, पक्षी गाती, सरिताही गाती
पवनहि मंजुळ सांथ करितसे त्यांच्या सांगातीं ! ॥
जिकडे तिकडे गानचि भरलें ! उठले आराव
प्रतिशब्दाही नाहीं उरला कोठेंही वाव ! ॥
गानीं तन्मय होइ चराचर चंद्र रवी तारे
स्थलचर जलचर नाचति मोदें तालावरि सारे ! ॥
आली पाहुनि शरत्सुंदरी तृणें लता साऱ्या
फलसंभारा घेउनि जाती प्रेमें सामोऱ्या ! ॥
फलसंपत्ती असोनि इतुकी लवलीं हीं भारें
विनय असा हा कोठें शिकलीं हें नकळे मातें ! ॥
अगाध निर्मल पूर्ण डोह हे या सागर-जाया
अरसे देती दिव्य सखींना रूप विलोकाया ! ॥

संध्यादेवी सांजसकाळीं प्रीती बहु दावी
नटवी वेणी–फणी करुनि त्यां कंकुम ही लावी ! ॥
देती कोणी नव वनवल्ली फुलें निळीं पिवळीं
कर्णी लेवुनि शरत्सुंदरी प्रेमें त्यां कवळी ! ॥
निजपर्णांचा करुनी पंखा घाली कुणि वारा
कोणी त्यांवरि निजकुसुमांतिल सोडिति मधुधारा ! ॥
वृक्षाग्रीं ही चढुनी त्यांना बोलवि अन्य लता
ऐसें नसतें तर न तियेचा कर ऐसा हलता ! ॥
वनीं लतेच्या झोंपाळ्यावरि बैसुनि घे झोंके
शरत्सुंदरी; निश्चल नयनें वनदेवी देखे ॥
भूमिदेवताशरद्देवताप्रियसंगमकाळीं
उधाळिति त्यांवरि फळें पहा ! या आनंदें वेली ! ॥
प्रसन्नतेचें जिकडेतिकडे साम्राज्याचि पसरे !
सृष्टि विलोकुनि निरीक्षकाची क्षण संसृति विसरे ! ॥

## ४६. कवितेस बोध.

(शिखरिणी)

परीक्षा ज्यां नाहीं, विभविं रमती ऐहिकमती
अविद्यांची ऐशा शिव शिव! जगीं नाहिं कमती ! ॥
शतीं हो एखादा सहृदय; नमो या अरसिका !
अशांना हे माझ्या सरल कविते ! तूं वरसि कां ? ॥१॥
परोत्कर्षे ज्यांच्या हृदयिं भलती आग भडके !
गुणांनीं अन्यांच्या बसति किति छातींत धडके ! ॥
कराया सन्निंदा सजविलि सदा ज्यांहिं जिभली
अशां दुष्टां त्यागीं, असशि कविते ! तूं जरि भली ॥२॥
सदा ज्यांची भाषा करि निजगुणांचेंच कथन
तसें ज्यां केव्हांही प्रिय सरल सत्सेव्य पथ न ॥
उदंड द्वेषाचें कुटिल–हृदयीं मूर्त सदन !
नको त्यांचें पाहूं कधिंहि कविते ! कृष्ण वदन ! ॥३॥

दरिद्रीही झाले तरि खचित जन्मांध बरवे
वरूं त्यांच्या संगा परि धनमदान्धा न धरवे ! ॥
अशांतें ती झाली वरुनि कमला निंद्य जगतीं
तशी त्यांच्या संगें तवहि कविते ! होइल गती ! ॥४॥
वदे मुक्तें चित्तें परगुणलवाचीहि महती
तसें दोषा दावी मधुर वचनें जो ऋजुमती ॥
करी निःपक्षत्वें तरणि गुणदोषप्रकटन
असो हें त्या माझें रसिकपदिं साष्टांग नमन ! ॥५॥
जया कामक्रोधादिक षडरि बाधूं न शकती
महत्त्वें मापाया खचित लघु होईल जगती ! ॥
कदा सर्वां भूतीं कटु विषमता ज्या न करवे
बघाया ऐशातें जणुं तरणि हा नित्य उगवे ! ॥६॥
मनानें जे मोठे, मधुर वचनें, शुद्ध मतिनें,
स्वभावानें साधे, नत सुविनयें, साधु कृतिनें ॥
अगाध ज्ञानानें, परिमित न ज्यांच्या उपकृती
अशांची कां धात्या ! तव विपुल सृष्टींत कमती ? ॥७॥
वरावेंसें वाटे तरि गुणसमुद्रासचि वरीं
रहावें त्वां किंवा गुणवति ! कुमारीच तंवरी ! ॥
न निंद्या हो, दुष्टा कवळुनि, मदुक्तित्रिपथगे !
पुढें पश्चात्तापीं पडशि; तुज माझी शपथ गे ! ॥८॥

---

## ४७. मध्याह्न !

[ चाल– चंद्रकांत. ]

आला चालुनि दिनमणि भगवान् मध्यें आकाशीं !
तावुनि रस करि भूगोलाचा जणुं तेजोराशी ! ॥
रवितेजानें तप्त होउनी वाहे हा वारा
स्थिरचर सारें तापुनि सुटती घामाच्या धारा ! ॥
वन्यलतांचीं कोमल कुसुमें कोमेजुनि ठेलीं
गुंजन सोडुनि मधुकरवृंदें कोणिकडे गेलीं ! ॥

विहंगगायक गाउनि, ताना घेउनि हे दमले
विश्रांतिस्तव तरुवरशिखरीं जाउनियां रमले ॥
वनीं लतेच्या झोंपाळ्यावरि कोकिळ करि 'कूवू'
सांगे, पथिका क्षण तरुतलिं या नीज, नको जाऊं ॥
जलसम दिसती तापुनि पुलिनें मृग पाहुनि पळती
शोभे तुज हें काय निसर्गा! दुबळीं जीं फसतीं! ॥
वनावनांतुनि वणवण फिरुनी थकलीं गोवृन्दें
स्वस्थ नदीच्या तटीं तरुतलीं निजलीं स्वच्छंदें! ॥
पाव्यांतुनि मधु गीत गाउनी गोरक्षक शिणले
पावा मुखिंचा मुखींच ठेला! निजरूपीं रमले! ॥
प्रखरतरा या दिनकरतेजा साहुनि तरुराजी
श्रमलेल्यातें बाहति ह्मणती तळिं बैसा या जी! ॥
शिणलें स्थावर शिणलें जंगम दिनकरकिरणांनीं
शैलालीमधिं बसुनि सृष्टिचीं कवि गाई गाणीं! ॥

---o---

## ४८. आद्यप्रसव व कुमारसंभव

[ एक संसारांतील दृश्य. ]

कन्या जाउनि सासरीं नच पुरे षण्मास जों जाहले
आलें पाकिट सासराहुनि तिच्या तों वृत्त हें वाचलें ॥
'लक्ष्मी गर्भवतीस चार महिने झाले' असें ऐकतां
शांता धांवलि, कोण धांदल तिची मातेसि तें सांगतां! ॥१॥
कन्येचें शुभवृत्त हें परिसतां माता मनीं हर्षली
तैं वाटें तिजला तनूवरि सुधाधाराचि कीं वर्षली! ॥
दादाला ह्मणते 'अतां लवकरीं हो! आणवा वेणुस
तुह्मी जा; अथवा भला कुणि तरी धाडा त्वरें माणुस!' ॥२॥
दादा उत्तम वेळ पाहुनि निघे वेणूस आणावया
आईनें चिवडा डब्यांतुनि दिला, कीं जांवया द्यावया ॥
दादाला बघतांच अंगणिं बहू हो हर्ष त्या वेणुस
नाहीं वस्तु दुजी तशी प्रिय जसें माहेरिंचें माणुस! ॥३॥

पाणी पाय धुवावया मग तिनें प्रेमें दिलें ऊनसें
दादाला घरिंच्या कधीं इकिकती झालें विचारीनसें ! ।।
लाडू आणुनि ठेवितां निरखुनी दादा तिला पाहत
इष्टादृष्ट हळूंच हो! हंसत ती गेली त्वरें लाजत ! ॥४॥
झालें भोजन वामकुक्षि करुनी मामाजी हें बोललें
'आलां आपण न्यावया, परि हिचे संस्कार ना जाहले ॥
आह्मां एकलि सून ही कवतुकें ओटी भरूं साजरी
फेडूं हौस; मुहूर्त पाहुनि पुढें न्यावीच नेणें जरी!' ॥५॥
दादा ऐकुनि बेत निश्चलमनें तेथें सुखें राहिला
झाला उत्सव ओटिचा सुदिनिं जो, तो कौतुकें पाहिला ॥
हौशी सासु बरी तसे श्वशुरही दैवें हिला लाधले
आयासांविण सौख्यपूर्ण गृह हें भाग्यें मिळालें भलें ॥६॥
झाला उत्सव जावया निजगृहा दादा करी तातडी
जाण्याचा सुमुहूर्तही ठरविला ओझ्यासि केले गडी ॥
माहेरीं गमनांत हर्ष मुलिच्या चित्तीं जरी वाटला
घेतां गुप्त निरोप तो तिकडचा प्रेमें गळा दाटला ! ॥७॥
एकान्तांत पुन: पुन्हां उभयतां सप्रेम आलिंगिती
दोघांच्या नयनांतुनी सतत तैं प्रेमाश्रु जावे किती ! ॥
तोंडांतूनि मुळींहि शब्द नुमटे कीं रुद्ध झाला गळा
ज्यांचें प्रेम विशुद्ध, ये अनुभवा त्यांनाच हा सोहळा ! ॥८॥
कष्टें बोलत 'हे प्रिये ! मज बहू चिंता तुझी वाटते
कैशी होशि सुखें प्रसूत; मजला तान्हें कसें भेटतें ! ॥
धोक्याचा सगळाच जन्म तुमचा पीडा बहू सोसणें
कष्टाचें सदया शिवा! किति तरी हें बायकांचें जिणें ! ॥९॥
देवाच्याच कृपें सुसूत्र सगळें होईल गे ! उत्तम
संसारीं चिरकाल हा मज घडो प्रेमें तुझा संगम ॥
ओढा कीं असला जरीहि तुझिया चित्तांत माहेरिंचा
कांते ! तूं विसरूं नकोस मजला; हा मित्र संसारिंचा !' ॥१०॥

कष्टानेंच निरोप घेउनि पुढें सासू तिनें वंदिली
हीं आशीर्वचनें फळासह तिनें प्रेमें सुनेला दिलीं ॥
' माहेरीं मुलि ! तूं जपूनि असणें, होईल जें बालक
ये तूं त्यासह सत्वरीं शिव तुझा होवो ! स्वयें पालक ' ॥११॥
मामाजींस नमूनि ती हळुहळू दादासवें चालली
तों मार्गावरि आयतीच अपुली मोटारही पातली ॥
ती हां हां ह्मणतां चढोनि बसतां आली घरा सत्वर
बारा कोस परंतु वेणुस गमें कीं अल्प तें अंतर ! ॥१२॥
वाटेनें घरिंच्या विचारिं कथा हेतू तिचा जो असा
तो कांहीं तिजला जुळू नच दिला मोटारिनें फारसा ! ॥
मोटारींतुनि लांबुनी गृह तिचें जैसें दिसूं लागलें
केव्हां जाइन एकदां निजगृहीं ऐसें तिला जाहलें ॥१३॥
शांता ऐकुनि अंगणांत उतरे तो शब्द मोटारिचा
तों अक्का दिसली ! मनांत न तदा आनंद मावे तिचा ॥
गेली धांवत आंत ती लगबगा आईस तें सांगत
साडी नेसुनियां नवी मग पुन्हां बाहेर ये धांवत ! ॥१४॥
पाणी घेउनि आइनें मग तिला दारांत ओंवाळिलें
वेणूनें वडिलांस सर्व नमुनी शांतेसि कुर्वाळिलें ! ॥
भेटाया बहु येति आप्त तिजला शेजारिंचे जे जन
त्यांच्याशीं गुजगोष्टि बोलत पुढें झालें सुखें भोजन ॥१५॥
झालें भोजन; कामधाम वहिनी जेव्हां करूं लागल्या
त्यांच्या त्याच उगाच वन्संहि तिथें मोठेपणें वांकल्या ! ॥
आई तैं वदली, ' नको ! मुळि नको ! कामें नको तूं करूं !
आलें फार दिसांनि आज अपुल्या माहेरिं हें लेंकरूं ! ॥१६॥
' भांडीं घासुं नको, धुणीं धुवुं नको, तूं केर काढूं नको
पानें ठेवुं नको, मुळीं सडुं नको, पाणीहि ओढूं नको ॥
उष्टीं काढुं नको, मुली ! दळुं नको, कोणासि वाढूं नको.
कांहीं काम करूं नको, श्रम नको, तूं फार वांकूं नको ! ' ॥१७॥

आईचें अपुल्या मुलीवारि असें तें प्रेम सांगूं किती
नाहीं त्या उपमा जगांत दुसरी, त्याला नसे हो ! मिती ॥
प्रेमानें जितुकें करील तितुकें कौतूक तें थोडकें
मातृप्रेम अवर्णनीय ! जगही त्याच्यापुढें रोडकें ! ॥१८॥
आटोपूनि समस्त काम बसल्या विश्रान्तिला सर्वही
कोणी कापुस काढिला, कुणि ह्मणे काढूनि गाणें वही ॥
कोणी पुस्तकवाचनांत रमल्या, चोळीहि कोणी शिवे
झाली तों तिन्हिसांज, आंत वहिनी जावोनि लावी दिवे ॥१९॥
जाई काल सुखांत यापरि तिचा रंगोनि गेलें मन
रात्रीं पाहुनि चांदणें ठरविलें तैं चांदणें भोजन ॥
केली सर्व तयारि, लाडु, जिलब्या, स्वादिष्ट कोशिंबिरी
भाज्या काय ! भजीं, तशींच तिखटें, नानापरींच्या खिरी ! ॥२०॥
काटेकोडबळीं खमंग तळलीं, नानापरी सांडगे
सारे मिष्ट पदार्थ उत्तम, कुठें कांहीं नसे वावगें ॥
अंबा, वाळुक आणि काल, अवळा, यांचें बहू लोणचें,
हौसेनेंच पदार्थ हे जमविले, नाहीं कमी कोणचें ! ॥२१॥
केळीचीं किति चांदण्यांत बरवीं पानें क्रमें मांडिलीं,
पक्वान्नें सगळीं व्यवस्थितपणें, त्यांहीवरी वाढिलीं ॥
नानारंगिं कमान छान लिहुनी राघू वरी काढिले
केळीचे उदबत्तिसाठिं तुकडे मध्यें किती मांडिले ॥२२॥
ताशा, ढोल, मृंदग, सूर, सनई, गंभीर तीं वाजत
काचेचे बहु दीपही उजळले, पंक्ती अती शोभत ॥
मोठे चित्रविचित्र रंगित असे ते पाटहि ठेविले
सारा थाट अपूर्वसा जमवुनी, लोकांसि बोलाविलें ॥२३॥
थाटानें मग चांदण्यांत भरली ओटी खणें नारळें
केलें नंतर गर्भि पुत्र अथवा कन्या जयानें कळे ॥
वस्त्रें झांकुनि ताट त्यांत जिलिबी, लाडू तिथें ठेविला
'डोळे झांकुनि एक काढ !' ह्मणतां लाडू तिनें काढिला ! ॥२४॥

मातेला, मज नातु आजचि खरा झाला असें भासलें !
चित्तीं ती बहु हर्षली ' जन पढें जेवावया बैसले ॥
डोहाळे तितुक्यांत सुस्वर मुली त्या लागल्या गावया
ठेल्या तेंथचि वाढणें विसरुनी बायाहि ऐकावया ! ॥२५॥
झाला यापरि भोजनोत्सव जसा दादासि माता ह्मणे
' नौकेमाजिं मुलीस बैसवुनि या कीं एकदां आणणें ॥
तैसें सत्वर एकवार बसवा अश्वावरी वेणुला
आतां हें चुकल्यास सांग पुढतीं घोडा हिला कोठला ?' ॥२६॥
शिंक्याची पहिली, दुजी भरविली ओटी उनीं कोंवळया
थाटानें तिजि चांदण्यांत, चवथी काळोखिं काळ्या निळया ॥
झोंपाळ्यावरि पांचवी, शुभदिनीं बागेमधें साहवी
दारीं मंडपिं सातवीहि भरुनी मा आठवी आठवी ! ॥२७॥
जें जें वेणु ह्मणेल तें त्वरित ती माता करी आदरें
डोहाळे मनिचें तिच्या पुरविले नानापरी साजरे ॥
वेणूचे नव मास पूर्ण भरतां चिंता करी माउली
तों एकेदिनिं ती सुखें प्रसवली ! सारींच आनंदलीं ॥२८॥
झाल्या ज्या तिजला प्रसूतिसमयीं अत्यंत त्या वेदना
पुत्राचें मुख पाहतां विसरल्या; आनंद वाटे मना ! ॥
पुत्रासाठिं असह्य दुःख किति हें माता सुखें भोगिती
त्यांच्या ठायिं पुढें पहा जननिची जाणीव राहे किती ! ॥२९॥
झाला पुत्र ह्मणोनि साखर तसे पेढे किती वाटले
आजीला तर मीच धन्य जगतीं ऐसें तदा वाटलें ! ॥
शांता बाळ बघावया लगबगां आली तिथें धांवत
तों ' शांते ! शिवशील लांबच उभी !' आजी असें कावत ! ॥३०॥
थाटानें मग पांचवे दिवशिंचें हो पांचवीपूजन
सारे त्या समयीं खमंग घुगऱ्या खाऊनि धाले जन ॥
बाराव्या दिवशीं करूनि जिलिबी; केलें सुखें बारसें
सारा गांवहि जेवला, न चुकलें कोणी तदा फारसें ! ॥३१॥

ठेवावें मग नांव काय ह्मणतां आजी ह्मणाली 'सदू' !
शांतेला नच तें पसंत पडलें, 'ठेवा!' ह्मणे ती 'मधु' ! ॥
वेणूचें मत घेउनी मधु असें त्या नांव हें ठेवुनी
त्याचे कानहि टोंचिले जवळिंचा सोनार बोलावुनी ॥३२॥
सायंकाळिं सुवासिनी जमवुनी त्या घातलें पाळणीं
चित्रांचीं किति पाळण्यास मधुच्या तीं टांगिलीं खेळणीं ॥
गाणीं गाउनि नित्य सुस्वर किती शांता तया हालवी
लाडाचे बहु शब्द बोलुनि तसें नानापरी खेळवी ॥३३॥
हाताखालिं सुईण ! तें रगडणें ! अंगास तें लावणें !
तें न्हाणें,! किति शेकणें ! सतत तें बाजेवरी लोळणें ! ॥
डिंकाचे किति लाडु फस्त करणें ! तें तूप ! तें खोबरें !
सारा पाहुनि थाट वाटत मना, बाळंत होणें बरें !! ॥३४॥
झाला नातु असें पुढें समजतां ये सासु भेटावया ॥
आणी ती बिनल्या, सरी, मनगव्या, बाळासि घालावया ॥
'लक्ष्मी'ला अपुल्या तसेंच मधुला भेटूनि गेली घरीं
घेतांना मधुचे मुके मुळिं तिची तृप्ती न हो अंतरीं ! ॥३५॥
ऐसे गेले क्षणसम तिथें वेणुचे पांच मास
माहेरींचें अनुपम तिच्या सौख्य झालें मनास ॥
पुत्रानंदें तिज मुळिं नसे भानही या जगाचें
आले तों ते दिवस जवळी सासरीं जावयाचे !* ॥३६॥

## ४९. मुरलीगान !

(चाल:— भक्ति ग! वेणी०)

घेउनि तान, करि माधव मुरलीगान ! ॥ ध्रु० ॥
खुललें निर्मल हें चांदणें ! झालीं धवलित पुलिनांगणें !
तिकडुनि ऐकूं येतें गाणें ! दे सखि ! कान ॥ करि मुकुंद मुरली० ॥ १ ॥

---

* रसिक बंधुभगिनी या कवितेस '<u>पहिलें बाळंतपण</u>' या सुटसुटीत नावानेंही ओळखतात.

गगनीं विपिनीं यमुनाजलीं, उपवनिं पवनीं ही वाजली ॥
जिकडे तिकडे भरली मुरली ! सुटलें भान ! करि मुकुंद० ॥ २ ॥
मोदें ननयाब्जें झांकलीं, ठायीं वृत्तीही ठाकली ॥
आंतहि मंजुळ वाजे मुरली ! डुलली मान ! करि० ॥ ३ ॥
ही बघ मिटली गे ! पद्मिणी, अंतरिं मधुकर हा गुणगुणी ॥
माधवमुरलीच्या अनुकरणीं, काढी ध्यान, करि माधव० ॥ ४ ॥
पक्षी वृक्षांवरि बैसले, नादीं रंगुनि तटस्थ ठेले ! ॥
तटस्थ तरुवर वातहि न चले, न चले पान ! करि० ॥ ५ ॥
तटस्थ नग मृग तटस्थ धेनू, हाले न मुळीं एकहि रेणू !
निःशब्दी ही वाजे वेणू ! डुललें रान ! करि मुकुंद० ॥ ६ ॥
निश्चल वाहे यमुनानदी, मुरलीनादहि घुमतो मधीं !
जलचरवृंदहि लागे छंदीं, करितो ध्यान ! करि० ॥ ७ ॥
निर्मल सुंदर गगनांगणीं, हांसत मिचकत ये चांदणी ॥
परिसुनि ठेली मनीं मोहुनी, रव तो छान ! करि० ॥ ८ ॥
निर्जन वनिं नव सुमनें फुललीं, त्यांवरि मधुकरवृंदें बसलीं ॥
चाखिति नच मधु, नादें भुललीं ! झालीं लीन ! करि० ॥ ९ ॥
मंजुलतर त्या मुरलीनादें, आनंदें जग सारें कोंदे ! ॥
विश्वाचें या नादच्छंदें, विसरे ज्ञान ! करि माधव मुरलीगान ॥
घेउनि तान, करि मुकुंद मुरलीगान ! ॥ १० ॥

---

## ५० रुक्मिणीगीत

[ चाल:—अभंगाची ]

भेटावया आले सख्या पांडवांसी, द्वारकानिवासी वासुदेव ॥
आल्या संगें कांता रुक्मिणीप्रमुखा, ज्यांच्या चंद्र मुखा बहु लाजे ॥
पांडवांनीं कृष्णपदासि वंदीलें, त्यानें प्रेमें दिलें आलिंगन ॥
द्रौपदीसि कृष्णकांताहि भेटल्या, नद्याशा वाटल्या गंगेलागीं ॥
मिळाल्या एकत्र वहिनी, नणंदा, तेथें प्रेमानंदा आला पूर ॥
एकमेकींमध्यें सुरू झाल्या गोष्टी, अमृताची वृष्टी मज वाटे ॥

बोलती घरींच्या किती बाहेरींच्या, तशा माहेरींच्या प्रेमभरें ॥
द्रौपदी कौतुकें पुसे रुक्मिणीला, 'कैसें घननीळा वरीलेंस ? ॥
स्वयंवरवृत्त तुझें तुझ्या मुखें, ऐकवीं कौतुकें आह्मांलागीं' ॥
प्रश्न परिसूनि हांसली लाजरी, 'कथा ती साजरी ऐका' ह्मणे ॥१०॥

✣ ✣ ✣

"भीमक हे तात शुद्धमती आई, तुह्मांसि हें बाई ! आहे ठावें ॥
तातांसि मी पांच पुत्रांवरि झालें, आनंदानें धाले तातमाता ॥
वृद्धपणीं कन्या झालें मी एकुली, आनंदले कुळीं जन सारे ॥
प्रेमें मातापिता लाड पुरवीती, कौतुक करीती बहु माझें ॥१४॥
खेळावया दिली सोन्याची बावली, तिला मुक्तावली अलंकार ॥
मुलींमध्यें मज पाहूनि खेळतां, मानी ती धन्यता माय माझी ॥
बाळपणींच्या त्या किती सांगूं केली, अशीं वर्षे गेलीं पांचसात ॥
कांहिं काल जातां झाल्यें उपवर, येती नृपवर पहावया ॥
अनुरूप जेव्हां वर सांपडेना, तातांसि पडेना झोंप मुळीं ! ॥
विवाहाची चिंता ताता झिजवीत, मज हें जीवित व्यर्थ वाटे ! ॥२०॥
पुढें एकेदिनीं द्विज तेजोराशि, आला मंदीराशीं कीर्तिनामा ॥
सभेमध्यें त्यानें प्रेमें मंजू वाचें, गुण केशवाचे गाईयेले ॥
नखशिखांतही रूप माधवाचें, वर्णियेलें वाचें मनोहर ॥
तेव्हां तातापाशीं होतें मी बैसलें, कानांत घुसले कृष्णगुण ॥
झाल्यें मी तल्लीन रूप तें सांवळें, चित्तीं ठसावलें दृढ माझ्या ॥
कंठ सद्गदित अंग रोमांचित, झालें मी मूर्छित घडीभरी ॥
प्रेमाश्रूंचे लोट चालले नयनीं, पडलें शयनीं विकलांग ॥
'कृष्ण ! कृष्ण ! कृष्ण !' होत्यें बरळत, स्वेदही गळत अंगांतूनी ॥
ऐसें प्रेमभाव शरीरिं दाटले, जग हें वाटलें कृष्णरूप ! ॥
आली तेथें माय धांवत घाबरी, मजला सांवरी प्रेमभरें ॥३०॥
अंगासि चंदन शिरावरि वारि, घालूनि निवारी अवस्था ते ॥
कांहीं काळ गेल्या आलें मला भान, परि समाधान मनीं नाहीं ॥
उतावीळ मन कधिं कृष्णपायां अर्पीन हे काया ऐसें झालें ॥
अवस्था ही माझी विलोकूनि तात, 'द्यावी' ह्मणतात 'कृष्णाला हे' ॥

मातेलाही माझ्या बेत मानवला, माझाहि लवला सव्य नेत्र ! ॥
दादासि हा बेत कळविला तातें, त्याच्या हें चित्तातें आवडेनाँ ॥
संतापला बहु केली कृष्णनिंदा, तातांनीं कितींदा समजविलें ॥
पांच बंधवांचें झालें एक मत, काय ती गंमत सांगूं बाई ! ॥
ठरविलें त्यांनीं द्यावी शिशुपाला, माझ्या मी कपाळा दिला दोष ॥
वृद्धपणामुळें तातांचें न चाले, हवे तसे चाळे करी दादा ॥४०॥
नाहीं दिला मान त्यानें बहुमोला, मातेच्याही बोला मत्तपणें ॥
ठरविलें लग्न शृंगारिलें पूर, मंदिर गोपूर रंगविलें ॥
मुहूर्तादि सारें आधिं ठरविलें, मग करविलें मंडपादि ॥
वाजति वाजंत्रीं नगारे मृदंग, जन सारे दंग उत्सवांत ॥
आनंदसागरीं जन झाले मग्न, परि मी उद्विग्न मनामध्यें ॥
लागे तळमळ कांहिंहि सुचेना, मुळींच रुचेना खाणेंपिणें ॥
स्वप्नें पडावींत लागावी जों झोंप, कृष्णाचेंच रूप त्यांत दिसे ! ॥
इच्छा तीव्र खरी लाभो यदुराय, मध्यें अंतराय आला मोठा ॥
प्राप्त मज होती कैसे कृष्णपाय, कोणाला उपाय पुसों आतां ॥५०॥
रडूनि हे झाले नयन कोरडे, परि बाई ! रडें आवरेना ! ॥
नये माझी दया कैशी घननीळा, वाटला कंटाळा जीविताचा ॥
प्रतिकूल जेथें दैवाचा समीर, कृष्ण-जलधर तेथें कैंचा ? ॥
कराया जों गेल्यें घात जीविताचा, विचार हिताचा सुचे मज ॥
पत्रिकेनें मनोरथ कळवावा, देव आळवावा, दीनबंधु ॥
सत्वर घेतली कागद लेखणी, बैसले लेखनीं एकान्तांत ॥
पत्रामध्यें श्लोक लिहिले जे सात, त्यांचाच भावार्थ सांगतें मी ! ॥

❖ ❖ ❖

'नमो दीनबंधो ! कृपेच्या सागरा ! भुवनसुंदरा ! परमेशा ! ॥
ऐकिले मी गुण त्रितापहारक, आनंदकारक रूप तुझें ॥
सुचेनासें झालें दुर्जनशमना ! निर्लज्ज या मना आन कांहीं ॥६०॥
करावेंसें वाटे माझें तनुमन, तुज समर्पण घननीळा ! ॥
शीलादिसंपन्न अशातें न वरी, कोणती नवरी नरोत्तमा ! ॥
वरिलें मी तुज, तुझ्या पूज्य पायां, अर्पिली हे काया मनोभावें ॥
विनंती ही आतां मज अंगिकारा, घ्यावी निर्विकारा ! अंकावरि ॥

दीन अबलेची दयाळा ! उपेक्षा, माझी अंबुजाक्षा ! करूं नको ॥
उपेक्षिसी मज जरि अबलेला, शिशुपाळ मेला टपलासे ! ॥
शृगालानें नेला केसरीचा भाग, ऐसें महाभाग ! होऊं नये ॥
असेल म्यां केलें व्रततप जरि, तरि माझा हरि ! धरीं हात ॥
आतां देवा ! दुजा उपाय दिसेना, घेऊनियां सेना यावें येथें ॥
शिशुपाळादिक दुष्ट ते मारावे, मजला वरावें वीर्यमोलें ॥ ७० ॥
राक्षसविधिनें मजला हरावी, करणी करावी अघटित ॥
न वधितां बंधु कैशी हिला न्यावी, अशी नच यावी शंका तूज ॥
सर्वज्ञा ! मी तूतें युक्ति सुचवितें ! कैशी हरावी तें अवधारीं ॥
केळवणीदिनीं गौरीच्या पूजना, जावें ही सजना ! चाल कुळीं ॥
नगराबाहेर अंबिकादर्शना, हे पापकर्शना ! येईन मी ॥
तेथें मज धरा राहूनि सावध, न करितां वध बांधवांचा ॥
ज्याचें पादरज शिव शिरीं धरी, असा तूं श्रीहरी ! करीं कृपा ॥
जरि न या जन्मीं होशील प्रसन्न, टाकून जलान्न मरीन मी ! ॥
एका तुझ्यासाठीं ऐका विश्वंभर ! घेईन शंभर जन्म देवा ! ॥
परि अन्य हातीं कर न देणार, अशीच हे नार निश्चयाची ! ॥ ८० ॥
अशानेंहि तुज दया न ये जरि, निजहातें करीं वध माझा ! ' ॥

❖ ❖ ❖

लिहूनि या सात वसंततिलका, यादवातिलका आळविलें ॥
' चरणाची दासी ' ऐसें खालीं नाम, लिहूनि प्रणाम केला देवा ॥
पाठवावें पत्र आतां कोणासवें, भरलें आंसवें नेत्र पुन्हां ! ॥
बाई ! अशा सांगू किति अडचणी, जिवाची कांचणी झाली माझ्या ॥
इतुक्यांत माझें वळलें सुदैव, ब्राह्मण सुदेव तेथें आला ! ॥
पाहतां त्या आला भरूनि हा गळा, रोमांचें सगळा देह फुले ! ॥
प्रेमभरें आधीं कांहिं बोलवेना, दुःख सोसवेना अंतरींचें ॥
त्याच्या पायांवरी घेतली लोळण, अश्रूंनीं चरण भिजवीले ॥
अश्रु जैसे गळे तसा माझा गळा, जाहला मोकळा बोलावया ॥ ९० ॥
पुसूनि पदरें नयनाचें पाणी ! जोडुनियां पाणी विनवीलें ॥
' कृष्णप्राप्तीसाठीं काय सांग करूं, माझा तूं सद्गुरु होई बापा ! ॥
भेटवीं बा ! मज कृष्णदयाघन, आर्त झालें मन चातकसें ॥

घेऊनि हें पत्र जावें रातोरात, द्वारकापुरांत तातडीनें ॥
पत्रिका हे द्यावी माधवाचे करीं, येईल कंसारी ऐसें करा ' ॥
तेव्हां त्याला आली माझी कळकळ, ह्मणे 'तळमळ सोडीं आतां ॥
उद्यां सूर्योदयीं कृष्ण भेटवीतों, तुझा पळवितों शोक सारा ' ॥
सत्संगाचें फळ पहा हें रोकडें, भेट मज घडे माधवाची ॥
उठे विप्र वेगें सोडूनि आसन, दिलें आश्वासन मज त्यानें ॥
विप्रोक्तीनें कांहीं मन झालें शांत, स्फुरेहि तशांत बाहु डावा ! ॥१००॥
तेणें तेव्हां आशा माझी दुणावली, वाटलें पावली जगदंबा ॥
वऱ्हाड तों आलें चेदिदेशाहून, मला तें पाहून भय वाटे ॥
शिशुपाल त्यांत विशेष थाटला, काळसा वाटला मूर्तिमंत ! ॥
मज हरिणीतें न्यावया दांडगा, आला हा लांडगा भयंकर ॥
वाजत गाजत आले नगरांत, झाली मग रात ऐका पुढें ॥
जमा झाले सारे नागरिक जन, सीमांतपूजन केलें तातें ॥
आनंदसागरीं सारे झाले मीन, परि त्यांत दीन तिघे आह्मी ॥
तातमाता दोघे आणि मी तिसरी, तया अवसरीं चिंताकुळ ॥
मध्यरात्र झाल्याउपरि करीती, साऱ्या चालीरीती सुवासिनी ॥
मातेनें मजला दुःखार्त मनानें, हळद पानानें चढविली ॥११०॥
कांडविला मग नारळाचा घाणा, प्रेमें गणूराणा गाती नारी ॥
चौकामध्यें मज घातली आंघोळ, वाद्यांचा कल्होळ पुसूं नका ! ॥
जशी पूर्वदिशा पाहिली अरुण, हृदयीं दारुण झाली व्यथा ॥
'अजूनि न आला कैसा दामोदर !' गेल्यें गच्चीवर पहावया ॥
अंधुकसा दूर रथ तों दिसला, पक्षिहि भासला ध्वजावरी ॥
ध्वजावरूनि मी ओळखिला रथ, वाटे मनोरथ सिद्ध झाला ॥
पर्जन्याचे आधीं जसा थंड वात, तसा तो धांवत द्विज आला ॥
पहात मी त्याचा दिव्य मुखशशी, बाई ! चकोरीशी उभी ठेलें ॥
विप्र आनंदानें बोलला जे वाणी, मज सुधेवाणी वाटली ते ॥
ह्मणे 'द्वारकेला गेलों मनोजवें, शकुन उजवे झाले मज ॥१२०॥
मज मयूरास कृष्णकृपाघन, राजीवनयन भेटला गे !' ॥

शुभ्र तुझें पत्र जणों झालें इंदु! त्यानें कृपासिन्धु हालविला! ॥
प्रभूचे ते नेत्र चंद्रकान्त दोन, पत्रेन्दु बघोन पाझरले! ॥
वाचतांना बाळे! अश्रु फार गळे, भिजलें सगळें तुझें पत्र ॥
अंगांतूनि जसा घाम गळूं लागे, मेघ भासला गे! आपादींचा! ॥
रथ सिद्ध केला दारुकाकरवीं, त्याच्या वेगें रवी लाजवीला ॥
एकलेच तेव्हां कोणा न पुशीलें, निघाले सुशीले! तुजसाठीं ॥
गुप्तपणें आले नगराबाहेर, रथाचा तो हेर ध्वज दिसे ॥
ऊठ! ऊठ! वेगें माळ घालीं गळां, तुझी तो सांवळा वाट पाहे' ॥
ऐकतां हें वृत्त भासलें स्वप्नसें, आनंदासि नसे पारावार ॥१३०॥
द्विजाचे चरण झाडिले केसांनीं, आनंदासवांनीं प्रक्षाळिले! ॥
भेटविला मज ज्यानें हृषीकेशी, उतराई कैशी त्याची होऊं? ॥
कृष्णमेघागमें मोद तात-मोरा, जाऊनि सामोरा संभाविलें ॥
'यदुनाथ आला' ऐसें कोणी दास, कळवी दादास वर्तमान ॥
ऐकूनि तें वृत्त दादा भांबावले, क्षणांत बावलें मुखपद्म! ॥
ह्मणे 'आगंतुक येथें आला काळा, घालील हा घाला पोरीवरी ॥
सुरक्षितपणें पडूं द्या अक्षता, तोंवरी दक्षता राखा सारे ॥
वरातीच्या वेळीं पूजावी भवानी, मुहूर्त सर्वांनीं साधावा हा ॥
आणा रुक्मिणीला धरा अन्तःपट, होते खटपट व्यर्थ सारी! ॥
उठा! उठा वेगें ह्मणा 'सावधान,' आटपा विधान चट्ट सारें' ॥१४०॥
इतुक्यांत माता बोलली दादास, 'देवीप्रसादास संपादावें ॥
कुलाचार ऐसा पूजूनियां आर्या, मग लग्नकार्या आरंभिती' ॥
फोल मानी दादा मातेचे हे बोल, ह्मणे 'सदा बोळ बायकांचा!' ॥
क्रोधें तेव्हां तात दादासि बोलले, 'मजला कळलें धैर्य तुझें! ॥
भितोसि तूं घूका! दुष्टा! कृष्णसूर्या, भ्याडा! तुझ्या धैर्या आग लागो! ॥
भय वाटे तरी सैन्यासह बाला, जाऊंदे देवाला सुरक्षित' ॥
अशानें हो बाई! त्याला आली चीड, तातांची ते भीड मोडवेना ॥
थरारला क्रोधें लाल झाले डोळे, आपटी पाऊलें खाई दांत ॥
सैन्य जमावया हाणिला नगारा, दादाचा दरारा काय सांगूं! ॥

ठरे जैसें आधीं देवीपूजनाचें, माझें मन नाचे, आनंदानें ! ॥१५०॥
सखयांनीं वस्त्र नवें नेसवीलें, मज भूषवीलें नानापरी ॥
मातेनें जे अंगीं नग चढविले, वाटे मढविलें कनकानें ! ॥
भेरी ढोल ताशे वाजती दणाणा, सनई तनाना गाई गोड ॥
पुरांतूनि आले चालत पाउलीं, थाटानें देऊळीं अंबिकेच्या ॥
षोडशोपचारें पूजा संपविली, मग विनवीली आदिमाया ॥
'माते ! भेटवावा मज दामोदर, पदीं हा पदर पसरीलें ! ॥
मज निरवावी माधवाचे करीं, येवढें तूं करीं जगदंबे ' ! ॥
विनवूनि कंठीं समर्पीली माळ, पायांवरी भाळ ठेवियेलें ॥
घातलेली माला जींत फुलें पानें, प्रसादरूपानें दिली मज ! ॥
आनंदलें मन करूनि नमन, बाहेर गमन मग केलें ! ॥१६०॥
रक्षावया मज तरवार नंगी, घेउनियां जंगी उभी सेना ॥
न टलेल्या माझें बघूनि वदन, संचरे मदन सेनेमाजीं ॥
अंबिकेची माया सर्वा अनकळ मदनें विकळ सैन्य झालें ! ॥
खरोखरीं माझें साधावया हित, केलें तें मोहित अंबिकेनें ॥
इतुक्यांत मूर्ती कोणसी सांवळी, वेगानें धांवली मजकडे ! ॥
विलोकिली जेव्हां आकृति ते छान, तेव्हां देहभान मज कैचें ॥
घेतलें तत्काल त्यानें या देहातें, उचलुनि हातें रथावरी ॥
रथ दूर जातां सेना झाली जागी, पाहे माझ्या जागीं निरखून ॥
ओरडले सारे ' नेलें नवरीला, माधव वरीला रुक्मिणीनें ! ॥
मोठे झालें युद्ध दोन्हि पक्षांमाजीं, स्थिती तेव्हां माझी विलक्षण ॥१७०॥
दादाचें जें झालें त्यांत विडंबन, त्याची आठवण करूं नका ! ॥
पुढें झालें माझें लग्न आनंदानें, तुष्ट झाले दानें जन सारे ॥
लग्नांतील खेळ विड्या रंग नांवें, कितीसें वानावें कौतुक तें ! ॥
अशी आहे माझ्या लग्नाची हे कथा, झाल्यें मी सर्वथा मुकुंदाची " ॥
भक्तिभावें गावें रुक्मिणीचें गीत, जेणें विश्वनाथ तुष्ट व्हावा ॥

## ५१ यमुनातीरीं—

(चालः—शिंप्याघरिं बै शिवायला०)

उगवुनि आला पुनिवेचा चांदोबा । सुस्वर गर्जे यमुनेचा धबधबा ॥ १ ॥
धवलित झालीं वाळूचीं मैदानें । सारविलीं जणुं शाडूच्या रंगानें ॥ २ ॥
शीतळ वारा वाहे हा झुळुझूळू । डुललीं रानें आनन्दें हळुहळू ॥ ३ ॥
फुलल्या वेली, दिसती त्या रंगीत । त्यांवरि गाती भुंगे हे संगीत ॥ ४ ॥
निजले पक्षी वृक्षांच्या ढोलींत । शांतचि सारें शांतीच्या राज्यांत ॥५॥
तटस्थ झाडें, हालेना मुळिं पान । शांत विराजे निर्जन तें मैदान ॥ ६ ॥
मुरलीनादें, दुमदुमलें परि रान । जिकडे तिकडे भरलें कीं तें गान ॥ ७ ॥
वृंदावनिच्या, गोकुळिंच्या गौळणी । भुलल्या मंजुळ गायन तें ऐकोनी ॥८॥
कोणी मुरली वाजवितो समजेना । कोठें वाजे स्थानाहि तें उमजेना ॥ ९ ॥
जिकडुनि तिकडुनि कानीं ये तें गान । तेव्हां कैचें गोपींना त्या भान ॥१०॥
धांवत सुटल्या सोडूनी घरदार । कोठें मुरली वाजवितो सरदार ? ॥ ११ ॥
हिंडुनि धुंडुनि, दमल्या त्या गौळणी । गवसेना परि मुरलीचा त्यां धनी ॥१२॥
'कोठें' ह्मणती, 'आहे तो सांवळा । सोसूं किति हा प्रेमाचा कळवळा!' १३
ऐसा पाहुनि गोपींचा तो रंग । प्रेमें भेटे धांवोनी श्रीरंग ॥ १४ ॥
तेव्हां गोपी नाचती आनंदें । मुरली वाजवि कान्हा तो त्या छन्दें ॥१५॥
प्रेमें भुलला विश्वाचा तो नाथ । गोपींसंगें नाचतो रंगांत ! ॥ १६ ॥

## ५२ पावसाळा

[चाल-चंद्रकांत.]

कोठुनि कैसे कृष्ण मेघ हे पहा किती उठले ! ॥
हां हां ह्मणतां क्षणांत त्यांनीं गगन अहा ! भरलें ॥ १ ॥
चंडरश्मिचा प्रचंडतर तो ताप लया गेला ॥
तप्त जगातें सुखवाया हा वर्षर्तू ठेला ॥ २ ॥
आजवरीं जीं वसुंधरेच्या निजलीं सुख-शेजे ॥
तीं जोमानें वनस्पतींचीं अंकुरलीं बीजें ॥ ३ ॥
सोसाट्याचा वाहे वारा कांपवि तरुशिखरें ॥
दुःखद होती बलिष्ठ; विरळा सौख्यद हेंचि खरें ! ॥ ४ ॥

घो घो पाउस येई, कीं हें गगन जणूं फुटलें ॥
जिकडे तिकडे पाट जलाचे पळत पहा! सुटले ॥५॥
ओसरते सर पहिली तोंवरि आली ही दुसरी ॥
पुण्यात्म्यांच्या घरिं संपत्ती जैसें दैव भरी ॥३॥
ताप निवारुनि निज-जल-दानें गर्जे मेघगण ॥
सांगे जणुं तो परोपकारा वेंचा हो! स्वधन ॥७॥
दातृश्रेष्ठा मेघा गगनीं स्वर्गीच्या ललना ॥
ओंवाळिति जे ती भूलोकीं वीज दिसे नयना ॥८॥
उष्णकाळच्या दावाग्नीच्या तापा शमवाया ॥
हिरवीं वसनें लेवुनि बसले पर्वत हे न्हाया ॥९॥
गिरिशिखरांतुनि निर्झर किति तरि उसळति वेगानें ॥
स्वच्छंदें हे वाहति गाती मधु मंगल गानें ॥१०॥
कलुष जलानें तुडुंब भरल्या गर्जति या सरिता ॥
संपत्तीचा भर तो कसला मत्त न जरि करिता! ॥११॥
प्रेमें पर्वत नव मेघातें शिखरीं राहविती ॥
उपकर्त्यातें कोण न जगतीं मस्तकिं नाचविती ? ॥१२॥
मूक कोकिला मूक भृंग ते पक्षीही मूक ॥
उन्मत्तापरि कर्णकटू कां टुरटुरती भेक ! ॥१३॥
शेतकरी बहु हर्षें साधी शेतकिची घात ॥
उद्योग्याला त्याला पाउस थंडी ना वात! ॥१४॥
तरुतळिं रानीं गाइवासरें रक्षकसमवेत ॥
झंझावातें होतिं घाबरीं विश्रांती घेत ॥१५॥
जलमय सारें भूतल, पर्वत, जलमय हीं विपिनें ॥
शैलालीमधिं कवि हा गाई सृष्टीचीं कवनें ॥१६॥

## ५३ भ्रमरान्योक्ति

तुला आहे भारी जरि मधुकरा! गायनरुचि
धरावी त्वां मैत्री त्वरित तरि त्या आम्र तरुची ॥
परीक्षा गाण्याची करि चतुर तो कोकिल तिथें
इथें मित्रा! वेडा ठरशिल म्हणोनी मन भितें! ॥१॥

# वाङ्मय-श्री-खण्ड



## पद्यविभाग

### ( संस्कृत )

[ प्रस्तुत विभागांत कांहीं प्रासंगिक संस्कृत स्फुट श्लोक, स्तोत्रें व मनोरंजनार्थ लिहिलेली संस्कृत श्लोकबद्ध पत्रें इत्यादि देण्याचें योजिलें आहे. संस्कृत भाषेवरील प्रेम वृद्धिंगत व्हावें व त्या भाषेच्या अभ्यासास आह्मांला मदत होऊन काव्यरसानें अंत:करणास आल्हादही व्हावा एतदर्थंच प्राय: पुढील काव्यरचना झालेली आहे. संस्कृतज्ञ रासिकांस पुढील श्लोक फारसे अवघड वाटणार नाहींत. तथापि प्रसंगविशेषीं स्पष्टीकरणार्थ टीपाही दिल्या आहेत. ती. कै. डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे यांनीं रचलेल्या श्रीतुलसीस्तोत्राचें मी केलेलें समश्लोकी मराठी रूपांतरही मूळ संस्कृत स्तोत्रासोबतच देणेचें सोयीचें वाटल्यावरून तसें दिलें आहे. —रा. चिं. श्री. ]



### कै. डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे, एम्. सी. पी. एस्.

### यांच्या कांहीं कविता.



#### प्रार्थना

तृष्णापानीयपूर्णे मदगुरुपवनोद्धूतमोहोर्मिमाले
दाराद्यावर्तयुक्ते सहजसुतसुहृद्ग्राहसंघाकुले च ॥
संसाराख्ये पयोधौ भवतु पशुपतिर्मज्जतां नाविको न:
श्रीगौरीशंकरस्यांघ्रियुगकमलयोर्भक्तिनौकां ददातु ॥१॥



# १. श्रीतुलसीस्तोत्रम्

स्नात्वा प्रभाते कृतनित्यकर्मा श्रद्धान्वितो भक्तिसमन्वितश्च ॥
भूत्वा नरः श्रीतुलसीसमीपे गच्छेत्प्रसादाय शुभाय तस्याः ॥१॥
श्यामां प्रफुल्लां तुलसीं सुवासां दृष्ट्वा पुमानाशु नमस्करोतु ॥
आचम्य सम्यग्विनिरुध्य वायुं स्वदेशकालस्मरणं च कुर्यात् ॥२॥
छायां समाश्रित्य शुभां पवित्रां पद्मासनस्थेन नरेण भाव्यम् ॥
गुरूपदिष्टं त्ववलंब्य मार्गं चित्तं चलं योगबलेन रुन्ध्यात् ॥३॥
आकृष्य कार्मुकमहो प्रणवं वरेण्यं सोऽहं शरो धनुषि साधु निवेशितव्यः ॥
संधानमेकमचलं प्रणवस्य नादो लक्ष्यं च नीलतुलसीदलमध्यबिंदुः ॥४॥
ध्यायेत्स्वहृत्कमलकोषनिषेदुषीं तां पद्मासनां गगनतुल्यमनोज्ञवर्णाम् ॥
रत्नप्रवालमणिकांचनभूषणाढ्यां दिव्याम्बरां भगवतीं तुलसीं प्रसन्नाम् ॥५॥
एवं ध्यात्वा पूजयेद्ध्यानमूर्तिं साक्षान्मूर्तिं चैव दिव्योपचारैः ॥
रक्षामेतां श्रीतुलस्याः पठेद्यः प्राप्नोत्यायुर्धीप्रजानंदलक्ष्मीः ॥६॥

---

## श्रीतुलसीस्तोत्र-प्राकृत-समश्लोकी

(रामचंद्र चिंतामण श्रीखंडेकृत.)

जो शृंखला तुरवि संसृतिची कराला वंदोनि त्या सुजनबांधव शंकराला ॥
जें अग्रजें मधुर गाइयलें सुवाचा भावार्थ मी कथिन त्या तुलसीस्तवाचा ॥

❖ ❖ ❖

करूनियां स्नान सदा प्रभातीं जीं नित्यकर्में उरकूनिही तीं ॥
चित्तीं धरूनी दृढ भक्तिदीप जावें मुदें श्रीतुळसीसमीप ॥१॥
श्यामा प्रफुल्ला तुलसी सुगंधा विलोकुनी सत्वर तीस वंदा ॥
करूनियां आचमनादि भावें स्वदेशकालादिकही स्मरावे ॥ २ ॥
त्या मावलीच्या शुभ सावलींत घालूनि पद्मासन शुद्धरीत ॥
श्रीसद्गुरूचें वच आदरावें योगें हटी हें मन आवरावें ॥३॥
ओढा वरेण्य धनु तें प्रणवाख्य नीट सोऽहं-स्वरूप शर जोडुनि व्हा सुधीट ॥
संधान एक अचल प्रणवस्वराचें तें लक्ष्य होय तुलसीदलमध्य साचें ॥४॥
पद्मासना तनु निळी गगनासमान रत्नें सुवर्णमणि यांहि विराजमान ॥
ही आपुल्या हृदयपंकजिं बैसवावी दिव्यांबरा भगवती तुलसी स्मरावी ॥५॥
ऐसी ध्यावी ध्यानमूर्ती पुजावी प्रत्यक्षाही सांग पूजीत जावी ॥
त्या देवीची प्रार्थना ही वदावी जी श्री-पुत्रायुष्य-कीर्तीसि दावी ॥६॥

शिरोऽवतु श्रीतुलसी मदीयं प्रज्ञास्वरूपा मम पातु भालम् ॥
तेजोमयी रक्षतु चाक्षियुग्मं कर्णौ त्रयीशास्त्रपुराणगीता ॥७॥
घ्राणं सदा पातु सुवासिनी मे मदाननं ब्राह्मणपूजिता च ॥
जिव्हां तथा मेऽमृतधारिणीयं ध्यानावगम्या मम पातु कण्ठम् ॥८॥
स्कन्धौ हि पायाद्बलवर्धिनी सा पापापहा वीर्यवती च बाहू ॥
मातः सदा रक्ष करद्वयं मे युनज्म्यहं तत्तव पूजनाय ॥९॥
अयि रक्ष जनार्दनप्रिये! हृदयं मे सदये! तवासनम् ॥
तनुमध्यमवाच्युतांगने! मम नाभिं भवभीतिहारके! ॥१०॥
कामदाऽवतु कटिं विमलांगी सक्थिनी शुभकरा च ममोरू ॥
जानुनी वररुचिर्मम जंघे शर्मदासवरदाऽवतु पादौ ॥११॥
शरीरं हि रोगाकुलं दुर्बलं मे बलारोग्यदात्रि! त्वया रक्षणीयम् ॥
मनश्चंचलं जन्मपंचत्वभीतं तव श्रेष्ठपादेषु भक्तिं करोतु ॥१२॥
एका देवी भूतले वासकर्त्री भावस्तस्यां श्रीतुलस्यां दृढो मे ॥
छित्त्वैषा मे घोरसंसारकारां ब्रह्मानन्दं सन्ततं मे ददातु ॥१३॥

---

रक्षो मम श्रीतुलसी शिराला बुद्धिस्वरूपे! मम रक्ष भाला ॥
हे सोज्ज्वळे! हो नयनांसि दक्ष गीर्वाणगीते! मम कंठ रक्ष ॥७॥
सुवासिनी राखिल नासिकेसी रक्षो मुखा ब्राह्मणपूज्य तैसी ॥
जिव्हेसि संभाळ सुधामये! ये! ध्यानोन्मिषे! कंठहि रक्ष माये! ॥८॥
स्कंधासि रक्षो बलवर्धिनी ती रक्षील बाहू मम, वीर्यमूर्ती ॥
माते! सदा रक्षक हो करां या योजूं तुझें पूजन ते कराया ॥९॥
सदये! प्रिय तूं जनार्दना हृदया पाळ तुझ्याचि आसना ॥
मम नाभिसि भीतिपारगे! हरिभार्ये! तनुमध्य रक्ष गे! ॥१०॥
रक्ष नित्य कटितें, विमलांगि! ऊरुतें हरिमनोऽम्बुजभृंगी ॥
जानु, पाय, मम अंगुलि, जंघा रक्ष दाखिव मला करुणौघा ॥११॥
बलारोग्यदे! रक्ष माझे शरीरा नसें त्राणही येथ रोगांसि थारा ॥
चळे चित्त हें जन्ममृत्यूंसि भीतें तुझ्या दिव्य पायीं करो भक्तितें तें ॥१२॥
एका देवी भूतळीं राहाणारी निष्ठा माझी दैवतीं याचि भारी ॥
तोडोनी ही घोर संसारकारा ब्रह्मानंदा देउं मातें अपारा ॥१३॥

हृष्टान्तरात्मा गलिताभिमानः श्रद्धान्वितः श्रीतुलसीसमीपे ॥
पठेत्तु यस्तोत्रमिदं तुलस्या गच्छेत्परं धाम सुवर्णबिन्दोः ॥१४॥

इत्थं श्रीतुलसीप्रियं शुभकरं पुण्यं प्रजावर्धनं
पापघ्नं सकलेष्टसिद्धिसुखदं धर्मार्थमोक्षप्रदम् ॥
भूयात्स्तोत्रमिदं प्रसादवचनं विद्वज्जनानां मुदे
श्रीखण्डेजनिशंकरेण रचितं चिन्तामणेः सूनुना ॥१५॥

---

सांडोनि सारी अभिमानपेटी हर्षोनियां भक्ति धरोनि पोटीं ॥
गातां स्तुति श्रीतुलसीसमीप लाभे हरीचें गृह सौख्यरूप ॥१४॥

ऐशी श्रीतुळसीसि जी प्रिय सदा धर्मार्थमोक्षप्रदा
नाशी पाप अपाप, सौख्य वितरी, दे सुप्रजा संपदा ॥
देवीची स्तुति ही प्रसादवचना, सुज्ञां करो हृष्ट ते
श्रीखंडे-कुल-शंकरें रचियली चिंतामणीच्या सुतें ॥१५॥

✥ ✥ ✥

नमो गोविंदातें, मम नमन हें श्रीतुलसिला
दयेनें हो ज्यांच्या भवजलधि सारा निरसिला ॥
सदा म्यां ते माथां गुरुचरण भावें कवळलें
असावें 'रामा'चें मन हरिकडे एक वळलें ॥

---

## २ पत्रपुष्पमाला

प्रथमपुष्पम् मुंबापुर्या: परेलजंतुपरीक्षणशालायाः

श्रीशंकरः प्रसन्नोऽस्तु शके १८३२ माघे शुद्धद्वादश्यां तिथौ

ॐ ( मुंबई ता. १०-२-१९११ )

आशीर्वाचः पुरस्कृत्य स्मृत्वा गुरुपदांबुजम् ॥
नत्वा च परमेशानं कुशलं लिख्यते मया ॥ १ ॥
श्रीगुरुदेवपितॄणां कृपाप्रसादेन केवलसुखेन ॥
मुंबापुर्यां रत्नाकरभूषायां नयाम्यहं दिवसान् ॥ २ ॥
पत्रेण संस्कृतमनोरमभूषितेन पूतप्रगल्भसुविचारपरिप्लुतेन ॥
आनंदसागरपरातिशयं न गच्छेच्चेतः कथं परिचितस्य जनस्य तूर्णम् ॥३॥

विषादं बंधो मा कुरु बलभिदं धीभ्रमकरम्
विषादं गौरीशं भज बलयशःस्फूर्तिजनकम् ॥

सुमित्राणां यूथे विचर रुचिरालापरुचिरे
त्वया सेव्या नित्यं विबुधरमणी पद्धतिरियम् ॥ ४ ॥

खिन्नो मा भव बालके स्वतनुजे प्रीतिर्निसर्गान्नृणा–
माचारोऽपि च शास्त्रयुक्तिविहितो यः पालनीयः सदा ॥

चातुर्यं खलु दृश्यते किमपि यत् पृष्टं त्वया मंगलं
सर्वेषामधिकृत्य सुंदरतनुं बालं कृपाशालिना ॥ ५ ॥

✣ ✣ ✣

अस्यां[1] पुर्यां विविधरचनालंकृतायां समंतात्
पुंसां कौशल्यमपि च विधेः पाटवं दर्शयंत्याम् ॥

नानासंपत्सुभगसुरसालापशय्यायुतायां
वासं कुर्वन्क्षणमपि भवेत्त्यक्तसंगोऽपि रक्तः ॥ ६ ॥

वृषभतुरगविद्युद्बाष्पवाहाकुलेऽस्मिन्पदचरमनुजानां चित्रसंघैः सुरम्ये ॥
सकलनगरमुख्यक्ष्मापतिस्थानमार्गे गजगतियुवतीनां वर्ण्यते किं दृगाभा ॥७॥

पर्याप्तमश्नन्गुरुभोजनालये भ्रमन्यथेष्टं नगरेऽतिविस्तृते ॥
यथार्थमध्यायगणं च कुर्वेश्चिंतां किमर्थं कतमस्य कुर्वे ॥ ८ ॥

अप्पादादाबापुसाहेबमुख्याः सर्वेऽत्रस्थाः पश्य भुंजंति भद्रम् ॥
इच्छंस्तुभ्यं चायुरारोग्यविद्यासंपत्कीर्तीः शंकरोऽहं शिवोऽस्मि ॥ ९ ॥

स्फुरद्धियं वामनरायमादौ मित्राणि मे वैद्यकशास्त्रवर्गे ॥
ये त्वत्प्रियास्तांश्च मुकुंददासान् ब्रूहि प्रणामान्मम भक्तियुक्तान् ॥ १० ॥

इयं मे कविताकन्या तुभ्यं या प्रेष्यते मया
तद्गुणावगुणाः सर्वे ज्ञायंते वेति कथ्यताम् ॥ ११ ॥

चिंतामणेर्नंदनोऽहं श्रीखंडेजनुशंकरः
पत्रमेतत्प्रेषयामि प्रत्युत्तरमपेक्ष्यते ॥ १२ ॥

इति शम् ।

———o———

[1] मुंबई

द्वितीयपुष्पम् परेलजंतुपरीक्षणशालायाः

श्रीसद्गुरुः प्रसन्नोऽस्तु शके १८३२ माघे वद्याष्टम्यां

(मुंबई ता. २०-२-१९११ इ.)

स्वस्त्यस्तु ते गूढविचारबंधो
स्वाध्यायशीलोऽसि निरामयः किम् ॥
चित्रं मया ते कथमद्यतावत्
पत्रं न लब्धं हृदयातपत्रम् ॥ १ ॥

पत्रं प्रेषितवानहं दशदिनप्राक् तुभ्यमद्यापि ते
लब्ध्वा नोत्तरमस्ति तर्कनिवहे दोलायमानं मनः ॥
लब्धं तन्न किमु त्वया किमगतं पत्रं मदीयं त्वितः ।
कार्ये दोषपरिप्लुतेन किमहो कालो न वा लेखने ॥ २ ॥

कुशली कृपयाहमत्र शंभोः परिपूर्णेष्टफलो नयाम्यहानि ॥
हृदयंगमदिग्विभागदीप्तौ वद पुर्यां रमते न कस्य चेतः ॥ ३ ॥

वासः समृद्धे नगरे निरामये सुमित्रलाभो विदुषां समागमः ॥
वने विहारो द्विजदेवदर्शनं भवन्ति भाग्याच्च नरस्य तंपदः ॥ ४ ॥

दादादिकाः क्षेमकराः सगोत्राः
पृच्छान्ति सन्तस्तव वर्तमानम् ॥
कन्यापि मात्रा सह हर्षयुक्ता
करोति लीलामतिचारुशीला ॥ ५ ॥

पत्रं प्रेषय भद्रं ते कुशलं ब्रूहि सत्वरम् ।
प्रणामान्यच्छ मित्रेभ्यो मामकेभ्यश्च ते तथा ॥ ६ ॥

शुभं भवतु शंकरोऽहम्

---

तृतीयपुष्पम् मुंबापुर्याः परेलजन्तुपरीक्षणशालायाः

शके १८३२ माघे वद्यद्वादश्याम्

श्रीसद्गुरुः प्रसन्नोऽस्तु (मुंबई ता. २५-२-१९११ इ.)

स्वस्त्यस्तु ते मंगलधामबन्धो लेखश्च ते पुष्कलहर्षदोऽभूत् ॥
स्पष्टावबोधः सुलभः सुवाच्यस्सर्वांगरम्यः खलु सुंदरार्थः ॥ १ ॥

यत्नं प्रबंधरचने कुरु मा त्यजेनं शंभुप्रसादभुगयं मम बंधुवर्गः ॥
नाट्ये तवाभिनयसुंदरभूमिकायां चित्तं रमेत खलु मित्रजनस्य लोलम् ॥२॥

अत्रैधते ग्रन्थिकसन्निपातस्तथापि वैद्यस्य न मेऽस्ति भीतिः ॥
चराचराणां प्रतिपालको हि मृत्युंजयो रक्षति मां कृपालुः ॥ ३ ॥
पुर्यामहं हसितदेवपुरप्रभायामस्यां रमे प्रतिदिनं सुखभुक् सुमित्रः ॥
भक्तानुकंपितमतिर्भवतापहारी नित्यं शुभं वितनुते मयि शूलपाणिः ॥४॥
विद्युद्रथैरिह महाजवबाष्पवाहैरभ्रंलिहैर्गृहगणैरतिसुंदरैस्तैः ॥
मिष्टान्नपुष्पफलचंदनगायनैश्च कार्यं जनेन वद किं खलु निर्धनेन ॥ ५ ॥
खाग्न्यप्कुवायुगणदासनरस्य बुद्धिं शेषोऽप्यशक्त इति वर्णयितुं मतं मे ॥
इंद्रः सदात्र रमते स्वपुरीं विहाय सूर्योऽपि मंदगमनः पुरमां दिदृक्षुः ॥६॥
सुदूरदेशेभ्य इहागता जना आरुह्य मत्पृष्ठमवेक्षितुं पुरीम् ॥
दृष्टाद्यतावन्न मयेति सागरः कल्लोलरूपो यततेऽनुतमहृद् ॥ ७ ॥
तीरे तरुण्या वदनं सुहासं नीरे तरण्यां रमणं च भर्तुः ॥
आलोक्य धावत्युभयत्र मुग्धा कटाक्षमालाधरपानलुब्धा ॥ ८ ॥

क्वचिद्दिव्यं रूपं क्वचन नववस्त्राभरणकम् ।
क्वचिद्रम्यं गानं विमलसुरसान्नं क्वचिदपि ॥
क्वचित्सद्व्याख्यानं क्व च हरिपुराणं दुरितहं
न जाने किं सेव्यं सपदि किमसेव्यं हतमतिः ॥ ९ ॥
गौरं वेणीधृतसुकुसुमं कंजनेत्रं सुगात्रं ।
किंचिद्वक्षोगलितवसनं वर्तुलोरोजयुग्मम् ॥
माघे रात्रावुपवनलतामंडपे केलिमग्नं
दृष्टं कामं[1] जनयति न किं यौवतं चंद्रिकायाम् ॥ १० ॥

पीनावुरस्थौ सहजौ समौ द्वौ पयोधरौ वीक्ष्य घनौ च तुंगौ ॥
तद्दर्पनाशाय नरस्य चित्ते जायेत कोपो यदि कोऽत्र दोषः ॥११॥

---

१. " गौरं वेणीति श्लोकषट्केन कामादिषड्विकाराणां सुलभोत्पत्तिराहूयते । " कामादि षड्विकार उत्पन्न होणें कसें सहज शक्य असतें तें १० ते १५ या सहा श्लोकांनीं निवेदन केलें अशा अर्थाची टीप मूळ पत्रांत कवीनें दिली आहे.

पीड्य पीनकुचौ पीत्वा युवत्यधरवारुणीम् ॥
कामोऽवमानितो येन क्षम्य एव हि तन्मदः ॥१२॥
सुरसानुपभुंजन्ति सुरते रसनादिकाः ॥
युक्तो हि मत्सरस्तेभ्यः स्तनयोः पीड्यमानयोः ॥१३॥
रतिश्रान्तेषु गात्रेषु वक्षोजौ स्मरवेत्रपौ ॥
रक्षतः स्वामिनो मानं दम्भादुन्नतमस्तकौ ॥१४॥
बिंबाधरः स्मितमुखो मृदुचारुगात्रश्चेतोहरश्चपलनेत्रकटाक्षपातैः ॥
पीनस्तनस्तनुकटीरमणीजनोऽयं मोहाय सर्वजगतः किमकारि धात्रा ॥१५॥
प्रविशति यदा त्रैलोक्यात्मा प्रतीच्युदधौ रवि-
विंकिरति निशा ध्वांतं घोरं महाजनभीतिदम् ॥
जनसमुदयः स्तब्धोद्योगः स्त्रियः स्मरविह्वला
अहह ! भगवन् कालो व्यालोऽकरोत्किमिमां दशाम् ॥१६॥
वनिताधनमत्तधीजडानामसदाचारवतां विलासभाजाम् ॥
मतिकीर्तिसखी परेशविद्या कथमूनां प्रियतां सहेत यूनाम् ॥१७॥
देशे देशे पुष्कलाः सन्ति पुर्यः पुर्यां पुर्यां सुन्दरा राजमार्गाः ॥
मार्गे मार्गेऽप्युन्नतं गेहवृंदं गेहे गेहे प्रत्यहं नूतना भा ॥१८॥

✥ ✥ ✥

अप्पादादादिकनरवराः सांगनापत्यमित्रा
मुंबापुर्यां गिरिशकृपया संति शं भुंजमानाः ॥
पृच्छन्तस्तेऽपि तव जननीक्षेममेतद्दिनांत-
मिच्छंति त्वां कुशलमभयं निर्गदं निर्विकारम् ॥१९॥
अस्पष्टार्धामृतमधुगिरं भाषमाणाऽतिलोला
मातुः पार्श्वे दृढधृतकरा सत्वरोत्थाय भूमौ ॥
मंदं मंदं नयनरुचिरं कंपयुक्तं सहासं
गेहे स्त्रीणां सदसि कुरुते चंक्रमां कन्यका ते ॥ २० ॥
कुक्षिगं मधुरदं स्मयमानं संविमृज्य वदनांबुजलालाम् ॥
धूलिधूसरतनुं निजबालं चुम्बति प्रियतमं खलु धन्यः ॥ २१ ॥
जाने न काव्यं न हि मेऽस्ति मेधा तथापि कुर्वे ग्रथनाय यत्नम् ॥
दुग्धामृतन्यायमवेक्ष्य बंधो गृहाण पत्राद्गुणलेशमेव ॥ २२ ॥

